नास्ति सत्यात्परो धर्मः

# लोकभ्रम.



लेखक.

रा. ज. गोखले, बी. ए.,

फलज्योतिषचिकित्सा, आरोग्यदीप, भूवर्णन इत्यादि पुस्तकांचे कर्ते.



मुद्रक व प्रकाशक—

गणेश काशिनाथ गोखले

मालक, श्रीगणेश प्रिंटिंग वर्क्स, ४९५-४९६ शनवार, पुणें २.







सन १९३५.



किंमत १ रुपया.

# अनुक्रमाणिका

—:०:—

# प्रस्तावना.

## सत्याचें महत्त्व.

Truth teacheth that the inquiry of truth which is the love making or wooing of it, the knowledge of truth which is the presence of it, and the belief of truth which is the enjoying of it, is the sovereign good of human nature.

—Bacon's Essay on Truth.

## अंधश्रद्धेचे दुष्परिणाम व प्रचलित शिक्षणपद्धतीमधील दोष.

The superstitious mind has an unhealthy influence upon social life and is a menace to any vigorous civilization.

The tendency of our present educational system is to prevent the majority of children's minds from developing beyond the child level.

S. W. Arbathnot Lane, Bart., F. R. C. S.
President, New Health Society, London.

## भ्रामक कल्पनांकडे मनुष्यांची स्वाभाविक प्रवृत्ति.

"The illogically trained, unfortunately, devote a large part of their energies to the production of every kind of cob web of rash inference; and this with such rapidity that the logical broom fails to keep pace with their activity. The mediaeval superstitions as to ghosts and necromancy are scarcely discredited before they reappear as Theosophy and Spiritualism.

## संशयीवृत्तीचें शास्त्रांत महत्त्व.

"Honest doubt is far healthier than over ready belief. Doubt is at last the first stage towards scientific inquiry.

"While it is reasonable in the minor actions of life, where rapidity of decision is important, to infer on slight evidence and believe on small balances of probability, it is opposed to the true interests of society to take as a permanent standard of conduct a belief based on inadequate testimony.

—"Grammar of Science," by Karl Pearson.

## सत्याचे महत्त्वाविषयीं संस्कृत वचनें.

नास्ति सत्यात्परो धर्मः

अश्वमेधसहस्रं च सत्यं चं तुलया धृतम् ।
अश्वमेधसहस्राद्धि सत्यमेव विशिष्यते ॥
गोभिर्विप्रैश्च वेदैश्च सतीभिःसत्यवादिभिः ।
अलुब्धैर्दानशूरश्चैश्च सप्तभिर्धार्यते मही ॥

सत्यं तपः ज्ञानमहिंसता च

एतानि यो धारयते स विद्वान् ।
न केवलं यः पठते स विद्वान् ॥

सत्येन धार्यते पृथ्वी सत्येन तपते रविः ।
सत्येन वायवो वांति सर्वे सत्ये प्रतिष्ठितम् ॥

वरील संस्कृत वचनांवरून सत्याचें महत्त्व धर्मदृष्ट्या सिद्ध आहेच; पण व्यवहाराच्या दृष्टीनेंही सत्याचें महत्त्व कमी नाहीं. याचें कारण हें उघड आहे कीं, प्रयत्नांचा जो मुख्य हेतु इष्टप्राप्ति व अनिष्टपरिहार, तो सत्यज्ञानानेंच साध्य होणारा आहे. पुरुषार्थसाधनही सत्यज्ञानावर अवलंबून आहे. योग्य मार्गाच्या ज्ञानावांचून, अथवा खोट्या ज्ञानानें, इष्टार्थप्राप्ति होणें हें, डोळे मिटून जाण्यानें इष्ट स्थलास पोंचण्याइतकेंच अशक्य आहे. रस्ता कोणता, गाडी केव्हां निघते व केव्हां पोंचते याविषयींचे सत्यज्ञान प्रवासास जितकें अवश्य, तितकेंच कोणत्याही वस्तूसंबंधाचें सत्यज्ञान सर्व व्यवहारास अवश्य आहे. अर्थात् सत्यज्ञान अत्यंत महत्वाचें आहे यांत शंका नाहीं.

## सत्य काय?

पण गहन प्रश्न हा आहे कीं, सत्य कोणतें? 'किं कर्म किमकर्मेति कवयोप्यत्र मोहिताः,' याप्रमाणेंच 'किं सत्यं किमसत्यंच कवयोप्यत्र मोहिताः' असेंही म्हणतां येईल. बेकन या प्रसिद्ध तत्त्ववेत्त्यानें आपल्या 'सत्य' या विषयांवरील निबंधास प्रारंभ, "सत्य कशास म्हणावयाचें असा विनोदी पायलेट (क्रिस्तावरील पाखंडीपणाच्या आरोपाचा निवाडा करणारा न्यायाधीश) यानें प्रश्न विचारला, व उत्तराची वाट पाहिली नाहीं"× अशा अर्थाच्या वाक्यानें केला आहे; व या वाक्यांत ध्वनित केल्याप्रमाणें सत्यनिश्चय ही गोष्ट फार बिकट आहे यांत शंका नाहीं. उदाहरणार्थ, पुढे दिलेले प्रश्न सर्वांना अत्यंत महत्त्वाचे वाटतात व त्यांविषयीं अत्यंत बुद्धिमान् लोकांनीं एवढेंच नव्हे, तर देवाचे अवतार व म्हणून सर्वज्ञ मानलेल्या अशा लोकांनींही, पुष्कळ विचार करून आपलीं मतें दिलेलीं आहेत; पण तीं परस्परविरोधी आहेत या एका मुद्द्यावरूनच सत्य किती दुर्ज्ञेय आहे याची प्रतीति येईलः—

## वादग्रस्त गोष्टींचे नमुने.

परमेश्वराचें आस्तित्व, परमेश्वर सगुण कीं निर्गुण, परमेश्वराचें स्वरूप, परमेश्वराचा स्वभाव, परमेश्वराचा सृष्टीशीं संबंध, प्राण्याचा पुनर्जन्म, मनुष्याचा मनुष्येतर योनींत जन्म होण्याची शक्याशक्यता, जीवात्मा व परमात्मा तसेंच आत्मा व मन एक कीं भिन्न तत्त्वें, पशुपक्ष्यांस आत्मा आहे कीं नाहीं, पापपुण्य कशास म्हणावयाचें (उ०, मद्यपान व भक्ष्यार्थ प्राणिहिंसा पाप आहे काय इ०), इच्छा स्वतंत्र कीं परतंत्र, स्पृश्यास्पृश्यता, मृत्यूनंतर आत्मा कोठें व कशा स्थितींत राहतो... इ०.

अदृश्य व केवळ अनुमेय अशा गोष्टींबद्दलच अद्याप सत्यनिर्णय नाहीं एवढेंच नव्हे, तर कमीजास्तमानानें अवलोकन व प्रयोग यांनीं समज-

---

× "What is truth, asked jesting Pilate and would not stay for an answer". —Bacon's Essay on Truth.

णाऱ्या भौतिक गोष्टींसंबंधानेंही अद्याप सत्यनिर्णय झालेला नाहीं. उ० पुढील मतपरिवर्तनें लक्षांत घ्या—

परमाणूच्या कल्पनेंत अलीकडे झालेला बदल, सूर्य पृथ्वी इत्यादिकांच्या गतीसंबंधांच्या कल्पनांत झालेला बदल, विश्वाच्या उत्पत्तीविषयीं भिन्नकालीन शास्त्रीय कल्पना; विश्व अनंत कीं सांत, गुरुत्वाकर्षण खरें कीं ऐनस्टाईन यांची सापेक्षतेची कल्पना खरी...इ०.

अशी स्थिती असण्याचें कारण काय हें सहज ध्यानांत येण्याजोगें आहे. स्थूल व सूक्ष्म या दोन्ही बाबतींत विश्व शब्दशः अनादिअनंत आहे. विशालतेच्या बाजूनें पाहिलें, तर ज्या ताऱ्यांपासून पृथ्वीवर प्रकाश येण्यास लक्षावधि वर्षें लागतात त्यांच्याजवळ देखील विश्वाचा विस्तार संपत नाहीं इतकें तें विशाल आहे. सूक्ष्मतेच्या बाजूनें पाहिलें, तर डोळयास न दिसण्याइतक्या एका सूक्ष्म पार्थिव अणूमध्येंही सूर्यमालेंतील गोलाप्रमाणें परिभ्रमण करणारे असंख्य गोल आहेत; इतकें विश्व सूक्ष्म आहे. अर्थात् त्याच्या आदि अंताची कोणासही कल्पना करतां येत नाहीं. इतकें अनादि व अनंत जें विश्व त्याचें ज्ञान शंपन्नास वर्षें आयुष्य असलेल्या मनुष्यास किती व कसें असणार! उंबरांतील किड्याच्या भूगोलज्ञानाइतकेंच. त्यांतूनही स्थूल गोष्टींचें ज्ञान कांहींतरी साधनानें मिळवितां येतें. परंतु ज्या गोष्टी अदृश्य आहेत व जेथें केवळ कल्पनाच चालवावी लागली अशा गोष्टींविषयीं मनुष्याचें ज्ञान अत्यल्प असलें पाहिजे हें उघड आहे. सत्यज्ञान जर इतकें कठीण आहे तर कोणी असा प्रश्न विचारतील कीं, ही वस्तुस्थिती जर खरी तर अमूक समज भ्रम आहेत इत्यादि प्रस्तुत ग्रंथांतील पांडित्य कशास! यास उत्तर हें कीं, मनुष्याचें ज्ञान अत्यल्प व त्यांत चूक असण्याचा संभव आहे हें जरी एकंदरीनें खरें आहे, तरी प्रयत्नांतीं मनुष्यास कसलेंच ज्ञान होत नाहीं असें नाहीं. अनेक वर्षांपूर्वी वर्तविलेलें ग्रहण अगदीं मिनिटापर्यंतही बरोबर घडून येतें असें जर दिसतें, तर प्रयत्नांतीं कांहीं मर्यादेपर्यंत सत्यज्ञान मनुष्यास होऊं शकतें हें उघड आहे. म्हणून ज्ञानप्राप्त्यर्थ प्रयत्न करणें व्यर्थ नाहीं.

## सत्य कसें जाणावें व सत्यमार्ग कोणता ?

आतां हा प्रश्न उत्पन्न होतो कीं, अत्यंत महत्त्वाच्या अशा बाबतींत मोठमोठ्या बुद्धिवान् लोकांनाही जर सत्य पूर्णपणें कळत नाहीं, तर ( १ ) तें जाणावयाचें कसें ? व ( २ ) व्यवहारांत कोणत्या मताचें अनुसरण करावयाचें ? ह्यांपैकीं पहिल्या प्रश्नाचें उत्तर "कांहीं बाबतींत सत्यज्ञान फार बिकट आहे, शक्य तितका प्रयत्न करावा" ह्यापेक्षां जास्त समाधानकारक देतां येत नाहीं हें कबूल करणें भाग आहे. दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर हें कीं, ज्या बाबतींत मोठमोठ्या लोकांत मतभेद आहे त्या बाबतींत, स्वतःस तितकी विचारशक्ति असेल व परिणामाची जबाबदारी घेण्याची आपली तयारी असेल, तर आपणास जें पटेल तें मत अनुसरणें, व जेथें स्वतःस निर्णय करणें शक्य नाहीं तेथें जगांतील तिऱ्हाईतांपैकीं शाहण्या व निःपक्षपाती ठरलेल्या लोकांपैकीं बहुजनांचें जें मत असेल तें मत त्या वेळेपुरतें सत्य मानणें तत्त्वदृष्ट्या बरोबर आहे.+ हा मार्ग निःशंयपणें हितावह होईलच असें मात्र नाहीं; पण याहून सुरक्षित असा अन्य मार्गच नाहीं. मात्र ही अडचण सूक्ष्म, अदृश्य व गहन गोष्टींसंबंधानेंच आहे. स्थूल व व्यवहारिक गोष्टीविषयीं ही अडचण येत नाहीं. त्यासंबंधानें व्यवहारापुरतें सत्यज्ञान होणें शक्य आहे. हें कसें तें पुढें ५–६ प्रकरणांत सांगितलें आहे.

## सर्व लोकभ्रम हे खरेच भ्रम आहेत काय ?

वाचकांनीं हें लक्षांत ठेवणें जरूर आहे कीं, या पुस्तकांत लोकभ्रम म्हणून जे दिले आहेत ते सर्वस्वीं भ्रम आहेत व त्यांत सत्याचा लवलेशही नाहीं अशी आमची प्रतिज्ञा नाहीं. शास्त्र व तत्त्वज्ञान यांचा असा सिद्धांत आहे कीं, पूर्ण पुरावा मिळाल्यावांचून कोणतेंही विधान खरें मानावयाचें नाहीं. या तत्त्वास अनुसरून, पुढील लोकभ्रमांपैकीं कांहींना सत्याची कसोटी

---

+केवळ व्यवहारदृष्ट्या पाहिलें तर महाजनो येन गतः स पंथाः हा मार्ग सुरक्षितआहे; पण मुख्य प्रश्न सोईचा मार्ग कोणता हा नसून सत्यमार्ग कोणता हा आहे.

लावलेली आहे, व कांहीं समजुतींना ती कसोटी पूर्णपणें लावलेली नसली तरी त्या असत्य ठरलेल्या समजुतींसारख्या सकृद्दर्शनीं दिसतात, म्हणून त्यांची गणना भ्रमांमध्यें केली आहे. व्यवहारासाठीं कांहीं गोष्टींचा तात्पुरता निकाल लावणें अवश्य असतें; नाहीं तर "हे परमेश्वरा, मला जर आत्मा असेल, व तुला शक्य असेल तर मला मोक्ष दे" (O God, if there be a God, save, if you have the power to save, my soul, if I have a soul) अशी प्रार्थना करणाऱ्या एका संशयवाद्याच्याप्रमाणें, सर्व नित्यव्यवहारांत अनवस्था प्रसंग येईल. जें सत्य म्हणून सिद्ध झालें नाहीं, तें तात्विकदृष्टया जरी 'असिद्ध' एवढेंच म्हणणें योग्य असलें, तरी व्यवहारदृष्टया 'तें सत्य नाहीं' असेंच म्हणणें सोईचें आहे, व सर्व व्यवहार असाच चालतो. एकाद्यावर कोर्टांत आरोप शाबीत झाला नाहीं म्हणजे त्याचा 'गुन्हा सिद्ध झाला नाहीं' असें कोणीही म्हणत नाहीं. तो 'अपराधी नाही, अथवा' 'तो निरपराधी ठरला' असेंच सर्व म्हणतात. आरोपी हा खरा गुन्हेगार असूनही समाधानकारक पुराव्याच्या अभावीं तो सुटणें शक्य आहे व तसा तो सुटतोही हें सर्वांस माहीत आहे; तरीही आरोप शाबीत झाला नाहीं एवढयाच कारणास्तव लोक त्यास तो 'अपराधी नाहीं' असेंच म्हणतात. या नियमास अनुसरून पुरेशा पुराव्याच्या अभावीं कांहीं लोकसमजुतींना सत्यसृष्टींत स्थान देण्याचें आम्हीं नाकारलें आहे.

**"कोणतीही गोष्ट खोटी अशी सिद्ध होईपर्यंत खरी मानावी" असें कांहींचें म्हणणें आहे; पण तें सयुक्तिक नाहीं व शास्त्रज्ञांनाही मान्य नाहीं.+**

---

**"The assumption which lies at the bottom of most fallacious inferences is that the strongest argument in favour of the truth of a statement is the absence or impossibility of a demonstration of its falsehood."**

—"Grammar of Science".

व्यवहाराच्या दृष्टीनेंही हें अशक्य व अनिष्ट आहे असें दिसून येईल. कारण, कांहीं विधानें खोटीं आहेत हें सिद्ध करणें बहुतेक अशक्य असतें. विशेषतः, ज्या गोष्टी पूर्वी घडलेल्या असतात, किंवा हल्लींही केव्हां घडतात हें निश्चितपणें कोणी सांगत नाहीं, किंवा ज्या गोष्टी पाहण्यास जबाबदार लोक हजर असतातच असें नाहीं, अथवा त्या जेथें घडतात तेथें जाणें शक्य नसते, तसेंच ज्या गोष्टी भविष्यकालीं केव्हां तरी किंवा अनेकवर्षांनंतर घडावयाच्या असतात, त्या खोटया आहेत हें सिद्ध करणें अशक्य आहे. उ० 'मेलेलीं माणसें दोनशेंवर्षांपूर्वी अमक्यानें जिवंत केली' किंवा 'अमका समुद्रावरून चालत गेला' ही प्राचीनकालीं घडलेली गोष्ट, अवश्यमेव एकातांत घडणारी व्यभिचारासारखी गोष्ट, दोनशेंवर्षांनंतर अमका अवतार होणार आहे यासारखी फार लांबची गोष्ट या गोष्टी खोटया असल्या तरी त्यासंबंधानें आज पुरावा कसा देतां येणार ! व तसा पुरावा देतां येत नाहीं म्हणून या गोष्टी खऱ्या मानावयाच्या काय ! खोटेपणाबद्दल पुरावा नाहीं म्हणून एका माणसानें दुसऱ्याच्या व्यभिचाराविषयीं सांगितलेली गोष्ट खरी मानावी असें म्हणण्यास कोणी तयार आहे काय ! 'तुम्ही काल रात्रीं बारा वाजतां अमक्या घरीं गेला होता' म्हणून खोटाच आरोप तुमच्यावर एकाद्यानें केला तर तुम्ही तेथें गेला नव्हता हें कसें सिद्ध करणार ! घरचीं माणसें तुमच्या बाजूचीं, म्हणून त्यांचा पुरावा निरुपयोगी; बरे घरच्या माणसांत एकादा सत्यवक्ता प्रत्यक्ष धर्माचा अवतार असला व तुम्ही 'निजतांना घरींच होता' म्हणून त्यानें सांगितलें, तरी त्यास झोप लागल्यानंतर दुसऱ्याच दारानें तुम्ही बाहेर गेला नाहीं कशावरून म्हणून प्रतिपक्षीयानें विधान केलें, तर तें खोटें हें कसें सिद्ध करावयाचें ! ज्यांच्या घरी गेला त्यांच्या घरीं जाण्याची वेळ रात्रीची असल्यामुळें, त्या घरच्या कोणा माणसाची तुम्ही ' येथें दिसला नाहीं ' असली साक्षही चालवयाची नाहीं ( कारण वेळ अंधाराची), तेव्हां अशा स्थितींत वरील आरोप खोटा आहे हें तुम्ही कसें ठरविणार ! यास्तव खोटे आहे असें सिद्ध केलें नाहीं म्हणजे तें खरें असलें पाहिजे हा सिद्धांत मान्य केल्यास अशी आपत्ति येईल कीं, वाटेल त्या लबाड माणसाचें वाटेल तें भूतकालीन अथवा भविष्यकालीन गोष्टींसंबंधाचें विधान किंवा ' अहीस पाहिजे तेवढी

( यत्किंचित जास्त उपयोगी नाहीं कीं कमी उपयोगी नाहीं ) आच दिल्यास या मिश्रणाचें सोनें होतें ' असलें संदिग्ध विधान खरें मानावें लागेल. तसेच ह्या तत्त्वास अनुसरून चालावयाचें म्हणजे कोणत्याही धर्मांच्या पुराणादि ग्रंथांतील किंवा कोणत्याही जातीच्या इतिहासादि ग्रंथांतील अन्यधर्मीय व परकीय व्यक्तींचा उणेपणा दाखविणाऱ्या कथा खऱ्या मानाव्या लागतील. हें करण्यास, वरील तत्त्व सांगणारे लोक तयार आहेत काय? ते तसे तयार नसतील तर हा त्यांचा नियम व्यर्थ आहे हें उघड आहे. व्यवहारज्ञ अशीं समजलीं जाणारीं माणसेंही हा नियम पाळतात असें दिसत नाहीं. स्वार्थ साधेल तेथें पुढें करावयाचा व विरुद्ध जाईल तेथें मागें ठेवावयाचा असे जे नियम असतात त्यांपैकीं हा नियम आहे. जेथें नफानुकसानीचा प्रश्न नाहीं तेथें निष्कारण तंटा टाळण्यासाठीं हा नियम वाचिक व्यवहारांत अनुसरणें बरोबर असेल; पण प्रत्यक्ष कृतीचा म्हणजे दुसऱ्याचें म्हणणें खरें आहे असें समजून त्याप्रमाणें वागण्याचा अथवा जबाबदारी घेण्याचा जेथें प्रसंग येतो, तेथें 'खरें असें सिद्ध झालें नाहीं तोंपर्यंत तें खोटें' असेंच मानणें योग्य आहे, व ह्याप्रमाणेंच सर्व व्यवहारज्ञ वागत नाहींत काय? एकादा परका मनुष्य आपलेकडे येऊन 'अमक्याकडून माझे चाळीस रुपये येणें आहेत' म्हणून सांगतो तेव्हां आपण त्याचें म्हणणें खरें मानल्याचें दाखवितो ( कारण, तसें न करून अप्रियता कशास संपादावयाची !), पण जेव्हां तो आपणास म्हणतो 'कीं मला वीस रुपये उसने द्या, माझे चाळीस रुपये परत आले म्हणजे मी तुमचे रुपये परत देईन' तेव्हां आपण त्याचें म्हणण्याविषयीं साशंकता दाखवून पुरावा मागतों, व तो पटल्यावांचून त्याचें विधान खरें मानीत नाहीं. ओळखीच्या माणसानेंही पैसे उसने मागितले तर 'त्याचें वचन खोटें ठरलें नाहीं तोंपर्यंत तें खरे' मानण्यास बहुतेक लोक तयार नसतात. हा जो व्यवहारांतील नियम तोच शास्त्राचा नियम आहे. शिवाय शत्रुपक्षास किंवा परक्यांस ही ( दुसऱ्याचें म्हणणें खरें मानण्याची) सवलत आपण कां देत नाहीं, याचाही विचार करणें जरूर आहे. विरुद्ध पक्षाचीं मतें व तत्त्वें 'असिद्ध, न म्हणतां, तीं आपल्या कसास उतरत नाहींत ह्या मुद्द्यावरच त्यांना आपण नित्य व्यवहारांत ' खोटीं ' असेंच म्हणतों. हा जो सर्वसामान्य व्यवहार आहे तोच आम्हीं अनुसरला आहे.

## वहिवाटीचा अथवा परंपरेचा आधार सत्यतेचा पुरावा होतो काय ?

येथें कांहीं लोकांचें म्हणणें असें कीं, Possession is nine points of law या नियमास अनुसरून जें पूर्वीपासून सत्य म्हणून चालत आलें आहे तें, असत्य असें सिद्ध होईपर्यंत, खरें असेंच मानलें पाहिजे. ह्यास येथें सविस्तर उत्तर न देतां आम्ही थोडक्यांत असें सांगतों कीं, शास्त्रीय व तात्त्विक जगांत हें म्हणणें मान्य नाहीं. पूर्वी हजारों वर्षें खऱ्या मानलेल्या गोष्टी आतां खोट्या ठरलेल्या आहेत असें जर आपणांस माहीत आहे, तर पुष्कळ वर्षें चालूं असणें हा वहिवाटीचा हक्क सत्यतेचा पुरावा होत नाहीं. शिवाय, ही सवलत विरुद्ध पक्षास द्यावयास माणसें कोठें तयार होतात ! बौद्धांचें नास्तिक मत निदान दोन हजार वर्षें चालू आहे म्हणून तें खरें आहे असें म्हणण्यास इतर धर्मांचे लोक तयार आहेत काय ! असो. असत्य गोष्टींतील असत्यपणा कळून कां येत नाहीं याचा खुलासा पुढें पांचव्या प्रकरणांत केलाच आहे. त्यावरून असत्य गोष्टी कां टिकून राहतात तेही समजून येईल.

सारांश, पुढें असत्य म्हणून दिलेल्या समजुतींना जे लोक " खऱ्या " म्हणतात त्यांना, ह्या समजुतींच्या सत्यतेविषयींच्या पुराव्याच्या अभावीं व त्यांच्या असत्यतेसंबंधाच्या पुराव्याच्या आधारावर, ' त्या भ्रामक आहेत ' असें आमचें व्यावहारिक उत्तर आहे. पण जेथें खोटेपणाचा पुरावा आम्हांस देतां येत नसेल तेथें ' त्या खऱ्या आहेत ( अथवा त्या खोट्या आहेत ) हें असिद्ध आहे,' असेंच आमचें तात्त्विक उत्तर आहे.

## भ्रमांविरुद्ध लिहिणारे अंधश्रद्ध नव्हेत काय ?

There is a superstition in avoiding superstition असें एक बेकनचें वाक्य आहे. हें विधान मूळ लेखांत धार्मिक–विशेषतः ख्रिस्ती धर्मांतील–समजुतींसंबंधीं असून त्याचा अर्थ हा कीं, सर्वच धार्मिक समजुती व विधि सर्वस्वीं खोटे आहेत असें मानणें हीदेखील अंधश्रद्धा अथवा भ्रम आहे. हें म्हणणें लोकभ्रमांविषयीं लिहिणारांच्या अथवा बोलणारांच्या अंगावर टाकून व त्यांच्या लिहिण्यांतील एकादें–अंशतः किंवा

पूर्णपणें असत्य–विधान दाखवून कांहीं लोकभ्रमांचे पुरस्कर्ते त्यांना कधीं कधीं म्हणतात, " लोकांना तुम्ही श्रद्धालु म्हणतां, पण तुम्हीही कांहीं विधानें पूर्ण पुराव्यावांचून करतां ही ( अशीं कांहीं स्थलें प्रस्तुत ग्रंथांत सांपडण्याचा संभव आहे याची पूर्ण जाणीव लेखकास आहे ) तुमची अंधश्रद्धाच होत नाहीं काय ! मग तुम्ही इतरांचा हा दोष कां काढतां !" यास उत्तर पुढीलप्रमाणें आहे:—

कोणत्याही तात्त्विक विधानाकडे पाहण्याची एक दृष्टी अशी आहे कीं, त्यामध्यें सत्य काय असेल, हें पाहावयाचें व तें घ्यावयाचें. त्यासंबंधांत व्याख्याता कसा आहे हें पाहाणें ही एक अप्रस्तुत व तात्विक दृष्टया अगदीं गौण गोष्ट आहे. तसें पाहून व्याख्यात्यास नांवें ठेवावयाचें मनांत आणलें, तर शेंकडा ९० च नव्हे तर ९९ लेखक–अर्थात् वर्तमानपत्रकर्तेही–बरेच पुढारी, बहुतेक पुराणिक व कथेकरी यांच्याशीं " तुम्ही देशभक्ति...धर्म यांविषयीं आम्हांस उपदेश करतां, पण तुम्ही आमच्यासारखेच स्वार्थतत्पर व धर्मविमुख आहां " असा वाद नित्य करावा लागेल. म्हणून, आमच्यावरील अंधश्रद्धेच्या आरोपास आमचें उत्तर पुढील आहे. " आम्ही तुमच्या म्हणण्याप्रमाणें असलों, तरी जास्त श्रद्धाळू तुम्ही कीं आम्ही, व तुमचें वागणें विसंगत कीं आमचें विसंगत हा या विवेचनाचा मुख्य उद्देश नाहीं. विवक्षित समज खरें कीं खोटे हें शास्त्रीय कसोटी लावून पहावें व तोंपर्यंत त्यांना अमान्य समजावें हा आमचा मुख्य प्रतिपाद्य विषय आहे. त्याकडे तुम्ही लक्ष द्या, व त्यासंबंधीं पुरावा देण्याचा प्रयत्न करा. पुरावा मिळाल्यास कोणत्याही समजुतीस मान्यता देण्यास आम्ही तयार आहोंत."

दुसरा प्रश्न, अंधश्रद्धेच्या विरुद्ध लिहिणाऱ्या लेखकांस त्यांच्या कांहीं प्रमाणरहित विधानांवरून श्रद्धाळू म्हणावयाचें कीं नाहीं हा आहे. येथें लक्षांत ठेवावयाची गोष्ट ही कीं, सत्यभाषी, प्रामाणिक, श्रद्धाळू, विश्वासूक वगैरे विशेषणांसंबंधानें असा संकेत आहे कीं, या संज्ञांनीं दाखविलेली वृत्ति ज्यांच्यामध्यें बव्हंशीं दृष्टीस पडते, त्यांना, त्यांच्यामध्यें विरुद्ध वृत्ति क्वचित् प्रसंगीं दृष्टीस पडली तरीही, ह्या संज्ञा लावावयाच्या. असें न केल्यास ' जगांत सत्यभाषी कोणीच नाहीं ' असें म्हणण्याची क

प्रामाणिक, सत्यभाषी वगैरे विशेषणें व्यावहारिक भाषेंतून वगळण्याची पाळी येईल. कारण, एकदांही खोटें न बोललेलीं किंवा लबाडी न केलेलीं माणसें जगांत किती आढळणार ? यमधर्माचे प्रत्यक्ष पुत्र धर्मराज हेही क्वचित् प्रसंगीं असत्य भाषण करतात असें दिसून येतें. मग इतर जनांची स्थिति काय असणार ? असो. वर सांगितलेल्या नियमास अनुसरून, श्रद्धाळू याचा अर्थ "एकाद्या गोष्टीविषयीं अंधश्रद्धा असणारा" असा नसून "पुष्कळ प्रसंगीं अंधश्रद्धा दाखविणारा" असा होतो. (आतां पुष्कळ प्रसंग म्हणजे शेंकडा किती ह्याविषयीं कांहीं मर्यादा सांगणें शक्य नाहीं, म्हणून ही कसोटी कांहीं अंशीं संदिग्धच होईल हें खरें ). वरील कसोटी लावून, प्रस्तुत लेखक बऱ्याच प्रसंगीं अंधश्रद्धा न दाखवितां चिकित्सक बुद्धि दाखवीत असेल, तर कांहीं प्रसंगी तो अंधश्रद्धा दाखवितो म्हणून तो श्रद्धाळूंच्या वर्गांत घालतां येणार नाहीं.

## तात्विक विवेचनांत वैयक्तिक गुणदोष ही गौण गोष्ट आहे.

तथापि या प्रश्नांत, वैयक्तिक गुणदोष हा मुद्दा अगदीं गौण आहे. लोकभ्रमाचे विरुद्ध लिहिणारे प्रस्तुत लेखकासारखे लेखकही श्रद्धाळूच आहेत असाच कोणाचा आग्रह असेल, तर त्यांना एवढेंच सांगणें कीं, लेखक तसे असतील तर, असोत; 'आम्हांस अंधश्रद्धाविहीन म्हणा' असा त्यांचा आग्रह नाहीं. त्यांचा मुख्य मुद्दा तुम्ही जास्त श्रद्धाळू कीं आम्ही जास्त श्रद्धाळू हा नसून, कांहीं समजुती खऱ्या कीं खोट्या एवढाच आहे; व ज्या समजुतींचा खरेपणा दाखवितां येत नाहीं, त्या अज्ञात औषधाप्रमाणें समजल्या जाऊन, त्या उपयोगांत आणूं नयेत अशी त्यांची सूचना आहे. ती योग्य आहे कीं नाहीं, एवढाच विरोधीपक्षानें विचार करावा अशी विनंती आहे.

## भ्रमस्फोटापासून फायदे.

भ्रमांतील भ्रांति लोकांना दाखविण्यापासून मुख्य फायदा हा कीं, त्यायोगें लोकांची अंधश्रद्धा थोडी कमी होते. अंधश्रद्धेमुळें फसवणूक व नि-

कारण भीति हे मोठे तोटे होतात. खोटे ताईत, खोटीं औषधें, जादू, किमया, यांच्या नादीं लागून किती लोक फसतात हें वर्तमानपत्रांतील जाहिराती व फसवणुकीच्या अनेक हकीगती यांवरून समजतें. मनावर व प्रत्यक्ष आचरणावर भीतीचे काय परिणाम होतात व त्यामुळें किती दुर्बलता व पंगुत्व येतें याचाही अनुभव आहेच ( प्रकरण ३ पहा ). हे दुष्परिणाम, अंधश्रद्धा कमी झाल्यानें, कमी होतात हा, भ्रमस्फोटांपासून फायदा आहे.

अज्ञानामुळें, पुष्कळ लोकांची जी फसगत, निराशा व आर्थिक हानि होते ती या लोकभ्रमांच्या अभ्यासामुळें वांचेल व शिक्षणाचें एक महत्वाचें ध्येय साध्य होण्यास ह्या अभ्यासापासून मदत होईल, हें अमेरिकेंतील जगद्विख्यात मानसशास्त्रज्ञ व शिक्षणशास्त्रज्ञ डयूए यांच्या पुढील अभिप्रायावरून दिसून येईल.

John Dewey declared that the best criterion of education...is that quotation from a French educator which suggests that the main purpose of it is to *keep one from being duped*, or as Dewey would prefer to put it in positive from, it enables one to penetrate beneath the surface and understand the real meaning of things. He adds that " Judged by this criterion, education is not only backward, but it is deteriorating. This is the era of *bunk* and *hokum*, there is more of it in quantity ...it is swallowed more indiscriminately than ever before."

—"Psycho-therapy" by Dr. Walsh, Page 782.

लोकभ्रमामुळें आजपर्यंत किती निष्कारण पीडा झाली आहे हें, धर्मामुळें झालेला छळ व तंटे, भुतें व चेटकें यांच्या भीतीमुळें होणारा त्रास व द्रव्यहानि, आणि युरोपांत चेटक्यांचा झालेला छळ यांसंबंधींच्या हकी-

कतीवरून कोणासही सहज दिसून येणारें आहे. यासंबंधीं पुढील थोडींशीं उदाहरणें पहाः—

" कॅथरिन राणीचा एकुलता एक मुलगा चार्लस आजारी होता. तो जगावा म्हणून एका सुंदर व पवित्र मुलाचा बळी देण्याविषयीं एका मांत्रिकानें सल्ला दिला. त्याप्रमाणें एक सुंदर व शुद्धाचरणी मुलगा आणला. बाप्तिस्माचे वेळीं घालतात तसला त्याला पोशाख घातला......त्याचें मुंडकें छाटलें, व तें दिवे लावून तयार करून ठेवलेल्या मेजावर ठेवलें......त्या मुंडक्यांतून एक आवाज ऐकूं आला...तथापि या चेटकाचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. चार्लस कांहीं दिवसांनीं वारला.

लोरेन प्रांतांत १५८०पासून १५९५पर्यंत नऊशे चेटक्या जाळल्या.

रोम येथील एक तळें उपसलें तेव्हां त्यांत ६ हजारांवर लहान मुलांचीं ( बळी दिलेल्या वगैरे ) मुंडकीं सांपडलीं असें ल्यूथरनें म्हटलें आहे.

बॅमबर्गच्या जॉन बिशपनें ६ शें चेटक्या जाळल्या.

हॉबरच्या ग्रंथामध्यें एका ठिकाणीं जाळलेल्या १६२ लोकांची याद दिली आहे तींत २८ प्रॉटेस्टंट, १०० इतर नागरिक व ३४मुलें होतीं."

—मॅडम ब्लॅव्हॅटस्की यांच्याIsis Unveiled या पुस्तकांतून.

अशीं उदाहरणें किती तरी देतां येतील.

युरोपमध्यें चेटक्या म्हणून निदान १०—१५ हजार—कांहींच्या मतें लाखावर—माणसांना, देहांत शिक्षा दिल्याचें इतिहासावरून समजतें.

## लोकभ्रमाचा निरास केल्यानें श्रद्धानाश होऊन नुकसान होईल काय ?

येथें कोणी अशी शंका घेतात कीं, श्रद्धेमुळें लोक पुष्कळ चांगल्या गोष्टी करतात, व लोकभ्रमनिरासानुळें ही श्रद्धा कमी झाल्यास जनतेचें नुकसान होईल. पण ही भीति बरोबर नाहीं. श्रद्धेचे दोन प्रकार मानतां येतीलः-( १ ) सत् श्रद्धा व ( २ ) असत्श्रद्धा. व्यक्तीच्या व समाजाच्या हितास ज्या गोष्टी खरोखरी आवश्यक आहेत, त्यासंबंधाची, तसेच सत्यनिष्ठ जी श्रद्धा ती सत्श्रद्धा; व ज्या श्रद्धेचा समाजहितास उपयोग नाहीं

अथवा जीस सद्विचाराचा आधार नाहीं ती असत्‌श्रद्धा. सत्कर्मनिष्ठा, निःस्वार्थीपणा, इत्यादिसंबंधीं श्रद्धा ही पहिल्या प्रकारची, व जारणमारण, चेटूक, बळी देणें, यांवरची श्रद्धा दुसऱ्या प्रकारची होय. श्रद्धा ही वृत्ति माणसांमध्यें इतर मनोवृत्तींप्रमाणें अगदीं जन्मसिद्ध व स्वाभाविक आहे. कितीही नास्तिक असला, तरी तो कांहीं तत्त्वांस चिकटून राहातोच. मरणाच्या वेळीं, "डॉ. विश्राम, तुम्हीच माझे देव" असें म्हणणाऱ्या कै० कृष्णशास्त्री चिपळूणकरांची, "वैद्यांशिवाय दुसऱ्या कोणाचाही यावेळीं उपयोग नाहीं," ही श्रद्धाच नव्हे काय ? शास्त्रज्ञही कांहीं गोष्टी खऱ्या मानून चालतात कीं नाहीं ? एकदा कॉक या शास्त्रज्ञानें रोगाचे जंतु गिळले × ते श्रद्धेमुळेंच ना !

अशा प्रकारचीं उदाहरणें अनेक देतां येतील.

असो. श्रद्धा हा धर्म नैसर्गिक आहे, म्हणून तो नाहींसा होईल ही भीति, सर्व प्राणी शाश्वत ब्रह्मचर्य स्वीकारतील या भीतीइतकीच, निर्मूलक आहे.

## भ्रमनिरासानें श्रद्धा वाढेल !

लोकसमजुतींतील भ्रामकत्व लोकांचे निदर्शनास आणल्यानें जो परिणाम होईल तो हा कीं, श्रद्धेतील असत्‌स्वरूप जाऊन तीस सत्‌स्वरूप जास्त प्रमाणांत प्राप्त होईल. एका लेखकानें असें म्हटलें आहे कीं, ज्ञान हें अंधाऱ्या जागेंत पडलेल्या कवडाशाप्रमाणें अथवा प्रकाशमंडलाप्रमाणें आहे. अंधारांतील प्रकाशमंडलाचें क्षेत्र जों जों वाढवावें तों तों अंधारदर्शक रेषा वाढत जाते, त्याप्रमाणें ज्ञान जों जों वाढतें तों तों—

---

× महामारीच्या जंतूमुळें जो महामारीचा विकार होतो तो केवळ त्या जंतूंमुळें होत नसून त्याच्या मदतीस आंतड्यांत एका विशिष्ट जातीचे जंतु असले तरच होतो याविषयीं शोधाअंतीं कॉकसाहेबांची खात्री झाल्यामुळें, महामारीच्या जंतूंना साहाय्य करणारे जंतु आपल्या आंतड्यांत नाहींत अशी खात्री करून घेतल्यानंतरच कॉकसाहेबांनीं हे जंतु गिळले हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

अज्ञान ( अज्ञात गोष्टींची जाणीव ) वाढत जातें !" ह्यांतील विरोधाभासाच्या पद्धतीस अनुसरून असेंही म्हणतां येईल कीं, जों जों अंधश्रद्धा कमी करावी तों तों ( सत् ) श्रद्धा वाढत जाईल. उदाहरणार्थ—देवी, महामारी इत्यादि सांथी, देवदेवता पाठवितात हा एकच विश्वास कमी करण्यासाठीं जें ज्ञान द्यावें लागतें, त्यामुळें "रोग अमूक कारणामुळें होतात," "ते अमूक उपायानें कमी होतात," "रोगामुळें येणारें मरण टाळणें हें मनुष्यप्रयत्नावर बरेंच अवलंबून आहे" इ० अशी बहुविध श्रद्धा उत्पन्न होते. असो. हा विरोधाभास खरा नसला तर नसू द्या; पण येवढें तरी म्हणतां येईल कीं, भ्रमासंबंधीं अंधश्रद्धा कमी झाल्यानें तोटयापेक्षां फायदाच जास्त होईल. म्हणून लोकभ्रमाच्या प्रस्तुतसारख्या विवेचनानें श्रद्धा–विशेषतः सत्श्रद्धा–अजीबात कमी होईल ही भीति व्यर्थ आहे. ह्यास प्रमाण आधुनिक पाश्चात्यांचें आहे. हल्लीं रशियांत जुन्या तऱ्हेच्या धर्मानें उच्चाटन झालें आहे, तरी आपण करतों तें योग्य आहे ही श्रद्धा कमी झालेली नाहीं. सर्व जग, विशेषतः आपलेच युरोपियन शेजारी, आपल्या विरुद्ध असूनही रशियन पुढाऱ्यांचे जे निःस्वार्थी आटोकाट प्रयत्न चालू आहेत त्यांच्या मुळाशीं श्रद्धेहून दुसरी कोणती वृत्ति आहे ? यावरून, भ्रमनाशानें खरी श्रद्धा नाहींशी होते, हें म्हणणें खरें दिसत नाहीं.

भ्रम व चमत्कार यांच्या इतिहासावरून घ्यावयाचा मुख्य बोध चमत्कारांविषयीं साशंकता बाळगणें हा होय—शेकडों खरे समजले जाणारे समज व चमत्कार मागाहून खोटे किंवा अन्य स्वरूपाचे जर आढळून आले आहेत, तर जो जो चमत्कार ज्ञात नियमाच्या विरुद्ध दिसेल तो एकदम खरा न मानतां "ही गोष्ट पूर्ण चिकित्सेअंतींच मान्य करावयाची" असें विचारी मनुष्यानें समजन चालावें. असें करण्यांत तोटा कांहींही नसून फायदा मात्र आहे. अंधश्रद्धेनें नुकसान किती होतें तें उघड आहे.

## कांहीं शंका व त्यांस उत्तरें.

( १ ) "कांहीं चमत्कार खोटे, तर सर्वच चमत्कार खोटे काय ?" "चमत्कार जगांत घडतच नाहींत काय ! " अशा ज्या कांहींच्या शंका आहेत, त्यास उत्तर पुढीलप्रमाणें:—मनुष्यास माहीत नाहींत अशा अनेक

गोष्टी आहेत, यास्तव पूर्वी मनुष्यास माहीत नसलेले असे चमत्कार घडणें अगदीं शक्य आहे. आमचें म्हणणें एवढेंच कीं, शक्य अथवा संभवनीय असणें व सत्य असणें यांत फरक आहे. म्हणून केवळ ऐकीव हकीकतीवरून किंवा अपूर्ण अवलोकनावरून अथवा पूर्ण चिकित्सेवांचून कोणताही चमत्कार खरा मानूं नये. कोणा साधूच्या किंवा अवतारी पुरुषाच्या मध्यस्तीनें सृष्टिनियमाच्या विरुद्ध कांहीं गोष्टी घडतात हें शास्त्रज्ञांना ह्या वेळपर्यंत तरी मान्य झालेलें नाहीं हेंही ध्यानांत ठेवावें. त्याचें म्हणणें हें कीं, "हें खरें मानण्यास विश्वसनीय अनुभवांचा आधार नाहीं. एकादा चमत्कार खरोखरच घडत असेल (म्हणजे त्यांत आभास नसेल) व तो सकृद्दर्शनीं नियमाविरुद्ध वाटत असेल, तर तेथें वस्तुस्थिति अशी असते कीं तो चमत्कार दुसऱ्या एका (सध्यां) अज्ञात अशा नियमास अनुसरूनच घडत असतो, व तो नियम सध्यां अज्ञात आहे म्हणून चमत्कार वाटतो."

(२) आजपर्यंत ज्यांवर कोट्यवधि लोकांनीं विश्वास ठेवला ते समज जर भ्रम आहेत, तर सर्व धार्मिक समजुती, त्या खोट्या आहेत या कल्पनेनें, सोडून द्याव्या काय ?

नाहीं. ज्या कल्पनांनीं मनास विशेष समाधान वाटत असेल व ज्यांवरील विश्वासामुळें विशेष हानि होत नसेल अशा कल्पना पाहिजे तर सोडून देऊं नयेत. मात्र पूर्वीं सांगितल्याप्रमाणें, त्या योग्य व्यवहाराच्या आड येऊं न देतां, त्या केवळ 'खासगी, वैयक्तिक व देवघरांतच मानावयाच्या गोष्टी' म्हणून समजाव्या.

**गूढ व वादग्रस्त गोष्टींविषयीं आधुनिक तत्त्ववेत्त्यांना मान्य अथवा साधारण (common) अशीं मतेंः—**

अमुक धर्म सर्वस्वीं खरा व अमुक सर्वस्वीं खोटा असें म्हणतां येत नाहीं. कांहीं सत्य कमी जास्त मानानें सर्व धर्मांत आहे.

कोणताही ग्रंथ ईश्वरप्रणीत मानतां येत नाहीं.

ईश्वर अथवा जगच्चालक अशी एक शक्ति आहे असें मानणें अवश्य असलें तरी ईश्वराचें स्वरूप काय याविषयीं निश्चितपणें आज कांहीं सांगतां येत नाहीं. ईश्वर सर्वज्ञ किंवा शक्तिमान् आहे हें सिद्ध नाहीं.

ईश्वरास प्रार्थना प्रिय आहे किंवा प्रार्थिलेलें फळ तो देतो असें मानण्यास आधार नाहीं. माधवराव पेशव्यांची पत्नी पार्वतीबाई यांच्यासारख्या साध्वीच्या प्रार्थनेचा उपयोग माधवराव पेशव्यांच्या आजाराचा परिणाम टाळण्यास समर्थ होत नाहींच, पण श्रीकृष्णाच्या बहिणीची प्रार्थनाही अभिमन्यूचा मृत्यु परतविण्यास समर्थ होत नाहीं. यावरून, सृष्टिनियमास अनुसरून घडणाऱ्या गोष्टींत ईशप्रार्थनेनें कांहींही फरक होत नाहीं असें दिसून येईल.

ईश्वराचें सर्वज्ञत्व, दयालुत्व व सर्वशक्तिमत्त्व यांशीं सृष्टींतील वैषम्य व दुःख यांचा समाधानकारक मेळ घालतां येत नाहीं.

पूर्वजन्मींचे कर्मांची कल्पना कांहीं प्रसंगीं मनाचें समाधान करण्यास उपयोगीं पडते, पण ती तर्कांचे कसोटीस टिकत नाहीं.

मनास समाधान किंवा शांति मिळण्यास ईश्वरसाक्षात्कार उपयोगीं पडत असला, तरी आपणांस ईश्वरसाक्षात्कार होतो असें मानणारांना सर्वज्ञत्व अथवा सर्वशक्तिमत्व हे ईश्वराचे गुण प्राप्त होत नाहींत; म्हणून कोणीही मनुष्य सर्वज्ञ नाहीं व सृष्टिनियम बाजूस ठेवण्यासही तो समर्थ नाहीं.

धारण करणारा म्हणजे नियमन करून सुस्थिति ठेवणारा तो धर्म अशी धर्म याची व्याख्या मानली, तर धर्म हा समाजास नेहमीं अवश्य आहे; या अर्थानें कोणतीही व्यापक कल्पना– अहिंसा, न्याय इ०– धर्मच होय.

ईश्वराची योग्य कल्पना असणाऱ्यांना ईश्वराचें भजन व चिंतन यांनीं शांति व मानसिक सुख हीं प्राप्त होतात असा अनुभव आहे; परंतु या मार्गानें आधिभौतिक सत्ता किंवा लाभ, श्रद्धालुपणामुळें भक्तांनीं आपण होऊन दिल्यावांचून, संपादतां येतो असें दिसत नाहीं.

कांहीं समज मनाच्या समाधानास अवश्य आहेत म्हणून ते मानण्यांत आलेले आहेत. यास्तव आपत्ति आल्यावर जेथें कांहीं उपाय नसेल तेथें त्यांचा उपयोग करावा; परंतु ते सर्वस्वीं खरे मानून योग्य तो प्रयत्न करण्याचें सोडून देऊं नये. एकादा भामटा आपलें पैशाचें पाकीट घेऊन पळून चालला असतां ‘ पूर्वजन्मीं मीं त्याची पैशाची पिशवी पळविली

म्हणून तो माझी आतां पळवितो' असें म्हणून स्वस्थ बसणें किती खुळचटपणाचें आहे याचा विचार करावा.

आत्मा, शरीर, मन, इंद्रियें हीं सर्वस्वीं भिन्न मानण्यास आधार नाहीं. व्यक्तीचीं अथवा आत्म्याचीं हीं बहुविध अंगें आहेत.

.....................................इ०.

(३)"खोटे हिरे असतात म्हणून खरा हिरा नाहीं असें सिद्ध होत नाहीं, त्याप्रमाणें सृष्टिनियमाविरुद्ध असणारे चमत्कार करणारे कांहीं लोक खोटे ठरले म्हणून तशा प्रकारचे खरे चमत्कार, अथवा ते चमत्कार करणारे लोक अस्तित्वांत नाहींत असें सिद्ध होत नाहीं," अशी कांहींची विचारसरणी आहे. तीस उत्तरः—निःसंशय खरे असे हिरे जगांत अनेक आहेत, हें केव्हांही दाखवितां येण्यासारखे आहे. पण सृष्टिनियमाविरुद्ध घडलेले असे पूर्णपणें विश्वसनीय चमत्कार –बऱ्याच शास्त्रज्ञांच्या मतें मुळींच– उपलब्ध नाहींत. म्हणून येथें वरील दृष्टांत लागू पडत नाहीं. खरे ठरलेले व सृष्टिनियमांविरुद्ध घडलेले चमत्कार उपलब्ध झाले, म्हणजे सृष्टिनियमाचें उल्लंघन विशिष्ट व्यक्ति करूं शकतात असें मानण्यास शास्त्रज्ञ तयार होतील.

सध्यां आमचें म्हणणें एवढेंच कीं, ज्या गोष्टी, १०मध्यें १या प्रमाणांतदेखील खऱ्या नसतात, तसल्या गोष्टी ऐकल्या, म्हणजे त्या खऱ्या असण्याचा संभव फार अल्प–एक दशांशपेक्षांही कमी–म्हणून त्या खऱ्या मानणें योग्य नाहीं.

( ४ )"हें खोटें कां म्हणतां; पाहिजे तर तें खरें मानूं नका" अथवा "suspend your judgment."

कांहीं लोक एक लटपट करीत असतात त्यासंबंधानें सूचना देणें अवश्य आहे. ती लटपट अशी. एकाद्या चमत्कारासंबंधानें अशा रीतीनें हकीकत सांगावयाची कीं, तो चमत्कार खरा अशीच लोकांची समजूत व्हावी. असा चमत्कार सांगून सांगणारानें त्यासंबंधानें शंका दाखविली नाहीं, म्हणजे ही हकीकत खरी आहे असें जें सांगणारांनीं

भासविलें, त्याचा प्रतिकार करण्याकरितांच, जवळ असणाऱ्या चिकित्सक माणसास, कोणतीही गोष्ट सप्रमाण सिद्ध होईपर्यंत खरी मानावयाची नाहीं या नियमास अनुसरून, ही हकीकत 'आपल्या समजुतीप्रमाणें खरी नाहीं' अथवा 'खोटी आहे' असें सांगावें लागतें. अशा वेळीं मूळ हकीकत सांगणारे 'तुम्ही हें खोटें कां म्हणतां; फारतर खरें म्हणूं नका' असें म्हणतात; पण तें योग्य नाहीं. मूळ सांगणारांनीं चमत्काराची हकीकत जर विश्वासाच्या भूमिकेनें सांगितली, तर 'ती खरी आहे' अशा शब्दांचा उपयोग केला नसला, तरी वस्तुतः तसें भासविलें आहे; म्हणून प्रतिपक्ष्यास त्यांचे विरुद्ध विधान करणें अपरिहार्य आहे. खपल्यास विधान ठोकून देऊन तें लोकांच्या गळीं उतरावयाचें, व विरोध केल्यानंतर 'असिद्ध म्हणा' म्हणून मागणी करावयाची, हें वादमूलक मालमत्तेचा कबजा मुकाटयानें घ्यावयाचा व हरकत केल्यावर 'बरें आहे ही मालमत्ता कोणाचीच नाहीं असें आपण समजूं या' असा निःपक्षपातित्वाचा आव घालावयाचा यासारखें लटपटीचें आहे. 'असें कांहीं लोक म्हणतात; पण तें सिद्ध नाहीं' असा शेरा आपण सांगितलेल्या विधानास आपण होऊन मारला नाहीं, तर आपण सांगतों तें खरें असाच कोणाच्याही बोलण्याचा नेहमीं अर्थ होतो. म्हणूनच आधीं संशय प्रकट न करतां दुसऱ्यानें विरोध केल्यावर, 'असिद्ध म्हणा' हें म्हणणें, आपण प्रथम आततायीपणा करून दुसऱ्यानें विरोध केल्यावर त्यास अहिंसेचा उपदेश करण्यासारखें, लटपटीचें आहे.

'Suspend your judgment' अथवा 'निर्णय देऊं नका' हें म्हणणें खरोखरी निःस्वार्थीपणाचें नसून, तें आपणास प्रिय वाटणाऱ्या विधानास विरोध करणारास गप्प बसावयास लावण्याचा व आपल्या आवडत्या कल्पनेचा प्रसार करण्याचा कांहींचा तो एक (जाणून अथवा न जाणतां योजलेला) मार्ग आहे. यास प्रमाण हें कीं, असा उपदेश करणारे लोक त्याप्रमाणें स्वतः वागत नाहींत. आपल्या मताच्या विरुद्ध मतांचें प्रतिपादन करणाऱ्या लोकांवर टीका करतांना हे लोक, वादग्रस्त मुद्दयांसंबंधानेंही, 'शंकराचार्य चुकले' 'रानडे चुकले' 'स्पेन्सरला हें समजलें नाहीं' 'द्वैत

खोटें ' अशीं अनेक विधानें प्रसंगानुसार करीत असतात. त्या वेळीं हें तत्व ते जर पाळीत नाहींत, तर त्यांना हें तत्व दुसऱ्यास उपदेशण्याचा अधिकार मुळींच नाहीं; व तसें करणें हें केवळ विसंगतपणाचें व स्वार्थी आहे.

ज्या बाबतींत पुरावा अपुरा आहे व ज्या बाबतींत आपणही निश्चित विधान करीत नाहीं, त्या बाबतींतच ' इतक्यांत निर्णय देऊं नका ' हें इतरांस म्हणणें योग्य होईल.

## ( ५ ) शास्त्रज्ञांचीं सर्व मतें निर्भेळ सत्य काय ?

असें मुळींच नाहीं. ज्या विषयासंबंधानें शास्त्रज्ञांनीं विशेष अध्ययन, संशोधन, किंवा विचार केला नाहीं, त्या विषयासंबंधाचीं त्यांचीं मतें निर्भेळ सत्य असणार नाहींत; एवढेंच नव्हे तर ज्या विषयांचा त्यांनीं खास अभ्यास केला आहे त्या विषयावरील त्यांच्या मतांतही निर्भेळ सत्य असलेंच पाहिजे असें गृहीत धरण्याचें कारण नाहीं. त्यासंबंधानें एवढेंच मानावयाचें कीं, **स्वतःच्या खास विषयासंबंधीं शास्त्रज्ञांचें मत इतरांच्या मतापेक्षां कमी चूक अथवा जास्त यथार्थ असण्याचा संभव आहे.**

शास्त्रज्ञ कांहीं सर्वज्ञ नव्हेत. भ्रम, चूक, दुराग्रह, पूर्वग्रह इत्यादि दोष शास्त्रज्ञांमध्यें मुळींच नसतात असें नाहीं. नवीन शोधांना व कल्पनांना शास्त्रज्ञांकडूनही विरोध आल्याचीं अनेक उदाहरणें आहेत. प्रख्यात शास्त्रज्ञ फॅरॅडे यांनीं तारायंत्राच्या कल्पनेस विरोध केला होता असें सांगतात.

## कोणत्या शास्त्रज्ञांच्या मतास महत्त्व द्यावयाचें ?

अवलोकन व प्रयोग यांच्या साहाय्यानें केलेल्या नवीन शोधाच्या अभ्यासामुळें व इतर शास्त्रांच्या अभ्यासामुळें हेत्वाभास व संशोधनपद्धति यांशीं ज्यांचा परिचय झाला आहे त्या शास्त्रज्ञांचे मतास महत्त्व विशेष आहे. मात्र जेथें त्यांच्या वैयक्तिक भावनांचा विशेष संबंध येत असेल तेथें त्यांचेंही मत कलुषित असण्याचा संभव आहे हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. ( पान ८८-५ ब व पान ९९ पहा.)

## शास्त्रज्ञ हे मानवच ( व अर्थात् चुकीस पात्र ) आहेत.

इतर माणसांत जीं व्यंगें असतात तीं शास्त्रज्ञांमध्येंही असतातच, फरक एवढाच कीं, तीं कमी प्रमाणांत असतात. ज्या मनुष्यास 'उंच' म्हणतात तो आकाशाएवढा उंच असतो असें नाहीं, तर तो इतरांपेक्षां थोडा जास्त उंच असतो; तसेंच ज्ञानासंबंधानें आहे. 'ज्ञानी' समजलेल्या माणसांसंबंधानें, तसेंच शास्त्रज्ञांसंबंधानें एवढीच वस्तुस्थिति कीं, त्यांचें ज्ञान इतरांच्या पेक्षां जास्त असतें, पण तें पूर्ण असतें असें मुळींच नाहीं. तें तसें असतें तर जगांत वादाला किंवा नवीन शोधाला जागाच राहिली नसती. पण तशी जागा अमर्याद आहे, यावरून कोणाही मनुष्याचें ज्ञान किती मर्यादित असतें याची कल्पना येईल. उत्क्रांति, जीवाची उत्पत्ति, इत्यादि विषयांवर किती मतभेद शास्त्रज्ञांमध्यें आहे यावरून शास्त्रज्ञांचें मत म्हणजे निभेळ सत्य असें मानण्याचें मुळींच कारण नाहीं असें दिसून येईल. तथापि शास्त्रज्ञांनीं जगाचें अज्ञान किती नाहींसें केलें आहे व ज्ञानांत त्यांनीं किती भर घातली आहे हें लक्षांत घेतलें असतां **शास्त्रज्ञांचें मत पुरेसा पुरावा न देतां अव्हेरणें योग्य नाहीं** असें दिसून येईल. त्यांतूनही एकाद्या शास्त्रज्ञाचें केवळ वैयक्तिक मत विशेष विचारणीय नसेल, पण ज्या मतासंबंधानें बहुतेक शास्त्रज्ञांमध्यें एकवाक्यता आहे तें मत अव्हेरणें धोक्याचें आहे. तें मत पुढें अंशतः किंवा पूर्णपणें चुकीचें ठरणार नाहीं असें मात्र म्हणतां यावयाचें नाहीं. पण जोंपर्यंत त्या मतास विरोध करणारानें आपल्या मताच्या समर्थनार्थ बिनतोड–निदान भक्कम–पुरावा दिला नाहीं तोंपर्यंत त्याचें मत शास्त्रज्ञांच्या मतापेक्षां कमी ग्राह्य असेंच मानलें पाहिजे. तसें न मानणें म्हणजे नियम सोडून अपवाद खरा मानणें होय.

**ग्रंथकर्त्याची प्रार्थना**–सत्यप्रसारास साहाय्य व्हावें व असत्श्रद्धा कमी व्हावी या हेतूनें प्रस्तुत ग्रंथ लिहिला आहे; तरी तो हेतु अंशतः साध्य होवो अशी सत्यस्वरूपी नारायणास प्रार्थना आहे.

—ग्रंथकर्ता.

**आभारप्रदर्शन**—प्रस्तुत ग्रंथास आधार अनेक इंग्लिश ग्रंथांचा आहे व विशेष जरूर असेल तेव्हां त्यांचा नामनिर्देश त्या त्या ठिकाणीं केलाच आहे. ह्या सर्वांमध्यें Dr. Walsh यांचे Psycho-therapy म्हणजे 'मानसोपचार' ह्या पुस्तकाचा फार उपयोग झाला आहे. प्रकरण १ यांतील कांहीं व ३ व ४ यांतील पुष्कळशी माहिती या ग्रंथांतूनच घेतली आहे. तसेंच माहिती मिळविण्याच्या कामीं पुष्कळ डॉक्टर स्नेह्यांचा व इतर स्नेह्यांचाही उपयोग झाला आहे. ग्रंथकार ह्या सर्वांचा फार फार आभारी आहे. पुणें—१-७-१९३५.



## वाचकांस सूचना.

तात्त्विक विवेचन प्रथम वाचणें ज्यांना नको असेल त्यांनीं प्रस्तावना व १, ५, ६ हीं प्रकरणें प्रथम सोडावीं, व बाकीचीं प्रकरणें वाचून झाल्यावर शेवटीं तीं वाचावीं.



## चमत्कार दाखविणारांस पारितोषिक.

चमत्काराच्या खरेखोटेपणाचा निर्णय व्हावा म्हणून आम्ही 'चिकित्समंडळा'मार्फत पारितोषिक देण्याची जी व्यवस्था केली आहे, ती पुढें २६व्या पानांत दिली आहे. ही वाचकांनीं जरूर पहावी. पारितोषिकाची रक्कम सध्या मर्यादित आहे; म्हणून एक दोन पेक्षां जास्त पारितोषिकें देतां येतीलच असें नाहीं हें ध्यानांत ठेवावें.



## गूढचिकित्सामंडळ अथवा

# चिकित्सामंडळ†

**संस्थेचा हेतु**—पाहण्यास मिळतील त्या गूढ गोष्टींची चिकित्सा (म्हणजे चर्चा व संशोधन ) करून सत्याचा प्रसार करणें; व त्या द्वारें, कसलाही चमत्कार ऐकला कीं तो खराच मानावयाचा असा जो भोळसटपणा अथवा फाजील श्रद्धाळुपणा लोकांत आहे तो कमी करून लोकांमध्यें चिकित्साबुद्धि व सावधगिरी वाढविणें.

**संस्थेची स्थापना**—ही संस्था १९३० मध्यें दसऱ्याला स्थापित झाली. हिच्या संबंधानें १३-११-३० च्या केसरींत पुढीलप्रमाणें माहिती दिली होती.

## "पुण्यांतील गूढचिकित्सामंडळ.

आजपर्यंतच्या ज्ञानवृद्धीचा इतिहास पाहिला तर असें दिसून येतें कीं, ज्ञानाची उत्पत्ति फार सावकाश होते. ज्याप्रमाणें शुद्ध धातु इतर अनेक पदार्थोंबरोबर मिसळलेली असते व ती मोठ्या प्रयासानें अशुद्ध पदार्थांपासून वेगळी करावी लागते, त्याप्रमाणें ज्ञान अज्ञानाशीं मिसळलेलें असतें व तें मोठ्या प्रयत्नानें अज्ञानापासून वेगळें करावें लागतें. ज्ञानाच्या ह्या शुद्धीकरणास हजारों वर्षांचा काल जावा लागतो. 'कावळ्यास एक डोळा असतो,' 'कुंभारणीनें भक्षणार्थ धरून आणलेली अळी कुंभारणीच्या ध्यासानें कुंभारीण बनते,' 'ढगावर ढग आपटल्यानें वीज उत्पन्न होते,' 'आध्यात्मिक किंवा मंत्राच्या सामर्थ्यानें सत्पुरुष अग्नीची दाहकता नाहींशी करतात तेव्हांच चरांतील निखाऱ्यावरून मनुष्यास चालतां येतें नाहींतर चालतां येत नाहीं,' इत्यादि शेंकडो मिथ्या समज सुशिक्षित लोकांमध्येंहि हजारों वर्षें प्रचलित आहेत. ह्यावरून असत्यनाश होण्यास

---

†नांव लहान असावें म्हणून पूर्वींच्या गूढचिकित्सामंडळ या नांवाऐवजीं **चिकित्सामंडळ** असें नवें नांव या संस्थेनें धारण केलें आहे.

किती काल जावा लागतो ह्याची कल्पना होण्याजोगी आहे. अज्ञान हें हानीस कारणीभूत होतें. भोंदू लोक इतरांस कसें फसवितात याच्या गोष्टी वर्तमानपत्रांत वारंवार येतात. ‘ ताईत ’, ‘ कवच ’ इत्यादिकांसंबंधाच्या जाहिरातींचा वर्तमानपत्रातून केवढा सुळसुळाट आहे व १९२०–२१ सालीं पुण्यास ‘जर्मन बायांची’ अथवा देवीची साथ होती, त्या वेळीं बाया बोळावण्याच्या थोतांडापायीं पुण्यांतील मागसलेल्या लोकांचे निदान दहावीस हजार रुपये खर्च झाले, यावरून अज्ञानामुळें किती नुकसान होतें याची कल्पना होण्याजोगी आहे. अज्ञानाच्या मुळाशीं सूक्ष्मावलोकनाभाव व चिकित्साभाव अथवा अंधश्रद्धा हीं आहेत. म्हणूनच अज्ञान नाहींसें करण्याचा एक मार्ग गूढ चमत्कार व भ्रम यांचें संशोधन करून त्यांतील सत्य प्रकट करणें व तदनुरोधानें अंधश्रद्धा कमी करून चिकित्साबुद्धि व शोधक बुद्धि वाढविणें हें आहे.

या संस्थेजवळ मोठासा फंड नाहीं व वाटेल तेथें जाऊन वाटेल तेवढा वेळ खर्च करण्यास या संस्थेच्या सभासदांना फुरसत नाहीं. यास्तव संस्थेनें प्रारंभीं मर्यादित कार्य करण्याचें ठरविलें आहे. तें हें कीं, पुण्यांत घडणाऱ्या चमत्कारांचें संशोधन करावयाचें. ‘ अमकी बाई अंगांत आली असतां कानडी बोलते,’ ‘अमक्या बाईच्या गळ्यास एकदम फास बसतो’, ‘ अमकी बाई दगड ओकते,’ ‘ अमक्या इसमाच्या हातांतून एकाएकी आगकाड्या निघतात,’ ‘ अमक्या घरांत कारणांवांचून वस्तू पेटतात ’, ‘ अमका पूर्वजन्मींची हकीकत सांगतो ’ इत्यादि घडल्याचे अनेक लोक सांगतात. असे चमत्कार पूर्वी घडले असले, तर ते यापुढें घडणेंहि शक्य आहे. यास्तव ह्या व अन्य चमत्कारांचें शोधन आम्हांस करावयाचें आहे. असे चमत्कार पुण्याबाहेर घडत असतील तर तेथेंहि स्वतः अथवा प्रतिनिधींच्या मार्फत संशोधन करण्याचा आम्ही शक्य तर प्रयत्न करूं. पण खर्चाच्या किंवा अन्य अडचणीमुळें, ही गोष्ट करतां येईल अशी खात्री नाहीं.”

### मंडळाचे सभासदांतील प्रमुख गृहस्थ.

प्रो. वा. म. जोशी, प्रो. जी. बी. कोल्हटकर, प्रो. वि. ब. नाईक प्रो. व्ही. के. जोग, प्रो. न. ग. दामले, प्रो. त्र्यं. भि. हर्डीकर, प्रो.

भागवत, प्रो. म. वि. आपटे, डॉ० श्री. कृ. म्हसकर, डॉ० दि. धों. कर्वे...इ०.

चिटणीस रा. ज. गोखले.

**वर्गणी**—सभासदत्वास वर्गणीची अट नाहीं.

**सभा**—जरूरीप्रमाणें खास बैठकी बोलावण्यांत येतात.

ठराविक बैठकी-प्रत्येक इंग्रजी महिन्यांतील पहिल्या बुधवारीं ६॥वाजतां.

**कचेरी**—चिटणीसांचें घर, १७, डे० जि० कॉलनी, पुणें ४.

## मंडळाचे कार्याविषयीं खुलासा

( १ ) ज्यांसंबंधानें लोकांत गैरसमज आहे अशा गूढ चमत्कारांची चिकित्सा करणें हा मंडळाचा मुख्य हेतु आहे. तथापि, गूढ विषयासंबंधीं प्रयोग करून सिद्धांत स्थापित करण्याचें काम, वेळ व द्रव्यसाहाय्य यांच्या कमतरतेमुळें, या मंडळास हातीं घेतां येत नाहीं; म्हणून

( अ ) जे कोणी गूढ चमत्कार दाखविण्यास तयार असतील त्यांच्या चमत्कारांचें अवलोकन करून त्यांतील विश्वासार्ह भाग कोणता हें ठरविणें, व

( ब ) संधि येईल त्याप्रमाणें शास्त्रीय म्हणजे विगमननिगमनपद्धतींनीं अथवा तर्कशास्त्रानुसार चमत्कारांची मीमांसा करून वस्तुस्थिति प्रसिद्ध करणें,

हीं कामें करण्याचें मंडळानें सध्यां ठरविलें आहे.

( २ ) कोणी कांहीं चमत्कार प्रसिद्ध केला, कीं तो जाऊन पाहणें व तो खरा कीं खोटा हें जाहीर करणें हें काम मंडळानें अंगावर घेतलें आहे अशी जी कांहींची समजूत आहे ती बरोबर नाहीं. ह्यासंबंधाचा खुलासा, प्रारंभीं केसरींत प्रसिद्ध केलेल्या माहितींत,आम्हीं केला होता.(पा.२४पहा)

(३) **चमत्कारसंशोधनाविषयीं अटीः**—चमत्कारांची सत्यता पाहण्याचे कामीं अडचणी येतात त्या पुढीलप्रमाणेंः—चमत्कार घडून गेल्यावर त्यासंबंधानें ज्या शंका येतात त्यांचें निरसन मागाहून करणें शक्य नसतें. चमत्कार फिरून पहावा म्हणावें, तर चमत्कार करणारे लोक म्हणतात "आम्ही काय तुमचे नोकर आहोंत कीं काय? ही गोष्ट तुम्हांस दाखविण्याची

आम्हांस जरूरी काय!" अथवा "चमत्कार ठराविक वेळीं अथवा हुकमी होत नाहीं; तो कधीं कधीं महिन्यांतही होत नाहीं; ज्यांना पाहावयाचा असेल त्यांनीं वर्षभर आमच्याबरोबर राहिलें पाहिजे" इ. असें म्हटलें, म्हणजे चमत्कार पाहणें अशक्य होतें. यास्तव एकादा चमत्कार खरा अशी आमची मान्यता ज्यांना पाहिजे असेल त्यांनीं पुढील अटी मान्य केल्या पाहिजेत. मात्र आमची मान्यता लोकांनीं घ्यावी असा आमचा आग्रह मुळींच नाहीं हें ध्यानांत ठेवावें.

(अ) चमत्काराचें स्वरूप काय याचा पूर्ण खुलासा केला पाहिजे. चमत्कारास अपवाद, अडचणी वगैरे कांहीं असतील तर त्या स्पष्टपणें आधीं सांगितल्या पाहिजेत. जो चमत्कार ज्ञात नियमाशीं विसंगत असेल किंवा आम्हांस अमान्य तोच आम्ही पाहूं इच्छितों.

(ब) चमत्कार ४।५ वेळां तरी पाहण्याची संधि दिली पाहिजे.

(क) चमत्काराची जागा व चमत्कार करणाऱ्या व्यक्ति यांचा झाडा घेण्याची आम्हांस जरूरी वाटल्यास तीस हरकत असतां उपयोगी नाहीं.

(ड) आमच्याबरोबर इतर कांहीं माणसें, व विशेष प्रसंगीं हत्यारबंद इसम, आणण्यास हरकत नसावी.

( ई ) आमच्या प्रवासाच्या वगैरे खर्चांची रक्कम व त्याशिवाय पन्नास रुपये एवढी रक्कम केसरीचे संपादक श्री० केळकर अथवा पुण्यांतील एकाद्या कॉलेजचे प्रिन्सिपाल यांचेकडे अगाऊ अनामत ठेविली पाहिजे. चमत्कार न घडल्यास अथवा तो खोटा ठरल्यास ही रक्कम हरली गेली असें समजून ५० रुपयांची रक्कम पुणें अनाथविद्यार्थि गृह या संस्थेस दिली जाईल, व प्रवासाच्या व अन्य खर्चाबद्दलची रक्कम आम्हीं घेऊं.

( ४ ) चमत्कार खरा ठरल्यास आम्हीं प्रवासखर्च न घेतां, ५० रुपयांची अनामत रक्कम परत करूं व चमत्कार दाखविणारांना, किंवा त्यांनीं सांगितलेल्या सार्वजनिक हिताचे संस्थेस, ५० रुपये देऊं. ही रक्कम आम्ही वरीलपैकीं कोणाही गृहस्थांचे जवळ अगाऊ अनामत ठेवण्यास तयार आहोंत.

( ५ ) 'आमची समजूत बरोबरच आहे, तिची चिकित्सा करण्याची आमची इच्छा नाहीं, तिचा अनुभव तुम्हींच पहा, अनुभव न येईल तर चूक कोठें होत आहे हें पहा व योग्य मार्गानें प्रयत्न करा ' असें जे म्हणतात त्यांच्याशीं आम्हांस वाद मुळींच कर्तव्य नाहीं. कारण येथें विवक्षित वस्तु सिद्धच आहे असा कायमचा पूर्वग्रह आहे व अनुभवाचा जो हवाला दिला आहे तो संदिग्ध आहे. कारण अनुभव आला नाहीं म्हणून प्रतिपक्षीयानें सांगितलें, तर ' पुरेसा प्रयत्न केला नाहीं', ' योग्य मार्गानें गेला नाहींत', ' पूर्ण श्रद्धा ठेवली नाहीं ' ही सबब सांगण्यास पुरस्कर्ते मोकळे राहणारच.

शंका घेण्यास कसलीही जागा राहणार नाहीं अशा भिन्नभिन्न परिस्थितींत अनेक प्रयोग करून दाखविण्यास जे तयार असतील त्यांच्यांशींच सहकार्य व वाद करण्यास आम्हीं इच्छितों. कारण, त्यावांचून खरी चिकित्सा होणें शक्य नाहीं. कोणत्याही मुद्द्यासंबंधानें शंका न राहण्यास निदान दहापांच प्रयोग होणें अवश्य आहे व इतके दाखविण्यास चमत्कारांच्या पुरस्कर्त्यांनीं तयार असले पाहिजे.

# भुताटकीच्या चमत्कारांविषयीं आसपासच्या सुशिक्षित लोकांचें कर्तव्य.

'कान्हूर' येथें घडणाऱ्या भुताटकीच्या चमत्कारांसंबंधानें पुढील लेख 'ज्ञानप्रकाश'मध्यें प्रसिद्ध केला होता. असें चमत्कार जेथें घडतात तेथील लोकांस या लेखांतील माहिती उपयोगी पडण्याजोगी आहे म्हणून ती पुढें दिली आहे.

## "कान्हूरच्या चमत्कारांचें गूढ.

नगर जिल्ह्यांतील कान्हूर या गांवीं ठुबे या शेतकऱ्याचे घरीं घडलेले भुताटकीचे म्हणून समजले जाणारे जे चमत्कार जाहीर झाले आहेत त्यांचीं संभाव्य कारणें पुढील प्रकारचीं होतः—

( १ ) घरांतील किंवा शेजारचा कोणी मनुष्य वैर उगवण्यासाठीं किंवा दहशत बसवून स्वार्थ साधण्यासाठीं अंथरुणांतील कपड्यांना अथवा खुंटीवर किंवा दोरीवर टाकलेल्या कपड्यांना बिब्ब्याचें तेल अथवा शेराचा चीक यासारखा अपायकारक पदार्थ लावीत असेल व त्यामुळें ते कपडे वापरणारांच्या अंगास तो पदार्थ लागून त्वचेस विकार होत असेल.

( २ ) हिस्टेरिया ( अथवा अपतंत्रक किंवा भूतोन्माद ) हा विकार झालेल्या कांहीं स्त्रियांचें मन विकृत झालेलें असतें.त्यांना हाताला हात घट्ट चिकटून बसणें, दांतखिळी बसणें, पोटांत गोळा उठणें वगैरे विकार होतातच; पण स्वतःचे दागिने लपवून ठेवणें, स्वतःस बांधून घेणें अशा अनेक चेष्टा अशा स्त्रिया न जाणतां करतात, व त्यांची जाणीव त्यांना नसल्यामुळें ह्या चेष्टा दुसऱ्या कोणी केल्या असें त्यांना खरोखरीं वाटतें.

( ३ ) केवळ भीति व अनिष्ट भावना यामुळें गांधी अथवा पुरळ उठणें, इसब यांसारखे त्वचेचे विकार उद्भवतात. डॉ. वॉल्श हे आपल्या "Psycho-therapy" या ग्रंथांत पुढीलप्रमाणें लिहितात " Cabinet crises in England are found to be followed by the re-

currence of eczematous conditions in older members of the Cabinet"– पान ४९२.

( ४ ) अज्ञेय अथवा दैविक कारण.

## कारणांची चिकित्सा व उपाय

( १ ) वरील चमत्कारांचें कारण वरील कारणांपैकीं १ हें नव्हे याबद्दल खातरी करून घेण्यास घरांतील जाणत्या माणसानें असें केलें पाहिजे कीं, कपडे परटी सोडयाच्या पाण्यांत ( किंवा डॉक्टरांकडून आणलेल्या औषधी पाण्यांत) घालून ते स्वच्छ धुवून व उन्हांत आपल्या देखरेखीखालीं वाळवून मग माणसांना वापरावयास दिले पाहिजेत, व शेजारी संशयित माणसें येऊं न दिलीं तरी अंगावर फुल्या वगैरे उठतात कीं काय हें पाहिलें पाहिजे. असा अनेक वेळां अनुभव आला आहे कीं, अशा चमत्कारांचा बोभाटा केला, स्वच्छता केली, व माणसांवर पाळत ठेवली म्हणजे हे चमत्कार होणें बंद होतें.

( २ ) चमत्कारांचें कारण नंबर २चें नव्हें याची खात्री करून घेण्यासाठीं हें करणें जरूर आहे कीं, ज्यांच्यासंबंधानें हें चमत्कार घडतात त्यांना हिस्टेरियासारखा कांहीं विकार आहे कीं काय हें वैद्याकडून पाहिलें पाहिजे व त्यांच्यावर सक्त पहारा ठेवून चमत्कारांतील चेष्टा त्यांच्याकडूनच केल्या जात नाहींत याबद्दल खबरदारी घेतली पाहिजे.

अपतंत्रक किंवा भूतोन्माद हा विकार असेल तर त्यांवर वैद्यकीय उपाय व दांताखिळी बसणें वगैरे विकारांस मानसोपचारशास्त्रांतील 'सूचना' ( suggestion ) हा उपाय यांचा उपयोग करावा. "मी एक, दोन, तीन, म्हणतों व 'तीन' म्हणतांच तुझे मिटलेले हात मोकळे होतील," असें सांगून जोरानें 'एक, दोन, तीन' असे म्हणूना तिन्हीच्या आंकडयाबरोबर दोन्ही हात ओढल्यास ते मोकळे होतात, असा कित्येक वेळां अनुभव येतो. तरी कुशल व व्यवहारचतुर माणसानें हा उपाय करून पहावा. त्यासाठीं जरूर तर मांत्रिकाचा अविर्भावही करावा.

( ३ ) भांडणतंटे, त्रास, भीति यांनीं हें विकार झाले असतील, तर त्यांसंबंधाच्या भावना घालविण्यास शक्य ते उपाय करावे.

( ४ ) कारणें नंबर १–३ नसून ह्या चमत्कारांचें कारण दैविक आहे असें वाटेल तर कुटुंबांतील माणसांची ज्या देवतेवर श्रद्धा असेल तिची प्रार्थना करून अंगारा लावावा. श्रद्धा ठेवल्यास देवापेक्षां मोठा मांत्रिक कोणीच नाहीं.''

---

## अंधश्रद्धेचें स्वरूप, तिचा प्रसार व दुष्परिणाम यांसंबंधानें कांहीं उतारे:—

All solid progress in the world consists of an increase in rationality.

Until some method of teaching virtue has been discovered, progress will have to be sought by improvement of intelligence rather than of morals. One of the chief abstacles to intelligence is credulity.

Credulity is a greater evil in the present day than it ever was before, because owing to the growth of education it is much easir to spread misinformation.

—Page 147, " Sceptical Essays " by Bertrand Russell.

Faith may be defined briefly as an illogical belief in the accuracy of the improbable, or psycho-analytically as a wish neurose.

A man full of faith is simply one who has lost ( or never had) the capacity for clear and realistic thought.

...He is incurable, for disappointment being essentially an objective phenomanon, cannot affect his subjective infirmity.

page 122, " Selected Prejudices " by Mencken.

" हिंदुस्तानांत व महाराष्ट्रांत मंत्रतंत्र व जादू टाणेटोणें यांचें प्राबल्य पूर्वीपासून आहे. सध्यांही फारसे कमी झालें नाहीं. जास्तच झालें आहे असें म्हणण्यास आधार आहे. नव्या इंग्रजी शिकल्यासवरल्या लोकांत नवी खुळें माजत आहेत."

—पान ५४, भारत–इतिहाससंशोधक मंडळाच्या १८३२ सालच्या अहवालांतील कै० राजवाडे यांचा 'मंत्र, तंत्र व जादू टाणेटोणे' हा लेख.

"सर्जेराव घाडग्याच्या दुष्टपणाला व क्रौर्याला उत्तरेकडील गुलाम कादराचीच उपमा साजेल. परंतु त्याची सुद्धां ईश्वरभक्ति इतकी गाढ होती कीं, हा आपल्या हातांत नेहमीं चंदनी मण्यांची माळ घेऊन भगवंतांचें नामस्मरण करीत असे, व प्रसंगोपात् ब्राह्मणांना व मुसलमान फकिरांनाही दानधर्म करण्यास तो कधींच मागें पुढें पाहात नसे."

" इतिहासाचार्य राजवाडे, एतद्देशीय राजेरजवाड्यांनीं केलेल्या या मंत्र-तंत्राच्या प्रयोगांविषयीं, म्हणतात, "मंत्रांच्या साहाय्यानें शत्रूला, जिंकण्याचा खुळा उद्योग पेशवाईच्या शेवटीं महादजी शिंदे, टिपू सुलतान, दौलतराव शिंदे, बाजीराव वगैरे व्यक्तींनीं केला, परंतु त्यांत त्यांना फारसें यश आलें नाहीं. अजूनहीं ग्वाल्हेर, नागपूर, बडोदा वगैरे ठिकाणीं जुन्या द्रविड मंत्र-शास्त्र्यांचीं जीं घरें आहेत, तीं मंत्रशास्त्रानें यजमानाचा उत्कर्ष व शत्रुला अपकर्ष होत नाहीं, असें स्पष्ट शब्दांत सांगत आहेत. तथापि हल्लींच्या काळांतही आमचे लोक या खुळाला बळी पडतात याला काय म्हणावें !"

" आपल्या वैऱ्यांवर भुतें घालणें, त्यांच्याकडून त्यांचीं घरें जाळणें, चेटुक करणें वगैरे प्रकार मराठी रियासतींत नेहमींच चालू होते. कोंकण-प्रांतांत तर या भुताळ्यांचा इतका सुळसुळाट झाला होता कीं, पेशव्यांना त्यांच्या बंदोबस्तासाठीं एक स्वतंत्र खातेंच निर्माण करावें लागलें."

'रत्नदीप' मासिकाच्या दुसऱ्या अंकांतील "मराठेशाहींतील सामाजिक परिस्थिति" हा लेख.

---

## शुद्धि

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ११ | शेवटची ओळ | ६व्या | ९व्या |

# लोकभ्रम

## प्रकरण पहिलें

### लोकभ्रम म्हणजे काय व त्याचीं सर्वसामान्य कारणें.

**लोकभ्रम याचा अर्थ काय?**

भ्रम म्हणजे खोटी समजूत अथवा अज्ञानाच्या ठिकाणीं ज्ञानाचा भास. कांहीं भ्रम तात्पुरते किंवा व्यक्तीपुरते असतात, तर कांहीं एकाद्या जनसमूहाला अथवा समाजाला साधारण असतात. भोंवळ झालेल्या माणसाला आपणाभोंवतालचे पदार्थ फिरत आहेत असें दिसतें व पित्त झालेल्या माणसाला भोंवतालच्या पदार्थांचा रंग पिवळसर दिसतो. कांहीं रंगांध माणसांस हिरवा रंग पांढराच दिसतो......इ. ह्या खोट्या समजुती त्या त्या व्यक्तीपुरत्या असतात, म्हणून हा वैयक्तिक भ्रम होय. पण कांहीं खोट्या समजुती अनेकांस साधारण असतात. उदा०–भुताचे पाय उलटे असतात; मांजर आडवें गेल्यास काम होत नाहीं; घुब्रडास धोंडा मारला तर तो तें उगाळतें, व जसजसा धोंडा झिजतों तसतसा धोंडा मारणारा मनुष्य झिजतो व शेवटीं मरतों......इ. लोकांमधील अशा ज्या सर्वसामान्य खोट्या समजुती असतात त्यांस लोकभ्रम असें नांव आहे. ज्या चमत्कारांस सत्याचा पुरेसा आधार नाहीं असे चमत्कारही भ्रम या वर्गांतच येतात.

पुष्कळ शास्त्रज्ञ व तत्त्वज्ञ यांच्या मतें बऱ्याच ( सर्व नव्हे ) धार्मिक समजुती लोकभ्रमच आहेत. तथापि धार्मिक समजुतींस लोकभ्रम हा शब्द व्यवहारांत सामान्यतः लावीत नाहींत. याचें मुख्य कारण असें दिसतें कीं, प्रत्येक धर्मात कांहीं गोष्टी गृहीत धरलेल्या असल्यामुळें, इतरांच्या अशा समजुतींना लोकभ्रम म्हटलें तर आपल्या समजुतींनाही हेंच नांव इतर लोक देतील अशी लोकांना भीती वाटत असावी. अद्वैत्यांच्या मतें जीवात्मा व परमात्मा एक, तर वैष्णवांच्या मतें जीवात्मा परमात्मा हें अगदीं भिन्न;

मुसलमान व ख्रिस्ती यांच्या मतें माणसास पुनर्जन्म नाहीं, तर हिंदूंच्या मतें तो आहे.पण, अशा प्रकारच्या आपल्या समजुतींच्या विरुद्ध समजुतींना लोक-भ्रम हें नांव लोक सामान्यतः लावीत नाहींत. याचें वरील कारणाशिवाय दुसरें एक कारण असें दिसतें कीं, कांहीं गोष्टींवर श्रद्धा ठेवणें हें धर्माच्या दृष्टीनें सर्वांस आवश्यक आहे असें बऱ्याच लोकांना वाटतें.

ज्या धार्मिक गोष्टींविषयीं मतभेद आहे अशा कांहीं गोष्टी प्रस्तावनेंत दिल्या आहेत त्या पहा.

धार्मिक कल्पनांपैकीं पुष्कळ कल्पनांसंबंधानें एकंदरींनें मतभेदच आहे; तथापि हिंदूंच्या धार्मिक कल्पनांपैकीं अद्वैत व ब्रह्मवाद ही कल्पना बरेच आधुनिक शास्त्रज्ञ व तत्त्वज्ञ यांना मान्य झाली आहे असें म्हणतां येईल. याच्या खालोखाल पण निराळ्या अर्थानें अंशतः मान्य झालेल्या कल्पनाः— व्यक्तीचा नव्हे पण जातीचा पुनर्जन्म, सामाजिक अथवा राष्ट्रीय (वैयक्तिक नव्हे ) कर्मांचा परिपाक......ह्या होत.

( धार्मिक समजुतींच्या खरेखोटेपणाचा विचार प्रस्तुत ग्रंथामध्यें फारसा केलेला नाहीं. )

## भ्रमोत्पत्तीची मीमांसा

पुष्कळ भ्रमांचा प्रसार अंधश्रद्धा व गतानुगतिकता या मनोधर्मांमुळें होतो, हें खरें आहे; पण हें त्यांचें मूळ कारण नव्हें. भ्रम कोठेंतरी नव्यानें किंवा प्रथम उत्पन्न होतो, व पुढें अंधश्रद्धा अथवा गतानुगतिकत्व यामुळें त्याचा प्रसार होतो; यास्तव भ्रमाची उत्पत्ति समजण्यास तो प्रथम कसा उत्पन्न होतो हें पाहिलें पाहिजे.

उत्पत्तिभेदावरून भ्रमांचे दोन प्रकार होतातः—( १ ) प्रत्यक्ष व ( २ ) अप्रत्यक्ष. दुसऱ्या भ्रमांपासून किंवा चुकीच्या समजुतींपासून झालेला भ्रम तो अप्रत्यक्ष होय व तसा न होता नव्यानें उत्पन्न झालेला तो प्रत्यक्ष होय.

भ्रम प्रत्यक्ष असो वा अप्रत्यक्ष असो; त्याचें मूळ अज्ञानांत असतें. अज्ञानाचें एक महत्त्वाचें कारण असम्यग्निरीक्षण हें आहे, म्हणून बऱ्याच भ्रमांचेंही कारण हेंच सामान्यतः मानतां येईल.

असम्यग्निरीक्षणाचे दोन प्रकार मानतां येतील. ( १ ) कुनिरीक्षण, व ( २ ) निरीक्षणाभाव.

कुनिरीक्षण ( कु=वाईट रीतीनें केलेलें ) म्हणजे इंद्रियांस भासमान होणाऱ्या गोष्टींचें ग्रहण विचारपूर्वक न करणें, अथवा आपणांस जें दिसतें ( ऐकूं येते इ० ) त्यामध्यें दुसऱ्याची लबाडी अथवा आपला भ्रम अथवा भावना इत्यादिकांमुळें उत्पन्न होणाऱ्या आभासाचा भाग राहूं नये याबद्दल पूर्ण खबरदारी न घेणें.

मध्यस्थांनीं* (mediums) अथवा देवऋषींनीं (विशेषतः पाश्चात्य) दाखविलेल्या भुताटकीच्या वगैरे चमत्कारांत कुनिरीक्षणामुळें भ्रम होण्याचा संभव किती असतो यासंबंधानें, १९०८ सालीं भरलेल्या Psychical Research Society ह्या इंग्लंडांतील प्रसिद्ध गूढचिकित्सामंडळाच्या वार्षिक अधिवेशनाच्या वेळीं अध्यक्षस्थानीं असणाऱ्या मिसेस सिज्‌विक ( प्रख्यात प्रो० सिज्‌विक याच्या पत्नी) यांनीं केलेल्या अध्यक्षीय भाषणांत, पुढीलप्रमाणें विधान केलें आहेः—

Besides an extended experience of trickery and credulity, we have acquired a much more definite knowledge of the possibilities of *mal-observation*. भावार्थ— ' मध्यस्थांच्या लबाड्या व पाहणारांची अंधश्रद्धा यांशिवाय कुनिरीक्षणामुळें भ्रम किती उत्पन्न होतात याचाही आपणांस अनुभव आला आहे. '

असम्यग्निरीक्षण हें कारण पुष्कळ भ्रमांस लागू आहे. तथापि हें कारण फार स्थूल व व्यापक आहे म्हणून तेवढ्यानें पूर्ण उलगडा होण्यासारखा नसल्यानें भ्रमाची विशिष्ट कारणें काय आहेत हें आपण पाहूं.

भ्रम हें दूषित अथवा विपर्यस्त ज्ञान होय. ज्ञान होण्यास सामान्यतः पुढील तीन गोष्टींची आवश्यकता असतेः—

( १ ) बाह्य वस्तु अथवा इंद्रियविषय (अथवा थोडक्यांत "विषय").

( २ ) विषयाचा बुद्धीशीं संबंध येण्यास अथवा विषय बुद्धींत शिरण्यास द्वारें, म्हणजे ज्ञानाचीं करणें अथवा ज्ञानेंद्रियें.

---

* मृताचा आत्मा ज्या मनुष्याचे द्वारें आपले विचार कळवितो त्यास मध्यस्थ म्हणतात.

( ३ ) इंद्रियद्वारा होणाऱ्या संवेदनांचा अर्थ करणारी बुद्धि.

भ्रम हें प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष विपर्यस्त ज्ञान होय. अर्थात् भ्रम उत्पन्न होण्यास ज्ञानाच्या वरील तीन साधनांपैकीं एकांत अथवा अनेकांत कांहीं तरी दोष झाला पाहिजे. यावरून भ्रमाचे प्रकार पुढीलप्रमाणें होतील :—

( I ) विशिष्ट–विषयस्थितिजन्य म्हणजे विषयाच्या अथवा बाह्य वस्तूंच्या विशिष्ट स्थितीमुळें होणारे भ्रम,

( II ) इंद्रियदोषामुळें होणारे भ्रम, व

( III ) मनोदोषामुळें होणारे भ्रम.

I

## विशिष्ट-विषयास्थिति-जन्य भ्रम.

विशिष्ट वस्तुस्थितीमुळें होणाऱ्या आभासाचे प्रकारः—

( अ ) दृष्टीस होणारे आभास—

( १ ) पाण्यानें भरलेलें भांडें अथवा हौद याचा तळभाग वर उचललेला दिसणें, पाण्यांत अर्धी बुडालेली कांठी वाकडी दिसणें, मृगजल, क्षितिजाजवळचे खस्थ गोल मोठे दिसणें; तसेंच क्षितिजाजवळील टेकडीवरील झाडें, माणसें इत्यादि पदार्थ वाजवीपेक्षां मोठें दिसणें. हे सर्व चमत्कार किरणांच्या वक्रीभवनामुळें होतात.

( २ ) खिडकीपलीकडील जवळचे लहान पदार्थ, ते दूर आहेत अशा समजुतीमुळें, मोठें दिसणें इ०.

( ३ ) तांबडा–हिरवा, निळा–पिवळा...अशा पूरक रंगांच्या जोड्या आहेत. या जोडींतील एका रंगाच्या ( उ० तांबडया ) पदार्थाकडे पाहून नंतर पांढऱ्या पृष्ठभागाकडे ( पांढऱ्या कागदाकडे किंवा भिंतीकडे ) पाहिलें तर त्यावर त्या पदार्थाची प्रतिमा, रंगांच्या या जोडीपैकीं दुसऱ्या रंगांत ( हिरवी ) दिसते.

( ४ ) पेटविलेली उदबत्ति फिरविली असतां तांबडें वेटोळें दिसणें, सिनेमाचे चित्रपटांतील चित्रें भिन्न असतां एकच चित्र हालचाल करीत आहे असें दिसणें इ०.

दृष्टीस होणाऱ्या आभासांचीं पुढील उदाहरणें पाहाः—

१–४ आकृतींतील रेषांच्या जोड्या पहा. त्यांतील अ ब पैकीं कोणती जास्त लांब आहे हें आपल्याशीं ठरवा. १–३ आकृतींतील जोडयांमध्यें ब पेक्षां अ व आ० ४ मध्यें अ पेक्षां ब जास्त लांब आहे असें दिसेल; पण वास्तविकपणें ह्या सर्व जोड्यांतील दोन्ही रेषा सारख्या लांबीच्या आहेत.




आ० १.




आ० २.




आ० ३.




आ० ४.



आ० ५.





आ० ६.

५व्या आकृतींतील अ, ब, आणि ६व्या आकृतींतील अ, ब, क, ह्या तिरप्या रेषा एकाच सरळ रेषेंत आहेत हें, त्यांना कागदाची सरळ बाजू लावून पाहिल्यानें दिसून येईल; पण दृष्टीला त्या तशा दिसत नाहींत.



आ० ७.

७व्या आकृतींतील सातही तिरप्या रेषा समांतर आहेत; पण दृष्टीस त्या तशा दिसत नाहींत.




आ० ८.

८व्या आकृतींतील ख पेक्षां क कंस मोठा, व क पेक्षां ग कंस मोठा दिसतो; पण ते सर्व समान वर्तुलांचे भाग आहेत.




आ० ९.

९व्या आकृतींतील तीन काटकोनचौकोनांपैकीं लहान कोणता, उभट कोणता व आडवा कोणता हें सांगा. क लहान वाटतो, ख उभट वाटतो व ग रुंदट अथवा आडवा वाटतो; पण ते सर्व पूर्णपणें समान आहेत.

 

१०व्या आकृतींतील टिपक्याकडे कांहीं वेळ पहा व नंतर ते आपणापासून अतिशय दूर अंतरावरच्या कागदावर आहेत अशी कल्पना करून त्यांचेकडे पहा; म्हणजे त्या दोन टिपक्यांचे चार टिपके दिसूं लागतील.





आ० ११.

११व्या आकृतींतील पिंजरा व पक्षी यासंबंधानें आकृति १०प्रमाणें प्रयोग करा म्हणजे थोडया वेळानें पक्षी पिंजऱ्यांत शिरल्याचा भास होईल.




आ० १२.

१२ आकृतींतील टोपीची उंची जास्त कीं रुंदी (आडवी लांबी) जास्त हें मनाशीं ठरवा. उंची जास्त आहे असें वाटेल. पण प्रत्यक्ष मोजून पाहतां क ख ही उंची ग घ या रुंदीपेक्षां जास्त नाहीं असें दिसून येईल.

'चक्षुर्वैसत्यं' या तत्त्वास अनुसरून ज्या प्रत्यक्ष दर्शनावर आपण इतका विश्वास ठेवतों त्या प्रत्यक्ष दर्शनामध्यें आभासाचा किती संभव आहे तें वरील उदाहरणांवरून लक्षांत घ्या; म्हणजे विचार अथवा सम्यगवलोकन यांची कसोटी लावल्यावांचून केवळ दृक्प्रत्यय हें प्रमाण किती भ्रामक आहे तें दिसून येईल.

( ब ) **कानास होणारे आभास**—आवाज कानांत शिरतांना ज्या बाजूनें ( बाजूच्या खिडकींतून वगैरे ) येतो, तिकडे तो आवाज उत्पन्न झाला आहे असें वाटतें; उदाहरणार्थ–पूर्वेकडे मनुष्य गात असतां, आवाज घराच्या दक्षिणेकडील खिडकींतून आला तर गाणें दक्षिण बाजूस चालू आहे असें वाटतें. तसेच वाऱ्याच्या विशिष्ट स्थितींत मनुष्याच्या (किंवा अज्ञानी लोकांच्या कल्पनेमुळें ) भुताच्या किंवा राक्षसाच्या आवाजाचा भास होतो.

( क ) **त्वगिंद्रियास होणारे आभास**—कंपासाच्या दोन टोंकांत पाव इंच अंतर ठेवून, तीं दोन्हीं टोकें एकदम हातावर टेकतील अशा रीतीनें, कंपास मनगटाच्या मागल्या बाजूस लावला, तर दोन टोकें भासण्याऐवजीं एकच टोंक टेकलें आहे असें वाटतें. हेंच अंतर एक इंच ठेवून कंपास पाठीच्या निरनिराळ्या भागास लावला तर तसाच भास होतो.

II

## इंद्रियदोषजन्य अथवा विकृतिजन्य भ्रम—

**डोळे**—डोळ्यांतील व्यंगामुळें कांहीं माणसांना कांहीं रंग स्पष्ट दिसत नाहींत. त्यांना हिरव्या, तांबड्या वगैरे रंगाचा पदार्थ दाखविला तर तो पांढरसर किंवा काळसर दिसतो. अशा लोकांचें प्रमाण युरोपांत हजारीं सुमारें दहापांच असतें. आपल्या इकडे तें यापेक्षां कमी असते. आगगाडी-वरील नोकरांना रात्रीं कंदिलांचे रंग ओळखतां येणें जरूर असल्यामुळें त्यांची या बाबतींत परीक्षाही घेतात.

**नाक**—कांहीं विकारामुळें कांहीं माणसांना वास येत नाहीं, तर कांहीं विकारामुळें बाहेरून घाण येत आहे असा कांहींना खोटा भास होतो.

**जीभ**—यकृत् बिघडलें असतां तोंडांत कडवटपणा उत्पन्न होतो व पाणी बेचव लागतें. बेडकी नांवाची एक वनस्पति आहे तिचें पान चावून वर गूळ किंवा साखर खाल्ली, तर ती निव्वळ मातीप्रमाणें लागते. आवळा अथवा आवळकटी खाऊन पाणी प्याल्यास तें गोड लागतें. सोडा किंवा सोरा खाल्या-वर पाणी बेचव लागतें, व विडा खाल्ल्यावर पदार्थांची चव जिभेस चांगली कळत नाहीं; म्हणूनच विड्यांतून कोयनेल घेतलें तर त्याचा कडूपणा तितका भासत नाहीं. वरील सर्व परिणाम किंचित् विकृत झालेल्या जिभेचाच होय.

**मज्जादोषजन्य भ्रम अथवा मेंदूचे विकृत स्थितीमुळें होणारे भ्रम—**

मेंदूत रक्तसंचय झाला असतां, स्वप्नांत दिसणारे देखावे दिवसाही जागृत स्थितींत डोळ्यापुढें कधीं कधीं दिसतात. यासंबंधानें हक्स्ले या नामांकित ग्रंथकाराच्या इंद्रियविज्ञानशास्त्रावरील पुस्तकांत परिशिष्टामध्यें मिसेस ए. या स्त्रीची दिलेली हकीगत लक्षांत ठेवण्यासारखी आहे. ही हकीकत थोडक्यांत येणेंप्रमाणें:—

मिसेस ए. या स्त्रीस एकदां डोळ्यांपुढें अनेक माणसें दिसूं लागलीं. हा भुताटकीचा काय प्रकार आहे, याचा शोध करतां असें आढळून आलें कीं, ती जेव्हां जेव्हां डोकें फिरवी तेव्हां तेव्हां तो सबंध देखावा डोक्याच्या फिरण्याबरोबर फिरून पुन्हां डोळ्यासमोरच दिसे. यावरून याचा संबंध मेंदूशीं असावा असें दिसलें. मेंदूत रक्तसंचय झाल्यानें हा भास होत असावा अशी शंका आल्यावरून डॉक्टरांनीं मेंदूतून रक्त काढलें, व त्याबरोबर हा भास नाहींसा झाला.

मेंदूतील विकारामुळें अथवा इतर विकारांचा मेंदूवर परिणाम झाल्यानें मनास निष्कारण भीति वाटणें व डोळ्यांपुढें भयंकर देखावे दिसणें असे अनेक प्रकार होतात. हे चमत्कार भुताटकीचे नसून केवळ शारीरिक बिघाडामुळें उत्पन्न झालेले होत. यास हें प्रमाण आहे कीं, पुष्कळ प्रसंगीं हे विकार भौतिक उपायांनीं नाहींसे होतात. ह्याचीं अनेक उदाहरणें आहेत. पुण्याचे प्रसिद्ध वैद्य वे० गणेशशास्त्री जोशी यांचे कुटुंबास इन्फ्लुएंझाचा आजार होऊन गेल्यावर पुढें डोळ्यासमोर हडळी वगैरे भयंकर स्त्रिया दिसण्याचा विकार झाला असतांना, आरोग्य सुधारण्यासाठीं सर्वमान्य उपाय केल्यानेंच हा विकार कांहीं दिवसांनीं कमी झाला.

अतिरिक्त मद्यप्राशनाच्या संवयीमुळें ज्यांना Delirium Tremens अथवा “ मदात्यय ” हा विकार होतो त्यांस सर्पादिकांचे व अन्य भयंकर देखावे दिसतात, हें सुप्रसिद्ध आहे.

वेडामुळें होणारे आभास सर्वांना माहीत आहेत. वेडामध्यें मेंदूच विकृत झालेला असतो.

मेंदूतील कांहीं भाग नासल्यास त्या माणसास बाहेरून नाकांत घाण वास

शिरल्याचा व आसपास कांहीं पदार्थ किंवा जनावर कुजलें आहे असा बारंवार भास होतो.

III

मनोदोषजन्य अथवा मनांतील नैसर्गिक दोषामुळें उत्पन्न होणारे भ्रम. यांचे प्रकारः—

## (१) कल्पनाजन्य भ्रम

(अ) कल्पनाशक्तीच्या उद्दीपनामुळें होणारे भ्रम—कांहीं कारणामुळें उद्दीपित झालेल्या कल्पनाशक्तीमुळें आभास होतो हें सुप्रसिद्ध आहे. हा आभास किती पूर्णपणें होतो यासंबंधानें 'रज्जुसर्पन्याय' प्रसिद्धच आहे. दोरी, सोपट, चिंधी, लाकूड इत्यादि पदार्थांचे ठिकाणीं केवळ कल्पनेमुळें सापाचा भास इतका स्पष्ट होतो कीं, क्षणमात्र सापाचें डोकें, डोळे वगैरे अवयवही स्पष्ट दिसतात. हा अनुभव बहुतेकांना येतो. ह्याचा दुसरा प्रकार मृत मनुष्य दिसल्याचा भास होणें हा होय. हा भासच असून वस्तुस्थिति नव्हे यास प्रमाण असें आहे कीं, घरांतील जीं माणसें मृताविषयीं बेफिकीर असतात अथवा खंबीर मनाची असतात, त्यांना असले भास फार करून होत नाहींत. आनंदाचे संस्थापक कै० वासुदेवराव आपटे यांना एकदां त्यांची मृत मुलगी दिसली व तिचें भाषणही पुष्कळ वेळ ऐकूं आलें; पण तेथें त्यांचें कुटुंब होतें, त्यांना कांहींही दिसलें नाहीं व ऐकूं आलें नाहीं. भावनाप्रधान लोकांना असे अनुभव फार येतात.

अंधारांत अथवा चांदण्यांत लांबच्या पदार्थांच्या ठिकाणीं, व झोपेंतून जागें होऊन अर्ध्या उघडलेल्या डोळ्यांनीं पाहिलेल्या जवळच्या वस्तूंच्या ठिकाणींही, जनावर, भूत * इत्यादिकांचा आभास किती स्पष्ट होतो याचाही सर्वांस कमी-जास्त मानानें अनुभव आहे. भीतिमुळें उद्दीपित झालेल्या कल्पनाशक्तीमुळें हा भास उत्पन्न होतो व त्यास अस्पष्टता अथवा संदिग्धता यांची मदत

* जर मृतात्म्यांचें फोटोही घेतां येतात तर भुतें अथवा मृतात्मे दिसत नाहींत असें कसें, अशी कोणी शंका घेतील, तर त्यांना हें सांगणें जरूर आहे कीं, भुताचा फोटो घेतल्याच्या ज्या गोष्टी आहेत त्या शास्त्रीय जगास मान्य नाहींत. यासंबंधानें पुढें ६व्या प्रकरणांत दिलेली माहिती पहा.

होते. म्हणूनच निर्जनजागीं संधिप्रकाश, चांदणें, अथवा काळोख असतांना हे देखावे फार दृष्टीस पडतात; व **अगदीं काळोख्या अमावास्येला रात्रींही पुष्कळ ( विशेषतः सुशिक्षित अथवा विचारी ) माणसें एकत्र असतांना, किंवा दिव्याचा लखलखीत प्रकाश असतांना, भुतें-खेतें मुळींच दिसत नाहींत.**

स्मशानांत भुताचा भास होणें हाही उद्दीपित कल्पनाशक्तीचा परिणाम आहे. स्मशानांत भुतें असतात ही कल्पना मनांत असल्यामुळें एखादें स्थळ स्मशान आहे असें कळल्यानें भीति व कल्पना जागृत होऊन भुतांचा भास होऊं लागतो. कल्पनेनें भास कसा होतो ह्यासंबंधानें पुढील एक उदाहरण पहाः—

चित्रशाळेचे मालक श्रीयुत वासुदेवराव जोशी सांगतात, "एकदां माझ्या हाताला नारू झाला. तो नारू आहे असें मला प्रथम कळलें नाहीं. पुढें एका माणसानें 'अहो हा तुम्हांस नारू झाला आहे' असें म्हटल्या-बरोबर हात दुखावयास लागला." अर्थात् येथें दुःखाची जाणीव कल्पनेमुळें तीव्र झाली.

(ब) **स्वाभाविक अतिशयोक्ति**—उद्दीपित कल्पनाशक्तीमुळें मनुष्याकडून स्वाभाविकपणें अतिशयोक्ति होते. एकाद्या माणसानें साप पाहिला म्हणजे त्याच्या अपूर्व दर्शनाचा त्याच्या मनावर इतका परिणाम होतो कीं, त्याला तो साप वाजवीपेक्षां मोठा भासतो व आपल्या आश्चर्याची योग्य कल्पना इतरांस देण्यासाठीं "साप मांडीएवढा होता" असें त्याचें तो स्वाभाविक-पणें वर्णन करतो. तसेंच एकाद्या माणसानें सौंदर्ययुक्त व्यक्ति पाहिली, कीं "अशी सुंदर व्यक्ति जगांत पूर्वी कधींच झाली नाहीं" अशी त्याची भावना होते, व तदनुरूप तो त्या व्यक्तीचें वर्णन करतो. मोठीं मोतीं पाहिलीं, कीं त्याच्या तेजानें डोळे दिपून तीं वाटाण्याएवढीं असलीं तर तीं पाहाणारास बोराएवढीं भासूं लागतात व त्याप्रमाणें तो त्यांचें वर्णन करतो.

ही स्वाभाविक अतिशयोक्ति आहे हें ऐकणारास माहीत नसल्यामुळें तो हीं वर्णनें खरीं आहेत असें समजून इतरांस अशीच हकीकत सांगतो किंवा त्यांत तो अबुद्धिपुरःसर भर घालतो व यामुळें खोट्या समजुती उत्पन्न होतात.

( क ) **मनुष्यामधील चमत्कारांची स्वाभाविक आवड**—हा कल्पनाशक्तीचाच एक परिणाम आहे. या आवडीस अनुसरून मनुष्य आपण पाहिलेल्या गोष्टी अबुद्धिपुरःसरही थोड्याशा विकृत स्वरूपांत स्वाभाविकपणें सांगतो. भाविक माणसांनीं सांगितलेले पुष्कळ चमत्कार अशा स्वरूपाचे असतात.

( ड ) **आत्मारोपजन्य** अथवा **मनुष्यत्वारोपजन्य भ्रमः**—

हा एक कल्पनाशक्तीचा व कांहीं अंशीं सादृश्य कल्पनेचा परिणाम आहे. मनाचा असा सामान्य धर्म आहे कीं, इतर वस्तूंवर आपल्या स्थितीचा आरोप करावयाचा; अथवा साध्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे इतर सर्व वस्तु माणसासारख्याच धर्मांच्या अगर वृत्तीच्या आहेत असें मानावयाचें. सांथीचे रोग ह्या कोणी देवता आहेत असें मानणें हें याचें सामान्य उदाहरण होय. हा एक कल्पनाशक्तीचा परिणाम आहे असें मानण्यास हरकत नाहीं. लहान मुलें भावल्यांच्या ठिकाणींच नव्हे तर दगडासारख्या पदार्थांच्या ठिकाणींही मनुष्यत्वारोप करतात.

याच धर्मास अनुसरून पाऊस हा इंद्रानें मारलेल्या दैत्याचें रक्त आहे ही कल्पना आहे. झाड, प्राणी, डोंगर यांस देवदेवता मानणें, व बळी दिल्यानें देवता संतुष्ट होतात ही कल्पना, याचपैकीं आहे. प्राचीन काळीं यज्ञांचें बंड या कल्पनेमुळेंच माजलें.

प्रत्येक समाज अज्ञानस्थितींत असतांना त्यामध्यें बहुतेक सृष्ट–चमत्कारांना देव, असुर, यक्ष, वनदेवता इत्यादिकांच्या कृतींचें जें स्वरूप येतें तें याच कारणामुळें. (मात्र यांपैकीं कांहीं कल्पना लाक्षणिक (Symbolical) असतात हें ध्यानांत ठेवावें ).

## ( २ ) अवधानाभावजन्य भ्रम.

कोणतीही गोष्ट दिसण्यास तिच्याकडे थोडें तरी लक्ष पाहिजे. लक्ष नसल्यास म्हणजे आपल्या मनाची एकाग्रता त्या वेळीं दुसऱ्याच विषयावर पूर्णपणें झाली असल्यास डोळ्यांपुढीलही वस्तु दिसत नाहीं. लक्ष नसल्यामुळें, समोरून गेलेला मनुष्य अथवा जनावर दिसलें नाहीं असे अनेक वेळां

घडतें. मन पूर्णपणें एखाद्या कल्पनेच्या आधीन झालें असतां डोळ्यांपुढें असणारीही वस्तु दिसत नाहीं याचा अनुभव hypnotismच्या अथवा मेस्मेरिझमच्या चमत्कारांत दृष्टीस पडतो. या प्रयोगांत, निद्रावश माणसाला, 'तुला ह्या खोलींतलि हें टेबल किंवा हे गृहस्थ दिसणार नाहींत' असें सांगितलें तर ती व्यक्ति त्यास खरोखरच दिसेनाशी होते. असाच प्रकार जागृत अवस्थेंतही अनेक वेळा घडतो.

## ( ३ ) विचारदोषजन्य अथवा अनुमानदोषजन्य भ्रम.

( अ ) **सादृश्यजन्य भ्रम**—दोन पदार्थ स्थूलमानानें सारखे दिसले, म्हणजे ते सर्व गुणांनींही सारखे असतात असें नाहीं, अशी वस्तुस्थिति आहे; तथापि, ते तसे असले पाहिजेत असा माणसांचा समज होतो. उदाहरणार्थ, नागमोडी सरपटणाऱ्या सर्व प्राण्यांना विष नसतें, एवढेंच नव्हे तर अशांपैकीं एक चतुर्थांशापेक्षांही कमी प्राण्यांना विष असतें, अशी वस्तुस्थिति आहे; परंतु नाग, फुरसें इत्यादि कांहीं जातींना विष असतें यावरून नागमोडी सरपटणारे सर्वच प्राणी जालिम विषारी असतात अशी लोकांची समजूत झालेली असते. भुतें दिसण्यांत माणसांसारखीं असतात म्हणून त्यांना माणसांप्रमाणें खाणें, पिणें ... इत्यादि भोग लागतात अशी समजूत झालेली असते. भुतांना तशी खरोखरीच जरूरी, (आपल्याकडे कांहींच्या स्वप्नांत पितर येऊन अन्न-पाणी मागतात त्याप्रमाणें ) असती, तर सुधारलेल्या देशांतही त्यांनीं तशी मागणी केली असती; पण इंग्लंड, अमेरिका इत्यादि देशांत तशी स्थिति दिसून येत नाहीं.

**पुष्कळ गूढ व धार्मिक विधींच्या मुळाशीं सादृश्य ही कल्पना आहे.**

एकाद्याच्या ठायीं एक विलक्षण शक्ति असली म्हणजे दुसऱ्या अद्भुत शक्ति असतात असे मानणें हा भ्रमाचा प्रकार सादृश्यजन्य भ्रम या खालींच येईल. याचे प्रकारः—

नागास देवता मानणें, पाऱ्याच्या कांहीं अद्भुत गुणावरून त्यास शंकराचें

वीर्य मानणें, magic squares यांमध्यें सर्व रांगांची बेरीज एकच येण्याचा गुण आहे म्हणून ते काढलेल्या कागदाच्या चिठ्ठीचा ताईत बनवून तो गळ्यांत घातला असता रोगपरिहार होतो असें मानणें वगैरे. ( ४थ्या प्रकरणांतील ' साम्यमूलक उपाय ' हा भाग पहा ).

( ब ) **साहचर्यजन्य भ्रम**–दोन वस्तूंचें साहचर्य पाहिलें म्हणजे एकाचे धर्माचा आरोप दुसऱ्या वस्तूच्या ठायीं निष्कारण कायमचा केला जातो. उदा० सुतकांत पांढरे कपडे घालावे असा नियम ज्यांच्यांत आहे त्यांना केवळ पांढरे कपडे अशुभ वाटतात. कर्नाटकांत आळवाची भाजी फक्त श्राद्धाचे वेळीं करतात, म्हणून अळवाची भाजी तिकडील लोकांना अशुभ वाटते, व पुण्याकडे सणावारी किंवा लग्नांत आळवाची भाजी करतात हें पाहून त्यांना कसेंसें वाटतें. उदबत्तीच्या वासाबरोबर मेजवानीची किंवा देवपूजेची, सारंग रागाबरोबर लग्नांतील जेवणाची, स्मशानाजवळच्या (उदा० पुण्यांतील ओंकारेश्वराच्या ) देवळाच्या दर्शनाबरोबर किंवा आठवणीबरोबर मृत्यूची आठवण होणें, हे साहचर्याचे प्रकार होत.

शुभ-अशुभ या संबंधाच्या बऱ्याच कल्पना या साहचर्यामुळेंच उत्पन्न झालेल्या आहेत.

( क ) **हेत्वाभासात्मक भ्रम**, अथवा **कार्यकारणभाव** अथवा **सूच्यसूचकभाव यांसंबंधीं भ्रम**—म्हणजे, दोन वृत्तांच्या ( वृत्त म्हणजे घडलेली गोष्ट ) केवळ कालसाहचर्यामुळें ( म्हणजे एका गोष्टीबरोबरच अथवा नंतर दुसरी गोष्ट घडली म्हणजे) त्यांमध्यें कार्यकारण किंवा सूच्य-सूचक भाव आहे असें मानण्याची चुकीची प्रवृत्ति. अशा प्रकारच्या आभासास हेत्वाभास म्हणतात. हेतु म्हणजे कारण; जें कारण नाहीं तें आहे असा आभास होणें हा हेत्वाभास होय. अर्थात् हेत्वाभास म्हणजे चुकीचें कारण मानणें.

जेथें कार्य व कारण यांतील संबंध डोळ्यांस स्पष्ट दिसतो तेथें गैरसमजास जागा फारशी रहात नाहीं. उदा०—एखाद्या यंत्रांतील सर्व भाग दिसत असले, म्हणजे कोणत्या भागामुळें कोणता भाग फिरतो यासंबंधानें

निःसंदेह ज्ञान होतें. पण जेव्हां यंत्रांतील सर्व भाग दिसत नाहींत तेव्हां कोणत्या भागामुळें कोणता भाग हालत असेल ह्यासंबंधानें कल्पनाच करावी लागते. त्याचप्रमाणें, जेथें, होणारा फरक कसा होतो हें दृष्टीस पडत नाहीं, तेथें फरक कोणत्या कारणानें झाला हें ठरविण्यास पुढील प्रकारच्या शंका घेऊन विचार करावा लागतो:—

( १ ) असें नेहमींच घडतें काय ? तसें नसल्यास, विरुद्ध उदाहरणांचें प्रमाण काय आहे ? हे प्रमाण संभवशास्त्राप्रमाणें येणाऱ्या प्रमाणाइतकेंच आहे काय ? तसें ( म्हणजे एका गोष्टीनंतर दुसरी गोष्ट घडणें ) नेहमीं घडत असलें, तरी तें घडण्याचीं अन्य कारणें पुढील (२), (३), ( ४ ) यांपैकीं आहेत काय ?

( २ ) मानीव कारणाबरोबर श्रद्धेमुळें उत्पन्न होणारी भावना ह्या कार्यास कारणीभूत होत असेल काय ?

( ३ ) कार्य हा नैसर्गिक म्हणजे आपोआप अथवा कालांतरानें होणारा परिणाम आहे काय ? उदा० ग्रहण लागल्यावर तें कांहीं वेळानें सुटणें, आजाराची तीव्रता कालांतरानें कमी होणें...इ०.

आपोआप काय होतें हें लक्षांत न घेतल्यानें होणाऱ्या भासाचें एक उदाहरण **कुंभारणीच्या ध्यानानें अळीची कुंभारीण बनणें** हें होय. ह्या संबंधानें वस्तुस्थिति पुढीलप्रमाणें आहे. कुंभारीण ही कीटक वर्गातील असल्यामुळें, ह्या वर्गातील इतर प्राण्यांप्रमाणें तिची उत्पत्ति पुढील क्रमानुसार होतेः—१ प्रथम अंडें, २ अंड्यापासून अळी, ३ अळीपासून कोश, व ४ कोशांतून मूळ अंडें घालणाऱ्या प्राण्यासारखा प्राणी. ह्या नियमास अनुसरून कुंभारीण प्रथम अंडीं घालते. या अंड्यापासून अळीसारखा प्राणी उत्पन्न होतो. अळी कोश करून हालचाल न करतां कांहीं दिवस त्यांत स्वस्थ पडून राहते. नंतर ह्या कोशांतून कुंभारीण हा कीटक उत्पन्न होतो.

कुंभारणीच्या घरांत अळी दिसते व पुढें ह्या घरांतून अळीच्याऐवजीं कुंभारीण बाहेर पडते यावरून अळीचीच कुंभारीण बनते असा खोटा समज होतो.

( ४ ) मानलेल्या कारणाहून पूर्वी घडलेलें किंवा त्यावेळीं अथवा मागाहून घडणारें एकादें अन्य कारण कार्यास कारणीभूत झालें असेल काय ?

**हेत्वाभासांचे प्रकार**—हेत्वाभासाच्या वरील कारणांस अनुसरून हेत्वाभासांचे प्रकार पुढीलप्रमाणें होतात.

( १ ) अल्पानुभवांवरून, म्हणजे पुष्कळ उदाहरणें न पाहतां थोडीं उदाहरणें पाहून तेवढ्यावरून, अनुमान ठरविल्यानें होणारे हेत्वाभास ( hasty generalization ).*

( २ ) भावनेचा परिणाम काय झाला असेल हें लक्षांत न घेतल्यामुळें होणारे हेत्वाभास. *

( ३ ) आपोआप फरक काय होतो हें लक्षांत न घेतल्यामुळें कारकतेसंबंधानें उत्पन्न होणारे आभास.*

( ४ ) मानलेल्या कारणाबरोबरच किंवा त्याच्यापूर्वी अथवा नंतर घडणारीं अन्य कारणें लक्षांत न घेतल्यानें होणारा हेत्वाभास—

विशिष्ट गोष्ट केल्याच्या आधीं, तिच्याबरोबर व तिच्यानंतर ज्या इतर गोष्टी केलेल्या असतात, त्यांपैकीं एकाद्या गोष्टीमुळेंच घडणारें कार्य त्या विशिष्ट गोष्टीमुळेंच घडलेलें आहे अशी चूकीची समजूत होण्याचा संभव पुष्कळ असतो. उदा० एका माणसानें दुधांतून औषध घेतल्यावर त्यास हुशारी वाटूं लागली किंवा त्यास वांती झाली, तर ही गोष्ट त्या औषधामुळेंच झाली, असें वाटणें स्वाभाविक आहे. पण हुषारी वाटणें हा परिणाम औषधाबरोबर घेतलेल्या दुधाचा किंवा धारोष्ण दूध घेण्यासाठीं लांबच्या ठिकाणीं चालत जाण्यामुळें मिळालेल्या मोकळ्या हवेचा व व्यायामाचा, आणि वांती होणें हा परिणाम दुधांत शिळें किंवा नासकें दूध मिसळल्याचा अथवा औषधानंतर खाण्यांत आलेल्या ( किडकी सुपारी इ० ) वस्तूंचा परिणाम असणें शक्य आहे. यास्तव, हा परिणार कोणाचा याबद्दल नीट अवलोकन केलें पाहिजे. तसें न केल्यास कारकत्व भलत्या गोष्टीकडेच जाण्याचा संभव आहे हें उघड आहे.

अन्य कारणांचा विचार न केल्यामुळें होणाऱ्या हेत्वाभासांचें एक

---

*ह्या सर्व प्रकारांबद्दल माहिती पुढें २, ३, ४ या प्रकरणांत दिली आहे.

उदाहरण पावसामुळें सुरवंटांची उत्पत्ति होते ही समजूत हें होय. ह्यासंबंधानें वस्तुस्थिति अशी आहे कीं, पूर्वीच्या सुरवंटांनीं घातलेलीं अंडीं परिपक्क होण्यास ज्या प्रकारची उष्ण व दमट हवा पाहिजे तशी मिळाली म्हणजे अंडयांत सुरवंटांची वाढ होऊन ते बाहेर पडतात. ही वस्तुस्थिति सहज दृष्टीस पडणारी नसल्यामुळें, एकदम पुष्कळ सुरवंट उत्पन्न झालेले पाहून ते एकाएकी पावसाबरोबर आले किंवा पावसांतून पडले असें माणसांना वाटतें. अंड्यांवांचून पावसामुळें सुरवंट होणें, हें बीजावांचून केवळ पाण्यामुळें वनस्पति उत्पन्न होण्याइतकेंच अशक्य आहे.

## IV.

## भ्रमांचे अन्य प्रकार.

**अज्ञानजन्य** अथवा भ्रमजन्य म्हणजे पूर्वी मनांत असलेल्या एका अज्ञानामुळें अथवा भ्रमामुळें उत्पन्न होणारे भ्रम—

एकादें कार्य कसें घडतें याचा उलगडा झाला नाहीं म्हणजे त्यासंबंधानें मनुष्य पूर्वीच्या खोट्या समजुतीस अनुसरून एकादी कल्पना करतो व त्यामुळें नवीन भ्रमाची उत्पत्ति होते. उदाहरणार्थ–रोगाची साथ एकदम कशी उत्पन्न होते याचा उलगडा होत नसल्यामुळें, उग्र देवतांच्या कल्पनेवरून, साथ ही देवतेच्या प्रकोपाचा परिणाम असला पाहिजे, अशी कल्पना होते.

अज्ञान हें बीजाप्रमाणें आहे. एका बीजापासून अनेक व्यक्तींची उत्पत्ति होते, त्याप्रमाणें एका अज्ञानापासून अनेक भ्रम उत्पन्न होतात.

अज्ञानाचे दोन प्रकार मानतां येतीलः—(१) वस्तुस्थितीचें अज्ञान, व (२) भाषाविषयक अथवा शद्बांच्या अर्थांविषयीं अज्ञान.

शब्दांच्या योग्य अर्थाच्या अज्ञानामुळें गैरसमज होऊन कांहीं खोट्या व अतिशयोक्तीच्या बातम्या आपोआप उत्पन्न होतात ह्याविषयीं एकदां पुढीलप्रमाणें प्रत्यक्ष अनुभव आला. मागें प्लेगच्या दिवसांत एक गृहस्थ सकाळीं आजारी असल्याची खरी बातमी पण संध्याकाळीं ते वार-

त्याची खोटी बातमी मीं ऐकली. चौकशी करतां या बातमीचीं रूपांतरें पुढीलप्रमाणें झाल्याचें कळलें.

( १ ) क्ष गृहस्थ तापानें आजारी आहेत ही बातमी ऐकून ह्या बातमीचा अर्थ दुसऱ्या माणसानें ( २ ) क्ष गृहस्थ प्लेगनें आजारी आहेत, असा केला व त्या प्रमाणें त्यानें तिसऱ्यास सांगितलें. त्याचें तें म्हणणें ऐकून तिसऱ्यानें ( ३ ) क्ष गृहस्थांची 'प्लेग केस' आहे असें इतरांस सांगितलें. प्लेग केस याचा अर्थ प्लेगनें आजारी एवढाच; पण त्याचा अर्थ कांहीं लोक प्लेगनें मृत्यू असा करतात. यास अनुसरून या बातमीचे रूपांतर चौथ्या गृहस्थनें ( ४ ) क्ष गृहस्थ प्लेगनें मेलें, असें केलें व तशी बातमी लोकांस सांगितली.

गैरसमज व अतिशयोक्ति यामुळें भलत्याच बातम्या कशा उठतात यासंबंधाचीं गमतीचीं उदाहरणें श्री० ग. स. मराठे यांच्या "थालिपीठ" या पुस्तकांत "सुंठकेसर नटुकलें" या प्रकरणांत व प्रो. बेहरे यांच्या 'ओकारींत पन्नास कावळे' या विनोदी गोष्टींत पाहण्यासारखें आहे.

## V.

## इतरांच्या लबाडीमुळें किंवा स्वार्थी योजनेमुळें उत्पन्न होणारे भ्रम—

**(१) हातचलाखीमुळें होणारे भास**—मातीचा रुपया करणें, अंगठी नाहींशी करून ती काकडींत काढून दाखविणें वगैरे अनेक अशक्य वाटणाऱ्या गोष्टी धंदेवाले जादुगार करून दाखवितात; व त्या पाहात असतां वस्तुस्थिति लक्षांत न येतां भलताच समज होतो याचें कारण हातचलाखी हेंच होय. एका नोटीच्या दोन नोटा, अथवा दिलेल्या सोन्याचे दुप्पट सोनें करून दाखविणारे भोंदू हा प्रयोग बेमालूम करतात, तो हातचलाखीच्या साह्यानेंच. आरशांचा उपयोग करून, भूत दाखविणें, मनुष्याच्या शरीराचे तुकडे दाखविणें वगैरे चमत्कार दाखवितां येतात हें पुष्कळांस माहीत आहेच.

( २ ) प्रसिद्धि, अपूर्वता किंवा लोकप्रियता मिळविण्यासाठीं केलेलीं

बुद्धिपुरःसर अतिशयोक्ति अथवा असत्योक्ति—येन केन प्रकारेण प्रसिद्धि, अपूर्वता किंवा लोकप्रियता आपणास प्राप्त व्हावी ही इच्छा पुष्कळांस असते, म्हणून खऱ्याची अतिशयोक्ति करून अथवा नवीन रचून अनेक चमत्कृतिमय गोष्टी कांहीं लोक सांगतात. याचे कांहीं नमुने प्रवाशांच्या वर्णनांत-विशेषतः अशिक्षित प्रवाशांच्या वर्णनांत—आढळतात. असे अद्भुत चमत्कार सांगणाऱ्या प्रवाशांची उत्कृष्ट टर Adventures of Baron Munchausen या पुस्तकांत केलेली आहे ती अत्यंत वाचनीय आहे.

( ३ ) स्वार्थ साधण्यासाठीं उठविलेल्या कंड्या—कांहीं चमत्कार स्वार्थसाधू लोकांनीं बनविलेले असतात. कांहीं लबाड लोक एकाद्या माणसाला बोवा बनवून त्याच्या प्रभावाच्या अथवा चमत्काराच्या बातम्या स्वतःच उठवितात. दोघां साथीदारांपैकीं एक इतर लोकांच्या देखत म्हणतो, "आज चार वाजतां महाराज माझ्या घरीं आले होते." दुसरा म्हणतो "आज महाराज चार वाजतां आपल्या खोलींत जप करतांना मीं पाहिलें." आणि दोघेजण वाद करतां ठरवितात कीं "महाराज एकाच वेळीं दोन ठिकाणीं दर्शन देऊं शकतात." हें ऐकून, ऐकणाराचाही तसाच समज होतो.

एका महाराजासंबंधानें "ते ह्या विहिरींत गेले व दुसऱ्या विहिरींतून प्रकट झाले" अशा खोट्या बातम्या उठविल्याचा प्रत्यक्ष अनुभव एक गृहस्थ सांगतात.

घरावर धोंडे मारून किंवा रात्रीं भुताचें सोंग घेऊन लोकांना भेडसावणें व "अमुक झाडाखालीं रात्रीं दूध, बासुंदी, अंडीं इ० आणून ठेवा" म्हणून देवऋष्याकडून सांगविणें आणि तो बळी उपटून त्यावर ताव मारणें, असा उद्योग कांहीं टवाळ लोक करतात. या बाबतींत कांहीं लोकांनीं स्वतः केलेल्या अशा प्रकारच्या प्रयोगांबद्दल माहिती प्रस्तुत लेखकाजवळ सांगितलेली आहे.

पुष्कळ असत्य चमत्कार अज्ञानामुळें किंवा लबाड लोकांच्या कंड्यांमुळें उत्पन्न झालेले असतात. यास प्रमाण हें कीं, अशा चमत्कारांबद्दल जेव्हां जेव्हां बारकाईची चौकशी करण्यांत येते तेव्हां तेव्हां ते खोटे असल्याचें उघडकीस येतें. ( यांचीं उदाहरणें १२ व्या प्रकरणांत पहा ).

# प्रकरण दुसरें.

## ( भ्रमोत्पत्तीची मीमांसा चालू ).

## अल्पानुभवांमुळें उत्पन्न होणाऱ्या भ्रमाचीं उदाहरणें.

अल्पानुभवांमुळें उत्पन्न झालेले भ्रम, म्हणजे अनेक उदाहरणें पाहून त्यांमध्यें विरुद्ध अनुभवांचें अनुकूल अनुभवांशीं प्रमाण काय पडतें ह्याचा विचार न करतां, थोड्या अनुभवांवरून अनुमान काढल्यामुळें होणारे गैरसमज.

एका विशेष गोष्टीनंतर दुसरी विशेष गोष्ट घडली, म्हणजे त्यांमध्यें कांहीं संबंध आहे अशी मनुष्य कल्पना करतो, व त्या कल्पनेस अनुकूल असे दोन व फारतर तीन अनुभव, केवळ काकतालीयन्यायानें, लागोपाठ आले म्हणजे ती कल्पना खरी आहे असें ठरवितो. पुढें कांहीं विरुद्ध अनुभव आलेच, तर ते 'अपवाद असावे' किंवा त्यांस 'अमुक कारण झालें असावें' असें गृहीत धरून चालतो, व त्यामुळें 'आपला नियम खरा' ही त्याची समजूत कायम राहते.

थोड्या उदाहरणांवरून बनलेल्या किंवा अनेक अनुभव पाहण्याची खबरदारी न घेतल्यामुळें अनेक वर्षें टिकून राहिलेल्या खोट्या समजुतींचीं कांहीं उदाहरणें:—

§ **पौर्णिमा व अमावस्या यांचा मृत्युसंख्येशीं संबंध**—(१) श्रीयुत श्री. दा. सातवळेकर यांच्या 'एकादशीचा उपवास' या पुस्तकांत पुढील विधानें आहेतः—पान १० "मृत्यूंची संख्या द्वादशीपासून तृतीयेपर्यंत अधिक असते व याच तिथींला कृष्णपक्षामध्यें शुक्लपक्षापेक्षां अधिक असते." पान ११ "मोठमोठ्या शहरांतील मृत्युसंख्या चतुर्थीपासून एकादशीपर्यंत कमी व द्वादशी ते तृतीयेपर्यंत अधिक असते."

---

§ ह्या प्रकरणांतील कांहीं माहिती याच लेखकानें १९३१ जानेवारीच्या 'रत्नाकरा'च्या अंकांत लिहिलेल्या "लौकिक समजुतींविषयीं शास्त्रज्ञ साशंक कां" या लेखांतून घेतली आहे.

**वस्तुस्थिति**—वरील लेख १९२८ सालीं वाचण्यांत आला. त्यावेळीं पुणें व मुंबई म्युनिसिपालिटीचें १९२७ सालचें रजिस्टर पाहिलें, तेव्हां त्यांतील आंकडे वरील विधानांना पुष्टि देत नाहींत असें आढळून आलें. पुढील आंकडे पहाः—

## मुंबईतील मृत्युसंख्या.

| तिथि | मृत्युसंख्या | तिथि | मृत्युसंख्या |
|---|---|---|---|
| पौष शु. १४ | ६६ | पौष वद्य १ | ६४ |
| ,, ,, १५ | ७० | ,, ,, २ | ६६ |
| | | ,, ,, १३ | ७३ |
| | | ,, ,, १४ | १०० |
| | | अमावास्या | ६९ |
| माघ शु. १ | ७६ | माघ वद्य १ | १०१ |
| ,, ,, २ | ८२ | ,, ,, २ | १०५ |
| ,, ,, १३ | ७३ | ,, ,, १३ | ९४ |
| ,, ,, १४ | ९३ | ,, ,, १४ | ८६ |
| ,, ,, १५ | ८२ | ,, ,, ३० | ११६ |
| फाल्गुन शु. १ | ८६ | फाल्गुन वद्य १ | १०२ |
| ,, ,, २ | ९८ | ,, ,, २ | ७८ |
| ,, ,, १३ | १०१ | ,, ,, १३ | ९५ |
| ,, ,, १४ | १०० | ,, ,, १४ | १०२ |
| ,, ,, १५ | ९२ | ,, ,, ३० | ९१ |
| चैत्र शु. १ | ९२ | चैत्र वद्य १ | ७७ |
| ,, ,, २ | १११ | ,, ,, २ | ९८ |
| ,, ,, १३ | ८५ | ,, ,, १३ | ८७ |
| ,, ,, १४ | ७८ | ,, ,, १४ | ७३ |
| ,, ,, १५ | ७९ | ,, ,, ३० | ८९ |

| तिथि | मृत्युसंख्या | तिथि | मृत्युसंख्या |
|---|---|---|---|
| वैशाख शु. १ | ७९ | वैशाख वद्य १ | ६८ |
| ,, ,, २ | ७४ | ,, ,, २ | ७५ |
| ,, ,, १३ | ८९ | ,, ,, १३ | ७६ |
| ,, ,, १४ | ८१ | ,, ,, १४ | ७५ |
| ,, ,, १५ | ७५ | ,, ,, ३० | ८४ |
| ज्येष्ठ शु. १ | ६६ | ज्येष्ठ वद्य १ | ५९ |
| ,, ,, २ | ८० | ,, ,, २ | ८३ |
| ,, ,, १३ | ६७ | ,, ,, १३ | ७३ |
| ,, ,, १४ | ९१ | ,, ,, १४ | ६४ |
| ,, ,, १५ | ६५ | ,, ,, ३० | ७७ |
| आषाढ शु. १ | ७५ | आषाढ वद्य १ | ६३ |
| ,, ,, २ | ८० | ,, ,, २ | ६९ |
| ,, ,, १३ | ७१ | ,, ,, १३ | ९० |
| ,, ,, १४ | ५१ | ,, ,, ३० | ७४ |
| ,, ,, १५ | ८२ | | |
| श्रावण शु. १ | ८५ | श्रावण वद्य १ | ७८ |
| ,, ,, २ | ७४ | ,, ,, २ | ९६ |
| ,, ,, १३ | ८७ | ,, ,, १३ | ८६ |
| ,, ,, १४ | ६७ | ,, ,, १४ | ७९ |
| ,, ,, १५ | ६३ | ,, ,, ३० | ७० |
| भाद्रपद शु. १ | ७० | भाद्रपद वद्य १ | ८३ |
| ,, ,, २ | ७१ | ,, ,, २ | ३५ |
| ,, ,, १३ | ६० | ,, ,, १३ | ६७ |
| ,, ,, १४ | ५४ | ,, ,, १४ | ६८ |
| ,, ,, १५ | ५१ | ,, ,, ३० | ७८ |
| ,, ,, १५ | ६९ | | |

| तिथि | मृत्युसंख्या | तिथि | मृत्युसंख्या |
|---|---|---|---|
| अश्विन शु. १ | ६५ | अश्विन वद्य १ | ७८ |
| ,, ,, २ | ६१ | ,, ,, २ | ६३ |
| ,, ,, १३ | ७० | ,, ,, १३ | ६७ |
| ,, ,, १४ | ५२ | ,, ,, ३० | ७६ |
| ,, ,, १५ | ६७ | | |
| कार्तिक शु. १ | ६६ | कार्तिक वद्य १ | ४९ |
| ,, ,, २ | ६५ | ,, ,, २ | ६३ |
| ,, ,, १३ | ४४ | ,, ,, १३ | ६६ |
| ,, ,, १४ | ७१ | ,, ,, १४ | ६० |
| ,, ,, १५ | ६५ | ,, ,, ३० | ६८ |
| मार्गशीर्ष शु. १ | ५९ | मार्गशीर्ष वद्य १ | ६३ |
| ,, ,, २ | ५९ | ,, ,, २ | ५१ |
| ,, ,, १३ | ६४ | ,, ,, १४ | ६६ |
| ,, ,, १४ | ६८ | ,, ,, ३० | ५५ |
| ,, ,, १५ | ५७ | | |
| पौष शु. १ | ६३ | | |
| ,, ,, २ | ४५ | | |

एकंदर दिवस ११७ मृत्युसंख्या ८७४३

या सर्व दिवसांतील रोजची सरासरी ७४·७२

सर्व वर्षांतील रोजची सरासरी ७५·४८

अर्थात् फरक अत्यंत सूक्ष्म म्हणून तो नसल्यासारखाच आहे.

**( २ ) भावी अपत्याच्या स्त्रीपुरुषत्वाशीं चंद्राचा संबंधः—'हिंदु लग्नसंस्था'** या पुस्तकांत पुढील विधानें आहेत. पान २९ " बंगालमधील गौळी लोकांत पिढ्यानुपिढ्या अनुभवावरून अशी एक समजूत दृढ झालेली आहे कीं, वद्यपक्षांत गाई–म्हशींना नर दिल्यापासून होणारी पैदास नर-

जातीची होते; तर शुद्धपक्षांतील समागमापासून होणारी संतति स्त्रीजातीची होते." ह्या विधानास आधार एन्. एन्. मुकर्जी यांच्या ग्रंथाचा दिला आहे. पान ३०–"चंद्राचे क्षितिजावरील अस्तित्व आधानकालीं गर्भास पुल्लिंगी देह देण्यास कारणीभूत होत असलें पाहिजे."

**वस्तुस्थिति**–पुणें एथील सरकारी डेअरी व एलिचपूर येथील सरकारी ब्रीडिंग फार्म येथें जाऊन त्यांचीं रजिस्टरें पाहतां त्यांत पुढीलप्रमाणें प्रत्यक्ष स्थिति दिसून आली. (हीं व पुढील सर्व उदाहरणें अनुकूल-प्रतिकूलतेच्या दृष्टीनें निवडून न घेतां रजिष्टरांत ओळीनें सांपडली तशीं घेतलीं आहेत हें ध्यानांत ठेवावें).

| आधानकाल ( तारीख व तिथि ) | अपत्याचें लिंग न = नर. मा = मादी. | उत्तर बरोबर + या चिन्हानें व चूक – या चिन्हानें दाखविलें आहे. |
|---|---|---|
| १३—१–२८ कृ. ६ | न. | + |
| १—३–२८ शु. १० | न. | – |
| १९—३–२८ शु. ९ | न. | – |
| २०–१२–२८ शु. ८ | न. | – |
| २३—१–२९ शु. १३ | न. | – |
| १९—२–२९ शु. १० | मा. | + |
| २७—२–२९ कृ. ४ | न. | + |
| ७—५–२९ कृ. १३ | न. | + |

| | | |
|---|---|---|
| १६—५-२९ | मा. | + |
| शु. ८ | | |
| ४—६-२९ | मा. | - |
| कृ. १२ | | |
| १३—७-२९ | न. | - |
| शु. ७ | | |
| २१—७-२९ | मा. | + |
| शु. १५ | | |
| २-१०-२९ | मा. | - |
| कृ. ३० | | |
| २१-१०-२९ | मा. | - |
| कृ. ३ | | |
| २०-११-२९ | मा. | - |
| कृ. ४ | | |
| ४—१-३० | न. | - |
| शु. ४ | | |
| १८—१-३० | न. | + |
| कृ. ४ | | |
| १९—१-३० | मा. | - |
| कृ. ५ | | |
| २७—१-३० | न. | + |
| कृ. १३ | | |
| ५—३-३० | २ न. | २ - |
| शु. ५ | | |
| २—१-२९ | न. | + |
| कृ. ७ | | |
| २२—२-२९ | न. | - |
| शु. १४ | | |

| | | |
|---|---|---|
| २०-१०-२९ | मा. | - |
| कृ. २ | | |
| ८-११-२९ | न. | - |
| शु. ७ | | |
| २८-११-२९ | मा. | - |
| कृ. १२ | | |
| ३-१२-२९ | न. | - |
| शु. २ | | |

एलिचपूर.

| | | |
|---|---|---|
| ७—४-२९ | मा. | - |
| कृ. १३ | | |
| २०—६-२९ | मा. | + |
| शु. १४ | | |
| २५—६-२९ | न. | + |
| कृ. ३ | | |
| १६—९-२९ | न. | - |
| शु. १३ | | |
| २१—९-२९ | न. | + |
| कृ. ३ | | |
| ६—३-३० | न. | - |
| शु. ६ | | |

| अनुकूल उत्तरें | प्रतिकूल |
|---|---|
| १२ | २१ |

वरील उदाहरणांत कांहीं उत्तरें ओळीनें एका जातीचीं आहेत. यावरून एकाच जातीचीं ४।५ उत्तरें आलीं असतां एकादा नियम खरा किंवा खोटा मानणें किती धोक्याचें आहे हें समजून येतें. विरुद्ध उदाहरणें थोडीं दिसून आलीं तरी, ती कदाचित् अपवाद असतील या कल्पनेनें, संशोधन

चालू ठेवणें योग्य होईल; पण अनुकूल उदाहरणें थोडींशीं मिळालीं म्हणजे नियम खरा मानणें योग्य नाहीं. कारण तो खरा मानण्यामुळें फसगत व अंधश्रद्धा उत्पन्न होण्याची भीति असते.

Principles of Breeding या पुस्तकाचे कर्ते डेव्हनपोर्ट हे भावी संततीचें लिंग निश्चित करण्याच्या भिन्न पद्धतींसंबंधीं लिहितात : " आजपर्यंत पांचशेंहून जास्त भिन्न पद्धति पुढें आल्या आहेत; पण त्यांपैकीं एकही विश्वासनीय ठरलेली नाहीं."

There are as many theories as human ingenuity has been able to devise(more than five hundred are now known) & as there is but one alternative in the case, any theory, no matter how absurd, is certain under the law of probability to come true half the time.

'*Principles of Breeding*.'

या कल्पनांपैकीं एक कल्पना विश्वसनीय ठरली, तरी राहिलेल्या पांचशें कल्पना खोट्या असूनही त्यांच्या पुरस्कर्त्यांस त्या खऱ्या व अनुभवसिद्ध वाटल्या; यावरून खोट्या कल्पनांवर खऱ्या कल्पनांचा आभास कसा होतो हें दिसून येणारें आहे. यासंबंधानें एक अशी आश्चर्याची गोष्ट आहे कीं, यांपैकीं कांहीं पद्धति परस्परविरोधी असूनही प्रत्येकींचे पुरस्कर्ते आपल्याच पद्धतीस अनुभवांचा आधार सांगतात !

भावी मुलांच्या स्त्रीपुरुषजातींशीं कालाचा संबंध, यासंबंधानें पुढील अभिप्राय पहाः—

Another guess is that the time of conception makes the difference.........The whole question has been most carefully analyzed and it has been shown that in man *the time of conception does not influence sex ratio.* In cattle the matter has been investigated on a huge scale and it has been proved statistically that the time of service does not make the least difference to the proportion of sexes.

–John Baker, Biologist, in the "Modern Psychologist" 1933, page 126.

**( ३ ) गर्भारपणीं मातेच्या डोळ्यापुढें दिसणाऱ्या गोष्टींचा अपत्याचें वर्ण व रूप यांवर होणारा परिणाम**:—फळण्याचे वेळीं मादीपुढें जें जनावर किंवा ज्या जनावराचें चित्र असतें तसल्या प्रकारची तिला संतति होते; तसेंच मादीभोंवतीं विशिष्ट रंगाचे पडदे बांधले म्हणजे त्या रंगाची संतति होते ही समजूत हिंदुस्तानांत आहेच; पण पाश्चात्यांतील कांहीं लोकांचीही आहे.

हाही समज बरोबर नाहीं असें प्रजोत्पादनशास्त्रज्ञांचें मत आहे. संततीचे गुण मुख्यतः बीजाप्रमाणें असतात. गर्भास रक्ताचा पुरवठा मातेकडून होतो, म्हणून संततीच्या आरोग्यावर मातेचा परिणाम होतो; परंतु मातेच्या केवळ रक्ताचा परिणामही विशेष गुणांवर होत नाहीं. एक दोन दिवसांचा गर्भ ससाच्या मादीच्या पोटांतून काढून भिन्न वर्णाच्या मादीच्या पोटात घालण्याचा प्रयोग केला तेव्हां असें दिसून आलें कीं झालेली संतति मूळच्या आईबापाप्रमाणेंच मुख्यतः होती. भिन्न रंगाच्या मातेच्या पोटांत हा गर्भ कित्येक महिने राहूनही, मूळच्या आईबापांच्या रूपरंगाचा परिणाम नाहींसा होतो असें वरील प्रयोगावरून जर दिसून येत नाहीं, तर आईबापांचे मूळ रंग निराळे असतां, केवळ मातेच्या डोळयांपुढें विशिष्ट रंग राहील असें केल्यानें संततीच्या रंगावर परिणाम होण्याचा संभव अत्यल्प आहे. परिणाम होत असता तर हिरव्याचार रंगाच्या झाडींत ज्या पशुपक्ष्यांची गर्भधारणा होते त्यांमध्यें हिरव्या रंगाची संतति थोड्याबहुत प्रमाणांत दिसली असती. पण हिरव्या रंगाचा कावळा राहूं द्या, पण हिरव्या रंगाचें अथवा गवताच्या रंगाचें मेंढरूं अथवा वांसरूंही उत्पन्न होत नाहीं.

यासंबंधानें शास्त्रज्ञांचीं मतें पहा—

"This tradition has neither a scientific basis nor well authenticated instances, and it is time it no longer occupied the mind of breeders."

–*Principles of Breeding by Davenport.*

गर्भारपणांत ज्या गोष्टींचा परिणाम मातेच्या मनावर होतो त्यांचा दृश्य परिणाम गर्भातील मुलावर होतो ( उ० पालीची भीति वाटली म्हणजे

पालीच्या आकाराचा डाग मुलाच्या अंगावर उमटणें वगैरे ) असा जो समज आहे त्यांतही तथ्य नाहीं. पुढील पुरावा पहाः—

" Maternal impressions are not facts but superstitions born of an unscientific attitude on the part of the popular mind. Remembrances of strange coincidences are longer borne in mind; the ordinary & unremarkable are overlooked."

—*Animal Genetics by Crew* ( एडिंबरो येथील गुरांची उत्तम पैदास करण्यासंबंधाच्या शोधनशालेचे मुख्य चालक. )

या बाबतींत प्रख्यात डार्विनसाहेबांचें मतही लक्षांत घेण्यासारखें आहे. ते म्हणतात—

W. Hunter told my father that in many thousand cases he had asked the mother before confinement whether any thing had affected her imagination and recorded the answers, and absolutely not one case came right, though when the child had anything remarkable, they always made the cap to fit.

( ४ ) " कर्क राशीचे लोक किती थोडे आढळतात ! " पान १८—कै० भावे यांचा 'धर्मजागृतीं'तील १९१६ सालीं प्रसिद्ध झालेला फलज्योतिषावरील निबंध.

**वस्तुस्थिति**—माझ्या व पुण्यांतील एका प्रसिद्ध ज्योतिष्यांच्या संग्रहांतील मिळून सुमारें साडेसहाशें कुंडल्या पाहतां त्यांत एकबारांश कर्कराशीचे लोक आढळले.

( ५ ) नेहमीं गुन्हे करण्याची नित्य प्रवृत्ति ज्यांमध्यें आहे, अशा लोकांच्या लक्षणांसंबंधानें ( चिकटलेल्या कानाच्या पाळी, चपटें नाक, जनावराच्या पंजासारखा तळहात, तळहातावरील विवक्षित रेषा, लड्ड मान इ० ) अनेक कल्पना अनुभवांतीं चुकीच्या ठरल्या आहेत.

The famous Italian Anthropologist specified certain signs such as the 'criminal ear' as indications of degen-

eracy of criminality. Later Doctor Goring listed so many exceptions that the whole idea was abandoned.

The 'low brow' theory is another exploded idea.

The 'weak chin' theory is another baseless myth.

Flat noses, claw shaped hands, certain lines or markings in the palms, thick neck,......all have been pointed to as indications of criminal tendencies, but *scientific men take none of these indications seriously.*

Page 24, Literary Digest 24–9–32.

वरीलसारखीं अल्पानुभवमूलक भ्रमांचीं व्यवहारांतील उदाहरणें हजारों आहेत.

थोड्या उदाहरणांवरून गैरसमज होण्याचा कसा संभव असतो यासंबंधाचा प्रो. वेस्टअवे यांच्या Teaching of Mathematics या पुस्तकांत दिलेला पुढील एक प्रयोग पहा. दहा नाणीं घेऊन तीं १०२४ वेळां फेकलीं तर त्यांत

| | | | | |
|---|---|---|---|---|
| फक्त एका नाण्याचा मुखवटा वरच्या बाजूस येणें. | | | | |
| दोहोंचा | मुखवटा | वरच्या | बाजूस | येणें. |
| तिहींचा | ,, | ,, | ,, | ,, |
| चाऱ्हींचा | ,, | ,, | ,, | ,, |
| पाचांचा | ,, | ,, | ,, | ,, |
| सहांचा | ,, | ,, | ,, | ,, |
| सातांचा | ,, | ,, | ,, | ,, |
| आठांचा | ,, | ,, | ,, | ,, |
| नवांचा | ,, | ,, | ,, | ,, |
| दहांचा | ,, | ,, | ,, | ,,. |

याचा संभव किती असतो हें पुढें दिलेल्या कोष्टकांत गणितांतील अंकपाशपद्धतीनें ( Combinations) दिले आहे, व अशा तऱ्हेचे दोन प्रयोग प्रत्यक्ष केले तेव्हा त्यांत कोणती स्थिति किती वेळा घडली हें त्यापुढें मांडलें आहे, तें पहा.

| नाणीं पडण्याचे प्रकार | | गणिताप्रमाणें म्हणजे पाशपद्धतीप्रमाणें येण्याचा संभव. | प्रत्यक्ष अनुभव पहिला प्रयोग | प्रत्यक्ष अनुभव दुसरा प्रयोग | दोन्ही—अनुभवांची सरासरी | अनुभवांच्या सरासरींत संभवापेक्षां अधिक अथवा उणें अनुभव ( तिसऱ्या व ६ व्या रकान्यांतील आंकड्यांची तुलना ) |
|---|---|---|---|---|---|---|
| १० वेळा मुखवटा व | ० वेळा मागली बाजू | १ | ४ | ० | २ | + १ |
| ९ ,, ,, | १ ,, ,, | १० | २० | ६ | १३ | + ३ |
| ८ ,, ,, | २ ,, ,, | ४५ | ४० | ४० | ४० | − ५ |
| ७ ,, ,, | ३ ,, ,, | १२० | ८३ | १५० | ११६½ | − ३½ |
| ६ ,, ,, | ४ ,, ,, | २१० | २२४ | २२२ | २२३ | +१३ |
| ५ ,, ,, | ५ ,, ,, | २५२ | २५० | २०९ | २२९½ | −२२½ |
| ४ ,, ,, | ६ ,, ,, | २१० | २४२ | २२२ | २३२ | +२२ |
| ३ ,, ,, | ७ ,, ,, | १२० | ११५ | १०७ | १११ | − ९ |
| २ ,, ,, | ८ ,, ,, | ४५ | २८ | ६० | ४४ | − १ |
| १ ,, ,, | ९ ,, ,, | १० | १४ | ६ | १० | ० |
| ० ,, ,, | १० ,, ,, | १ | ४ | २ | ३ | + २ |
| | | १०२४ | १०२४ | १०२४ | १०२४ | + ४१ − ४१ |

वरील प्रयोगावरून पुढील गोष्टी दिसून येतातः— संभव जों जों थोडा तों तों थोड्या उदाहरणांवरून वस्तुस्थिति कळण्याचा संभव थोडा असतो व अर्थात् गैरसमज होण्याची भीति जास्त राहते; उ० दहाही वेळां मुखवटा येण्याचा संभव, एकंदर १०२४ प्रयत्नांत फक्त एकदाच असल्यामुळें, पहिल्या प्रयोगांत अपेक्षित उत्तर वस्तुस्थितीच्या चौपट वेळां व दुसऱ्या प्रयोगांत तें शून्य वेळां आलें. उलट, संभव जों जों जास्त, तों तों तेवढ्याच प्रयत्नांत उत्तरें वस्तुस्थितीच्या पुष्कळ जवळ येण्याचा संभव जास्त असतो; म्हणूनच ५ मुखवटे व पांच मागली बाजू येण्याच्या प्रसंगांत तफावत फार थोडी ( पहिल्या प्रयोगांत फक्त २५२–२५०= $\frac{२}{२५२}$ व दुसऱ्या प्रयोगांत २५२–२०९ = $\frac{४३}{२५२}$ ) पडली. अर्थात् हे प्रयोग जास्त ( अनंत वेळां ) केले, तर दहाही मुखवटे वर येण्याचीं उदाहरणें, गणितास अनुसरून जितकीं यावयाचीं तितकीं आलेलीं आढळतील. यावरून थोडीं उदाहरणें भ्रामक कशीं असतात ( विशेषतः इष्ट गोष्टीचा संभव थोडा असतो तेथें), व जों जों उदाहरणें पुष्कळ तों तों त्यांवरून निघणारें अनुमान वस्तुस्थितीस धरून कसें असतें हें समजून येईल.

---

## प्रकरण तिसरें.

( भ्रमोत्पत्तीची मीमांसा चालू. )

### भावनेचे परिणाम.

**मनाचा, विशेषतः कल्पना, भावना, सूचना व मनाची एकाग्रता यांचा रोगोत्पत्ति, रोगपरिहार, वेदनानुभव, आभास वगैरे बाबतींत होणारा परिणाम.**

( येथें 'सूचना' हा शब्द Suggestion या पारिभाषिक शब्दाचा प्रतिनिधि म्हणून वापरला आहे. त्याचा थोडक्यांत अर्थ 'आपणास अमुक होणार अशी मनाची पूर्ण भावना' हा आहे. या संज्ञेबद्दल जास्त माहिती डॉ० गणपुले यांचे 'मानसोपचार' या ग्रंथांत पहावी.)

सूचना अथवा भावना हिचा परिणाम किती होतो, ह्याबद्दल माहिती बऱ्याच लोकांना नसल्यानें पुष्कळ परिणामांचें कारकत्व भलत्याच गोष्टीकडे जाते. यासंबंधानें लेखकाचे पुढील कांहीं प्रत्यक्ष अनुभव पाहाः—

( १ ) आपणांस वायूचा झटका येत आहे अशी भीति वाटल्यावरून एका गृहस्थानें वैद्यबोवांना हेमगर्भाची मात्रा देण्याचा आग्रह केला. वैद्यबोवांनीं चिकण्यासुपारीचें एक खांड डबींतून काढून, तें मात्रा असल्याचा बहाणा करून, मधांत उगाळून रोग्यास दिलें. ते घेतल्याबरोबर रोग्यास " वायूचा झटका जाऊन चांगली हुषारी आली " असें वाटलें.

( २ ) एका बाईस तापांत वायु झाला असतां, आपल्यास "लिंबगांवच्या कोटेश्वराचें तीर्थ दिल्यास बरें वाटेल " असें तिनें सांगितलें. संध्याकाळीं कोटेश्वराचें तीर्थ म्हणून घरच्या देवाचें तीर्थ दिलें व तिला आराम वाटला.

( ३ ) एका रोग्यास मलावष्टंभासाठीं होमिओपाथिक औषध म्हणून साधें पाणी नेहमींच्या छोट्या बाटलींत भरून एका डॉक्टरनीं कित्येक दिवस पर्यंत दिलें व त्या औषधामुळेंच त्याची " ती तक्रार नाहींशीं झाली," असें रोग्यानें सांगितलें.

**ग्रंथांतील व ऐकीव उदाहरणेंः**–(१) डॉ. मॅक्‌केंझींचा अनुभव–एका बाईला गुलाबाच्या फुलाच्या वासानें दम्याचा झटका येत असे. तो केवळ भावनेनें येतो कीं काय हें पाहण्याकरितां त्यांनीं ती बाई दवाखान्यांत असतांना नोकराकडून एक गुलाबाचें फूल तेथें आणविलें. लागलीच ती बाई ' मला शिंक येत आहे ' असें म्हणूं लागली. थोड्या वेळानें ' घसा व नाक खाजतें आहे ' असें ती म्हणूं लागली. एक दोन मिनिटांत तिचा घसा घोगरा झाला, डोळे लाल होऊन त्यांतून पाणी येऊं लागलें, कानांत खाज उत्पन्न झाली, आणि नाकांतून पाणी वाहूं लागलें. लौकरच छातीवर दडपण पडल्यासारखें वाटून जीव घाबरा झाला................ आश्चर्याची गोष्ट ही कीं, हें गुलाबाचें फूल खरें नसून कृत्रिम होतें व त्याच्याबरोबर धूळ-धुराळा येऊं नये म्हणून त्याची पाकळीन पाकळीही आधीं पुसून काढली होती !

ही गोष्ट त्या बाईला सांगितली तेव्हां तिलाही आश्चर्य वाटलें !

P.* ३७२ पान.

अमक्या जागेंत गेली कीं अमक्या बाईला जांभया किंवा शिंका येऊं लागतात व तो भुताटकीचाच परिणाम असला पाहिजे, असें ज्यांना वाटतें, त्यांनीं, विकृत मनावर कल्पना किंवा भावना यांचा परिणाम किती होतो याचा, वरील व पुढील उदाहरणांवरून, विचार करावा.

( २ ) एकदां दोघा स्नेह्यांनीं एका होटेलांत रात्रीं मुक्काम केला. त्यांपैकीं एकाला, कधींकधीं रात्रीं किंवा पहाटे दम्याचा झटका येत असे त्याप्रमाणें, त्या रात्रीं दम्याची उसळी आली. त्याबरोबर, जीव घाबरा झाल्यामुळें हवेसाठीं शेजारची खिडकी उघडण्यास, त्यानें आपल्या स्नेह्यास सांगितलें. रात्र अगदीं अंधारी होती. अंधारांत दाराचें हँडल वगैरे न सांपडल्यामुळें दार उघडतां येईना; तेव्हां घाबऱ्या झालेल्या रोग्याचे हाल वांचविण्यासाठीं शेवटचा उपाय म्हणून त्या स्नेह्यानें आपला बूट घेतला व तो मारून खिडकीचें तावदान फोडलें. लागलीच दमेकऱ्याच्या घाबरलेला जीव स्वस्थ झाला, व त्याला झोप आली. सकाळीं जागे झाल्यावर पाहतात तों खिडकीचें दार अगदीं शाबूत बंद असून जवळच्या भिंतींतील कपाटाचें काचेचें दार फुटलें आहे, व रात्रीं आपण 'खिडकीचें तावदान' म्हणून जें फोडलें तें हेंच तावदान होतें असें आढळून आलें !

अर्थात् खिडकी उघडलेली जाऊन घाबरलेल्या जिवाला हवा मिळाली ही केवळ भावना होती ! P. पानें ३६५–३६६.

शरीरांतील महत्त्वाच्या क्रिया शरीरांतल्या कांहीं ग्रंथीं ( glands )-पासून स्रवणाऱ्या रसामुळें होतात, व हे रस कमी झाले असतां, इतर प्राण्यांच्या त्या त्या ग्रंथींचे भाग रोग्यास दिल्यानें कांहीं वेळा उत्तम फायदा होतो असे अलीकडे डॉक्टरांना आढळून आलें आहे. या चिकित्सापद्धतीस glandular therapy किंवा ग्रंथिचिकित्सापद्धति म्हणतात. या पद्धतीचें तत्त्व निघाल्यावर थायरॉईड ( thyroid ) ग्रंथींचा उपयोग Myxedema

---

* P. या खुणेचा अर्थ Dr. Walsh यांचे Psychotherapy ( म्हणजे मानसोपचार ) हा ग्रंथ.

ह्या विकारावर केला, व तो फार हितावह ठरला. ह्या उपायाचा विशेष बोलबाला झाल्यामुळें अशा प्रकारच्या उपायाबद्दल लोकांची श्रद्धा विशेष वाढली व त्यावेळीं पुढीलसारखे अनेक चमत्कार घडले.

( ३ ) Prostatism म्हणजे prostate( पौरुषग्रंथी )ची वृद्धि या विकारावर जनावराच्या त्याच इंद्रियाचें द्रव्य दिलें असतां फायदा होईल असें जर्मनींतील एका डॉक्टरांना वाटल्यावरून त्यांनीं रोग्यास हें औषध देण्यास सुरवात केली. पुष्कळ रोग्यांना त्यापासून फार फायदा वाटला. त्यांची नेहमींची लघवीची अडचण नाहींशी झाली व प्रकृतीमध्यें सुधारणा झाली. पुढें 'बैलाचे हें ( Prostate ) इंद्रिय कोठें असतें व तें कसें काढावें' याबद्दल एकानें माहिती विचारली असतां, हे डॉक्टर आपल्या खाटकाकडे गेले, व तो त्या इंद्रियाचा केवढा भाग कसा कापून घेतो हें पाहूं लागले; तों त्यांना समजून आलें कीं, आपण खाटकाला दिलेल्या माहितीवरून त्याला बरोबर बोध न झाल्यानें तो पौरुषग्रंथीऐवजीं जवळचें रेतसाशय हें इंद्रिय कापून घेत होता व अर्थात् हाच पदार्थ पौरुषग्रंथि म्हणून रोग्यांस दिला जात होता !

( ४ ) एका अमेरिकन डॉक्टरांना वाटलें कीं रेतसाशय कापून टाकल्यानें पौरुषग्रंथिवृद्धि या विकारांत फायदा होईल, व त्याप्रमाणें त्यांनीं कांहीं रोग्यांवर प्रयोग केला. त्यांना फायदा झाल्याचें दिसल्यावर दोन्ही रेतासाशय काढण्याऐवजीं एक रेतसाशय काढून फायदा होईल अशी कल्पना निघाली व त्याप्रमाणें प्रयोग केला. त्यानेंही कांहीं रोग्यांचा फायदा झालासें वाटलें. मात्र जास्त अनुभवांवरून असें कळून आलें कीं, ह्या उपायाचा खरा उपयोग तादृश होत नसून झालेला परिणाम बहुतेक भावनाजन्य होता. शरीरांतील एक इंद्रिय कापून टाकावयाचें एवढा जालीम उपाय आपण करणार ही भावना व ऑपरेशननंतर मिळणारी विश्रांति यांमुळें रोग्यास फायदा झालासें वाटत असे.

( ५ ) Grave's disease म्हणून एक विकार आहे. तो थायरॉइड ग्रंथीच्या उपयोगानें बरा होईल असें समजून त्या औषधाचा उपयोग इंग्लंडमध्यें करण्यांत आला व त्याचा उपयोग चांगला झालासें वाटलें ! पुढें

असें कळून आलें कीं, हा विकार ह्या ग्रंथीपासून उत्पन्न होणाऱ्या स्रावाच्या कमतरतेमुळें उत्पन्न होत नसून उलट स्रावाच्या आधिक्यामुळेंच उत्पन्न होतो. अर्थात् ही ग्रंथी दिल्यानें हा विकार कमी होण्याऐवजीं वाढण्याचा संभव आहे, व तसें कांहीं प्रसंगीं घडलेंही. तरीही या औषधानें कांहींना गुण आलाच !

( ६ ) थायमस म्हणून जी ग्रंथी आहे तिचा उपयोग केल्यानें ‘ ग्रेव्हज विकार ’ बरा होतो अशी एकदा कल्पना निघाल्यावर तिचा उपयोग केला व त्यामुळेंही कांहीं रोग्यांना फायदा झालासें वाटलें. पण जास्त अनुभवानंतर कळून आलें कीं ह्या उपायाचा या रोगावर कांहींच उपयोग होणें शक्य नाहीं !

( ७ ) प्राचीन काळीं ग्रीसमध्यें प्रख्यात असलेलें ट्रॉय शहर खोदण्याचें काम कांहीं वर्षांपूर्वी चालू होतें तेव्हां तेथील पाणी स्वच्छ नव्हतें म्हणून कामावरील मुख्य अधिकारी श्लीमन हे लांबच्या एका झऱ्याचें पाणी आणीत. यावरून तेथल्या लोकांना वाटलें कीं, या झऱ्यांत कांहीं विशेष गुण असावा. थोड्याच दिवसांत तो झरा औषधी झरा म्हणून प्रसिद्ध झाला, व त्याचें पाणी प्याल्यानें पुष्कळ लोकांचे विकार बरे झाले.

( ८ ) विजेचा शोध लागल्यानंतर घडलेले चमत्कार—लायप्सिक येथील विंक्लर, हे म्हणतात “ Leyden Jar (लेडन जार)ला हात लावला तेव्हां सर्व अंगाला झटके बसले, रक्त इतकें उसळलें कीं ताप येईल अशी भीति वाटल्यानें तापहारक शीत उपचार करावे लागले, डोकें इतकें जड झालें कीं त्याच्यावर जणुकाय एक धोंडाच ठेवला आहे असें वाटे. दोनदा घुणा फुटला. पत्नीनें त्या बरणीला दुसऱ्यांदा स्पर्श केला तेव्हां तिला चालतां येईनासें झालें व तिसऱ्यांदा स्पर्श केल्यावर तिचा घुणा फुटला....... ”

( ९ ) पुढील रोगावर विजेच्या उपायांचा उपयोग होतो असें त्या वेळीं कांहीं डॉक्टरांना आढळून आलें—फुफ्फुसज्वर, जलोदर, हगवण, अमांश, पित्तज्वर, typhus व अनेक प्रकारचे संततज्वर, देवी, anthrax इत्यादि सांध्यांचे रोग, क्षय, मुलखडा, मूत्राशयासंबंधी विकार...इ.

वरील सर्व परिणाम विजेचे खरे नसून केवळ कल्पनेचे होत असें आतां आढळून आलें आहे. P. ४२।४३

(१०) 'मिस्. बी'ची गोष्ट—नायट्रस ऑक्साइड अथवा हसविणारा गॅस याचा शोध लागल्यानंतर, कल्पनेचा परिणाम मनावर किती होतो हें पाहण्याकरितां एकदां मिस बी. ह्या स्त्रीला डॉक्टर पिक्टेट ( Pictet ) ह्यांनीं साधी हवा भरलेली बाटली हुंगण्यास सांगितलें. दोन तीन वेळा हुंगतांच ती बाई बेशुद्ध झाली ! P. ११८

(११) पुष्कळ वेळेला वांति केवळ भावनेमुळें किंवा कल्पनेमुळें होते. अन्नांत गेलेल्या घाण पदार्थांमुळें वांति झाली पण पुढें ती घाणीची कल्पना खोटी ठरली अशीं अनेक उदाहरणें आहेत. माशीमुळें वांति होते हा समज खरा नसावा असें एका वैद्यांचें म्हणणें आहे. एका आजारांत वांति होणें जरूर होतें म्हणून दोन माशा मारून गुळांत मिसळून त्या एका मूल रोग्यास दिल्या पण वांति झाली नाहीं असा ते आपला प्रत्यक्ष अनुभव सांगतात.

(१२) फ्लॉबर्ट ह्या फ्रेंच कादंबरीकारानें आपला अनुभव असा सांगितला आहे कीं, त्याच्या Bovary या कादंबरींत नायिकेनें सोमलाचें विष घेतलें असें वर्णन करण्याकरितां त्यांनीं ह्या विषाचे परिणाम काय होतात याची पुस्तकांतून माहिती मिळविली, व कादंबरींत त्या परिणामाचें यथातथ्य वर्णन केलें. तें वर्णन करतांना त्या त्या भावना त्यांना एथपर्यंत झाल्या कीं सोमल मारक प्रमाणांत घेतला असतां, लसुणेसारखा वास व कळकट चव तोंडांमध्यें वाटणें हीं जीं लक्षणें होतात तींही आपल्यास होत आहेत असा भास त्यांला हुबेहुब झाला.

( १३ ) सूचना ( Suggestion ) व तिचे जोडीस कुनिरीक्षण यांमुळें होणाऱ्या भासाचें अथवा भ्रमाचें उदाहरण—१९०३ सालीं ब्लँडेलॉट या फ्रेंच प्रोफेसरांना कांहीं नवे अदृश्य किरण आढळून आल्यासारखें वाटलें व त्यांस त्यांनीं एन् ( N ) किरण हें नांव दिलें. त्यांचे सहव्यवसायी प्रोफेसर Charpentier यांना असें आढळून आलें कीं, असे किरण माणसाचे स्नायु व ज्ञानतंतु यांपासूनही निघतात. या

किरणांसंबंधानें प्रयोग करतां त्याचे परिणाम पुढीलप्रमाणें होतात, असें वाटलें— ( १ ) दृष्टीची तीव्रता वाढते. ( २ ) मध्यंतरीं अल्युमिनियम धातूचा तिकोनी लोलक धरला असतां त्या किरणांचें वक्रीभवन होतें. (३) साध्या प्रकाशाची तीव्रता वाढते. ( ४ ) त्यांच्यामुळें वाढणारी ही प्रकाशाची तीव्रता त्यांच्याजवळ पोलादी कानस नेली असतां जास्तच वाढते.

यासंबंधाचे प्रयोग कित्येकांनीं केले, व कांहींना या परिणामांचा अनुभवही आला. पुढें चिकित्सेअंतीं असें आढळून आलें कीं, वरीलपैकीं कांहीं परिणाम हा केवळ 'सूचने'मुळें उत्पन्न होणारा भ्रम होता. कारण, लाकडाची कानस धरून ' पोलादाची कानस धरली ' असें सांगितलें असतां तोच परिणाम घडल्याचें प्रेक्षकांस दिसे, व गुप्तपणें किरणाच्या आड हात धरून आतां 'प्रकाशाची तीव्रता वाढली आहे काय' असें विचारतां ' ती वाढली आहे' अशीं उत्तरें येत असत. §

(१४) भावनेमुळें कांहीं प्रसंगीं मृत्यु थोडा लांबवितां येतो यासंबंधीं उदाहरणें—

एकदा आयर्लंडांतील एका हास्पिटलांतील एक रोगी अगदीं मरणोन्मुख झाला आहे, व त्यास कांहींही उपायांची जरुरी नाहीं असें पाहून डॉक्टर

---

§ Alternating brightness & dimness were announced while the hand was held motionless in the path of the supposed rays, & when the hand was moved, the fluctuations observed had no relation to the movements.

Prof. Wood found that secret removal of the prism ( which was alleged not only to bend the rays but to spread them out into a spectrum) did not seem to interfere with the observations.

It was in fact a hallucination produced by expectation.

—Mrs. Sidgwick's Presidential address 1908, Proceedings of the Society for Psychical Research.

प्रोफेसर स्टोक्स, त्याची कांहीं विचारपूस न करतां त्याच्या खाटेजवळून पुढें निघून गेले,तेव्हां तो रोगी म्हणाला "साहेब, मला कसेंही करून चार दिवस जिवंत ठेवा." "चारच दिवस, कां रे बाबा" म्हणून डॉक्टरनें विचारतां रोगी म्हणाला, " चार दिवसांनीं पेन्शनची तारीख येते व या पैशाची माझ्या बायकोमुलांना फार जरुरी आहे..." तो चार दिवस जगेल असें डॉक्टरांना मुळींच वाटत नव्हतें. चौथ्या दिवशीं डॉक्टर खाटेजवळ येतांच मोठें अवसान आणून त्या रोग्यानें पेन्शनचा कागद डॉक्टरांचे पुढें केला व तो म्हणाला "सही करा, महाराज, पेन्शनच्या कागदावर लौकर सही करा". डॉक्टरानें सही केली व सही केलेली पाहतांच त्या रोग्यानें मान टाकली व प्राण सोडला !

(१५) एकदा एका अट्टल फ्रेंच चोराला चोरीबद्दल कैदेची शिक्षा झाली होती. त्याला व्रणाविकार ( Cancer) झालेला होता, व तो तुरुंगांतच मरेल असें डॉक्टरांना वाटत होतें. पण तुरुंगांत मेल्यास आपलें प्रेत फाडतील ही गोष्ट त्या चोरास नको होती. तो म्हणे " मी कांहीं येथें मरणार नाहीं." तो लवकरच मरणार अशा समजुतीनें तेथील डॉक्टर त्याच्याकडे पहात असतां तो म्हणाला " तुम्ही माझी वाट पाहूं नका. मी कांहीं येथें मरावयाचा नाहीं. चिरफाड करायला माझें प्रेत तुम्हांस मिळावयाचें नाहीं अं ! मी येथें नाहींच मरावयाचा." आणि त्याचप्रमाणें घडलें. अत्यवस्थ असूनही तो रोगी शिक्षा संपण्याच्या दिवसापर्यंत टिकला, व सुटल्यावर घरीं नेतांच त्यास बेशुद्धि आली व त्याचें प्राणोत्क्रमण झालें. P. ९१.

(१६) 'आपण एकादशीला किंवा एकादशीनंतर मरणार' असें अमक्या गृहस्थांनीं सांगितलें व त्याप्रमाणें घडलें अशीं जीं उदाहरणें ऐकण्यांत येतात त्याचा उलगडा बऱ्याच अंशीं 'भावनेचा परिणाम' या तत्त्वानेंच होतो.

## भावनेमुळें विकारोत्पत्ति—

(१७) भावनेमुळें कांहीं विकार कमी होतात एवढेंच नव्हे तर ते उद्भवतातही. त्वचेच्या विकारांवर तरी भावनेचा परिणाम होत नसेल असें कांहींना वाटेल, पण त्यावरही तो होतो. अंगावर पित्ताच्या गांधी

उठणें, herpes (कक्षा), pigmentation, खाज, आंग फुटणें, arte-fact skin lesions ह्या विकारांस मानसिक अस्वस्थता कारणीभूत होते.
P. 492-5

.........त्रास, संताप, विशेष भीति यामुळें ...... इसब उद्भवतो याविषयीं डॉ. वॉल्श लिहितातः—

Relapses occur during periods of business worry or family anxiety......Cabinet crises in England are found to be likely to be followed by the recurrence of eczematous conditions in older members of the Cabinet.
P. 492

(१८) दमा—ज्या रोगाचा निकट संबंध मज्जातंतूंशीं आहे अशांपैकीं दमा हा आहे. श्वासनलिकेचा संकोच झाल्यानें फुफ्फुसांस हवा पुरती मिळत नाहीं व त्यामुळें हा विकार होतो. शरिरांतील नलिकांचे स्नायु ज्ञानतंतूंच्या ताब्यांत असतात, म्हणून ज्या गोष्टींचा मनावर परिणाम होतो त्यांचा दम्यावर परिणाम होण्याचा संभव असतो. या कारणानें भीति, आनंद व प्रियाप्रिय गोष्टी यांचा या विकारावर परिणाम होतो, व एकाद्या गोष्टीची धास्ती बसली कीं तिच्यामुळेंही हा विकार उद्भवतो. ही धास्ती कोणास मांजराची तर कोणास घोड्याची असते; व ह्या जनावरास हात लावण्याचें तर दूरच राहो, पण हें जनावर जवळ आल्यानेंही कांहींना विकार होतो. यासंबंधानें डॉ० गुडहार्ट लिहितातः—

An attack of urticaria & coryza followed by asthma has been noticed to come on within ten minutes of having stroked a cat. At other times, sitting in a room in which there was a cat, without any actual contact with it, was sufficient to produce a bad attack, beginning within ten minutes of entering the room.
P. 374.

भावनांचा रोगांशीं संबंध यासंबंधानें डॉ० बु०जे० रॉबिन्सन म्हणतात—

We no longer draw a strict line of demarcation between functional disorders & organic diseases. Emo-

tional disturbances & purely psychic causes can cause functional disorders, which in their turn may cause organic disease, with definite anatomic changes. Anger, worry, fear, jealousy, unrequited love may be the cause of very serious diseases such as gastric & duodenal ulcers, cardiac disease, renal disease with hypertension & perhaps even cancer.

Critic & Guide Vol 29, page 278.

**केवळ भीतीचे परिणाम—**

( १ ) भीतीमुळें तोंड कोरडें पडतें.

( २ ) भीतीमुळें छातीचें धडधडणें सुरू होऊन छातीचा आजार असल्याचीं लक्षणें होतात.

( ३ ) भीतीमुळें बेशुद्धि येते.

( ४ ) भीतीमुळें वांति होणें, घाम येणें वगैरे विशिष्ट प्रकारचीं लक्षणें होतात.

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे आपणाकडून जे होईल अशी भीति वाटतें तें स्वयंसूचनेमुळें (Self-hypnotization) होतें; उ० सायकल खांबावर आपटणार अशी भीति वाटल्यानें सायकलीसकट खांबावर जाऊन आदळणें, कड्याच्या काठाजवळ जातांना झीट येऊन खालीं पडणें...इ.

( ५ ) क्वचित् प्रसंगीं मृत्युही येतो. निषिद्ध गोष्ट केली या भीतीनें, तसेंच बिनविषारी सर्पदंशाच्या भीतीनें मृत्यु आल्याचीं अनेक उदाहरणें आहेत. मात्र असा परिणाम होण्यास रक्ताशय दुर्बल असणें, अतिशय अशक्तता वगैरे एखादें स्पष्ट व्यंग प्रकृतींत असणें कमीजास्त मानानें जरूर आहे.

याबद्दल कांहीं उदाहरणें:—

(१९) इंग्लंडांतील Devizes या गांवीं एक स्मारक आहे. त्यावर पुढील हकीकत लिहिलेली आहे. "या ठिकाणीं १७५३ सालच्या जानेवारीच्या २५व्या तारखेस रूथ पीअर्स या बाईनें 'मी पैसे दिले नसले

तर आतां मला मरण येईल ( drop down dead ) ' अशी आण वाहिली, व लागलीच ती मृत होऊन खालीं पडली. ''

(२०) निषिद्ध पदार्थाबद्दल रानटी लोकांना इतकी भयंकर भीति असते कीं, निषिद्ध पदार्थ खाल्ला असें कळल्यानंतर कांहींना भीतिनें मृत्यु येतो. ( ' The Golden Bough ' हें डॉ० फ्रेझर यांचें प्रसिद्ध पुस्तक पहा )

(२१) साप बिनविषारी असतांनाही दंशाच्या भीतीनें बेशुद्धि आल्याचींच नव्हे तर मृत्यु झाल्याचीं अनेक उदाहरणें तज्ज्ञांचे लेखांत आहेत; ( कर्नल वॉल यांचे ''हिंदुस्तानांतील सर्प'' या पुस्तकांतील खंड २ प्रकरण २ पहा. )

(२२) एक सिव्हिल सर्जन स्वतःचा अनुभव पुढीलप्रमाणें सांगतात. इस्पितळांतील एका पुरभय्या रोग्यास एनिमा देणें जरूर वाटून त्याप्रमाणें त्यांनीं नोकरास सांगितलें. आपणास एनिमा दिल्यास आपण मरूं असें त्या रोग्यानें सांगितलें; पण तें अर्थात् कोणास खरें वाटलें नाहीं. त्या रोग्यास एनिमाची काय दहशत होती ईश्वरास माहीत; चमत्कार असा कीं, एनिमा दिल्यावर तो रोगी खरोखरीच मेला.

(२३) मज्जातंतूचा विकार झालेल्या माणसाचे केसवर डॉक्टरनीं asthenia ( म्हणजे अशक्तता ) हें रोगाचें नांव लिहिलें व तें त्यानें वाचलें, आणि हा कांहीं तरी भयंकर रोग आहे अशी त्या रोग्याची समजूत होऊन त्याची मरणप्राय स्थिति झाली असा एकदा अनुभव आला.

(२४) पुणें येथील डॉ० ...यांच्या मुलीचें रक्ताचा एक थेंब रक्त तपासण्यासाठीं घेणें अवश्य होतें म्हणून तो घेण्यासाठीं बोटास सुइ टोचली, व अशक्त स्थितींत तेवढ्या धक्क्यानें तिला मृत्यु आला ही गोष्ट प्रसिद्ध आहे.

**भावनेच्या परिणामांविषयीं कांहीं आख्यायिका**–(२५) कांहीं वात्रट लोकांनीं एका भोळसट मित्राची चेष्टा करण्याचा बेत ठरवून, प्रत्येकानें

---

*" The mayor & corporation of Devizes avail themselves of the stability of this Building to transmit to future times the Record of an awful event.................: .........she instantly fell down & expired. "

"कांहो, तुम्ही असे पिवळट कां दिसतां, तुम्हांस हळद्या रोग झाला आहे कीं काय' असे निरनिराळ्या प्रकारें विचारून इतकें वेडावून सोडलें कीं, आपणास रोग झाला आहे असें त्याच्या मनानें पक्के घेतलें व तो डॉक्टरकडे औषधासाठीं गेला!

(पुढील गोष्टीच्या खरेपणाबद्दल खात्री देतां येत नाहीं.)

एकदां दोन मुलांची भुताबद्दल पैज लागली. एकानें दुसऱ्याला 'तुझ्या खोलींत पहा आज भूत येतें कीं नाहीं' म्हणून सांगितलें. दुसरा मुलगा उशाशीं पिस्तूल घेऊन निजला. रात्रीं भूत आलें व त्यानें कांहीं गडबड केल्यावरून तो मुलगा जागा झाला. उठून त्यानें भुतावर पिस्तुल रोखलें व सांगितलें 'निघून जा नाहींतर तुझ्यावर पिस्तूल झाडीन;' तरी तें भूत पुढें येत चाललें. "थट्टा नाहीं चालायची; पुढें येशील तर मी पिस्तुल खास झाडीन" असें त्या मुलानें दरडावून सांगितलें. तरी तें भूत न थांबतां पुढें पुढें येऊं लागलें. त्याबरोबर त्या मुलानें पिस्तुल झाडलें, पण त्यानें भुतास कांहींच झालें नाहीं! हें पाहून मुलगा घाबरून धाडदिशी खालीं पडला व गतप्राण झाला!!

वस्तुस्थिति अशी होती की वरील भूत खरें नसून सोंगच होतें. मात्र थट्टा करणाऱ्या मुलानें, हा मुलगा झोंपी गेला असतां त्याच्या पिस्तुलांतील गोळी काढून घेतली होती, म्हणून पिस्तुल खरोखरी वांझच होतें; त्या कारणानें तें उडविल्याचा परिणाम तोतया भुतावर कांहींच झाला नाहीं!

## भीतीसारख्या तीव्र भावनेचा कधीं कधीं होणारा फायदेशीर परिणाम.

अंगावरून वारे गेल्यामुळें अथवा वातरोगानें ज्यांचे अवयव लुले पडले आहेत अशीं माणसें, धरणीकंप, घरास आग लागणें वगैरे अपघात झाले असतां, एकदम चालावयास लागलीं अशीं अनेक उदाहरणें आहेत.

पुढील आख्यायिका नेहमीं सांगण्यांत येते.

(२६) एका बाईनें आळोखेपिळोखे देतांना हात वर केला तों हात तसाच वर ताठून राहिला. कांहीं केल्यानें तो खालीं येईना. हें पाहून एका चतुर वैद्यानें बाईजवळच्या माणसांना आपण काय युक्ति करणार आहोंत हें

कानांत सांगून त्यांना जवळ आडोशास बसण्यास सांगितलें. नंतर बाईट हेतूचा थोडासा अविर्भाव करून लुगड्याच्या निऱ्या ओढण्याच्या आवेशानें त्यानें लुगड्यास हात घातला, तों लागलीच बाईचा हात खालीं आला व नेहमींसारखा वळूं लागला.

### तीव्र भावनेमुळें उत्पन्न होणाऱ्या अवधानाभावाचा परिणाम.

(२७) भावना उत्पन्न होण्यास त्या गोष्टीकडे लक्ष जावें लागतें. लक्ष गेलें नाहीं तर भावनाही उत्पन्न होत नाहीं; म्हणून भावना व त्यामुळें उत्पन्न होणारें संवेदन व अन्य परिणामही टाळण्यास तिकडचें लक्ष काढून घेणें, अथवा लक्ष दुसरीकडे घालविणें हा एक उपाय आहे. ज्याला फक्त एकाच वस्तूची आवड त्यास त्या वस्तूच्या वियोगामुळें असह्य दुःख होतें याचें कारण त्याचें दुसरीकडे लक्ष जात नाहीं हेंच होय. लक्ष दुसरीकडे पूर्णपणें गेले म्हणजे कसल्याही वेदनांचा विसर पडतो. आपण होऊन दिव्यावर बोट धरून त्याचा कोळसा होईपर्यंत बिशप क्रॅनमरनें दिव्यांतून बोट काढलें नाहीं अशी जी आख्यायिका आहे तिच्यांतील रहस्य हेंच आहे. अशा प्रकारचीं उदाहरणें अनेक आहेत.

(२८) जिवंत जाळण्याची शिक्षा झालेले सत्याग्रही धर्मवीर, लाकडें पेटवल्यावर त्यांच्या ज्वाळा अंगास लागत असतांनाही, आनंदांत होते, एवढेंच नव्हे तर मित्रांशीं स्वस्थपणें बोलत होते, अशा ज्या हकीकती सांगण्यांत येतात त्यांतील रहस्य हेंच कीं, त्या व्यक्तींनीं आपलें लक्ष शरीरापासून काढून घेऊन तें आपल्या कार्याच्या महत्त्वाकडे लाविलें होतें व आपण सुकृत्य करीत आहोंत अशा भावनेंत त्यांचें चित्त तन्मय झालें होतें.

(२९) आणीबाणीच्या किंवा आवेशाच्या प्रसंगीं हाड दुखावलें किंवा शरिरास मोठी इजा झाली तर तिचें भान रहात नाहीं हा अनुभव सर्वांस आहे.

(३०) युद्धाच्या आवेशांत मोठमोठ्या जखमादेखील कांहीं वेळ कळून येत नाहींत हें सुप्रसिद्ध आहे. यासंबंधीं एक आख्यायिका पुढीलप्रमाणें आहे. एकदा लढाई चालू असतां एक कार्पोरल ( नाईक ) नेपोलियनकडे आला व नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें त्यानें झालेली हकीकत सविस्तर

इत्थंभूत सांगितली. त्याचा चेहरा पांढराफटक झालेला पाहून नेपोलियननें त्याचें सर्व अंग निरखून पाहिलें, तेव्हां त्याला मोठी प्राणघातक जखम झालेली असून त्यांतून रक्तस्राव होत आहे असें नेपोलियनच्या दृष्टीस पडलें. नेपोलियन म्हणाला "अरे पण बाबा, तुला जखम झालेली दिसते!" ह्या वेळपर्यंत नाइकाचें लक्ष बादशहांना हकीकत कळवावयाची एवढ्याच गोष्टी-कडे होतें, पण वरील शब्द ऐकल्याबरोबर त्याचें लक्ष जखमेकडे गेलें व लागलीच, "हुजूर मी आतां आपली रजा घेतो" असें म्हणून त्यानें जमिनीवर आंग टाकलें व प्राण सोडला!

(३१) एकदां थिएटरला आग लागली असतां धावपळ करणाऱ्या माणसांपैकीं एका बाईच्या कानांतील कर्णभूषण ओढलें गेल्यामुळें कान तुटला. त्याचें तिला भान मुळींच राहिलें नाहीं. पण कांहीं वेळानें दुसरा एक मनुष्य 'अहो बाई तुमचा कान कशानें तुटला!' असें तिला म्हणतां-क्षणींच तिचें लक्ष त्या गोष्टीकडे गेलें, व लागलीच ती झीट येऊन पडली.

भावनेमुळें रक्तस्राव होणें व न होणें याविषयीं अनुभव—

(३२) डॉ० मनरो म्हणतात. "एकदां तीनशें विद्यार्थी व शंभर डॉक्टर यांच्या देखत मी तीन समाधिगत माणसाच्या गालांत जाड सुया खुपसल्या, व हजर असलेल्या एका डॉक्टरना विचारलें 'तुम्ही सांगा, या तीन माणसांपैकीं कोणाच्या गालांतून रक्त यावें व कोणाच्या येऊं नये" त्यांनीं एकाकडे बोट केल्यावर मी सुया काढल्या व मी म्हटल्याप्रमाणें फक्त त्या एकट्याच्या गालांतून रक्त आलें.†

असें घडण्याचें रहस्य हें आहे कीं, ज्याच्या गालांतून रक्त यावें असें हवें असेल त्यास 'येथें दुखतें आहे ना' अशी सूचना द्यावी म्हणजे त्या कल्पनेनें त्या भागाकडे रक्तप्रवाह सुरू होतो, व ज्यांच्या जखमेंतून रक्त न यावें अशी इच्छा असेल त्यांना 'तुमचा गाल मुळींच दुखत नाहीं, तो अगदीं पूर्णपणें बधिर झाला आहे' अशी सूचना द्यावी. रक्त येऊं न देतां सुई

† In the presence of......one hundred physicians and three hundred medical students I thrust a steel hot pin through the cheeks of three hypnotiged subjects.

टाचणी टोचण्याचा हा प्रयोग दहापैकीं ९ माणसांवर यशस्वी होतो.”
Dr. Munroe's "Suggestive Therapeutics" पान ८०.

असाच प्रयोग थोड्या दिवसांपूर्वी मुंबईचे प्रसिद्ध डॉ० न्यूनन् यांनीं मेडिकल कॉलेजचे विद्यार्थी व प्रोफेसर यांच्या देखत करून दाखविला.

भावनेमुळें आजार येतो, त्याप्रमाणें लक्ष दुसरीकडे जाऊन भावनेचें विस्मरण झाल्यानें आजार जातो, याचीं उदाहरणें:—

(३३) बरास ह्या फ्रेंच डॉक्टरास अग्निमांद्याचा विकार झाला होता व त्यामुळें ढेकरा येणें, मलावष्टंभ, अस्वस्थता, खिन्नता वगैरे त्रास होत होता. एके दिवशीं आपल्या मुलीस क्षयाची भावना झाली आहे असें त्यांना आढळून आलें; व तिची व्यवस्था करण्याच्या कामांत गढल्यानंतर त्यांना लौकरच दिसून आलें कीं, आपला अग्निमांद्याचा आजार पार नाहींसा झाला आहे.

(३४) कांहींना भीतीनें शौचास होतें किंवा ढाळ होतात ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. ‘तोंडी परीक्षेस बोलावलें आहे, अथवा वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं बोलावलें आहे’ असें ऐकतांच ज्यांना धास्तीनें शौचास लागते असे अनेक लोक आहेत.

(३५) एका माणसास दर अमावस्येच्या सुमारास शौचास पातळ होत असें. त्याचें कारण असें आढळून आलें कीं त्याची आई त्यास लहानपणीं दर अमावास्येस रेचक देत असे व त्या गोष्टीची आठवण त्यास अमावास्येला होऊन भावनेमुळें त्यास शौचास पातळ होत असे.

(३६) डॉ. सिडनहॅमची गोष्ट—इंग्लंडमधील १७ व्या शतकांतील प्रसिद्ध डॉक्टर सिडन्हॅम यांच्याकडे एक श्रीमंत रोगी बरेच दिवस औषध घेत होता. त्याला त्यांनीं शेवटीं सांगितलें “स्कॉटलंडमधील इन्व्हर्नेस शहरीं रॉबर्टसन नांवाचे डॉक्टर आहेत त्यांचें तुम्ही औषध घ्या म्हणजे लौकर बरें व्हाल.” त्याप्रमाणें ते रोगी इन्व्हर्नेसला गेले, व तेथें रॉबर्टसन्च्या घराचा पत्ता विचारूं लागले तों तेथें त्या नांवाचें डॉक्टर कोणी रहात नाहींत असें समजून आलें. त्याबरोबर रोग्याला राग आला व स्वारी चरफडत परत लंडनला आली, व ‘इतके कोस मला उगाच पायपिटी करावी लागली’ म्हणून ते सिडनहॅमजवळ रागानें उद्गारले. सिडनहॅम-

साहेबांनीं विचारलें " पण आतां तुमची तब्येत सुधारली आहे ना! " रोगी म्हणाला " होय, तब्येत सुधारली आहे, पण त्याचें श्रेय तुम्हांस काय! " सिडनहॅम म्हणाले " पण प्रकृति सुधारण्याचें श्रेय माझ्या राबर्टसन यांस तर आहे ना! इनव्हर्नेसला पोचेपर्यंत आपणास रॉबर्टसन बरें करील ह्या विचारांत तुम्ही तन्मय झाला, व परत येतांना माझी तासडपट्टी करावयाची या विचारांत तन्मय राहिला. त्यामुळें तुम्ही आपला आजार विसरला, व त्यामुळेंच तुमचा रोग गेला कीं नाहीं! "

## भावनेच्या परिणामाची मर्यादा.

कल्पना किंवा भावना यामुळें रोग होतात, जातात, व मृत्यूही लौकर किंवा उशीरा येतो तर कल्पना हें एक सर्वकार्यकारी अमोघ अस्त्र आहे अशी कांहींची चुकीची समजूत होईल; यास्तव त्यांनीं पुढील मुद्दा लक्षांत ठेवावा. मन व भावना यांचे जे चमत्कार सांगितले आहेत ते सर्व कालीं सर्व व्यक्तींमध्यें केवळ भावनेनें पूर्णपणें घडून येणारे नसून त्यास भावनेकडून कमी जास्त साहाय्य मिळतें एवढीच वस्तुस्थिति आहे. निसर्ग अथवा प्रकृति व मूर्त वस्तु यांचें साहाय्यांवाचून कल्पना सर्व कार्य करते असें समजणें हें सैन्यावांचून सेनापति व पाण्यावांचून शेतकरी काम करील हें समजण्याइतकेंच अज्ञानमूलक आहे. यावरून, भावनेपासून होणाऱ्या परिणामास मर्यादा आहे हें दिसून येईल. खरोखरी १० वाजल्यावर भूक लागली असतां, ' अद्याप १० वाजले नाहींत' असें खोटेंच एकाद्यास सांगितलें तर त्याच्या भुकेची तीव्रता थोडी कमी होईल; पण असें सांगून त्याची भूक फार वेळ थांबवितां यावयाची नाहीं. कितीही करारी मनुष्य असला तरी तो न खातां किंवा न पितां महिनाभर राहूं शकत नाहीं. म्हणून भावनेनें वाटेल तें होईल अशी समजूत कोणीं करून घेऊं नये.

---

# प्रकरण ४ थें.

## ( भ्रमोत्पत्तीची मीमांसा चालू )

## नैसर्गिक रूपान्तराचे परिणाम लक्षांत न घेतल्यामुळें होणारे, विशेषतः औषधोपायांविषयीं भ्रम.

**विकारांत होणारा नैसर्गिक बदल**—कांहीं विकार कालांतरानें आपोआप पूर्णपणें बरे होतात व कांहींची तीव्रता आपोआप कमी होते अशी वस्तुस्थिति आहे. परंतु ही गोष्ट पुष्कळांस माहीत नाहीं. कांहींही आजार झाला, कीं औषध घ्यावयाचें, ह्या चालीमुळें, एकादें औषध घेतल्या-नंतर विकारांत फरक झाला म्हणजे तो त्या औषधामुळेंच झाला अशी लोकांची कल्पना होते. यामुळें पुष्कळ औषधांना कधींकधीं फुकट श्रेय मिळतें. यासंबंधीं पुढील उदाहरणें पहा—

धावरें या रोगावर रामबाण म्हणून आजपर्यंत अनेक औषधें युरोपांत प्रसिद्धीस आलीं. या रोगाची मुदत ठराविक ( ५–६ दिवसांची ) आहे या कारणानें चवथ्या पांचव्या दिवशीं कोणतेंही औषध दिलें तर त्याच्या दुसऱ्या तिसऱ्या दिवशीं, म्हणजे रोगाच्या ५व्या किंवा ६व्या दिवशीं, रोग कमी व्हावयाचाच असल्यामुळें, रोग कमी झालेला पाहून तो त्या औषधा-मुळेंच कमी झाला, अशीच समजूत होते. †

अशीच स्थिति न्युमोनिया व टायफॉइड यांसंबंधानें आहे. ह्या विका-रांचा अवधि अनुक्रमें ९ दिवस ( ७–११ ) वं ३।४ आठवडे आहे, व या अवधींनंतर विकाराच्या स्थितींत स्पष्ट बदल होतो; आणि शेंकडां ३०–४० प्रसंगीं रोग आपोआप कमी होत असल्यामुळें, कोणताही उपाय

---

† There is scarly any drug that has not at some time been recommended as a specific for erisipelas.

*Psychotherapy, page 22.*

केला, तरी बऱ्याच प्रसंगीं विकाराला उतार पडतो, म्हणून त्या उपायामुळेंच विकार कमी झाला अशी समजूत होते.

पुढील अनुभवही पहा—

**चामखीळ**—हे कधीं कधीं आपोआप, तर कधीं कधीं त्यांना २।४ वेळां दाबल्यानें, नाहींसे होतात. प्रसिद्ध बेकनसाहेब १६ वर्षांचे असतांना त्यांच्या हातावर शंभर चामखीळ झाले होते, व त्यांमध्यें एक लहानपणापासूनचा होता. ते कसे गेले याची हकीकत ते पुढीलप्रमाणें सांगतातः-"एका दरबारी वकीलाची बायको डुकराच्या ताज्या कातड्याचा तुकडा, त्याला लागलेल्या चरबीसह, घेऊन आली, व तिनें ती चरबी माझ्या चामखिळांना चोळली. नंतर तें कातडें, चरबीचा भाग सूर्याकडे राहील अशा रीतीनें, खोलींतील दक्षिणेकडील खिडकीच्या उभ्या खांबाला चूक मारून तिनें अडकविलें. महिना सवा महिन्यानें, सर्व चामखीळ-लहानपणापासून एक चामखीळ होता त्यासकट-नाहींसे झाले !"

प्रस्तुत लेखकाला पुढील अनुभव आला. एकदां मनगटावर लहानशा वाटाण्यासारखी गांठ आलेली दिसली व ती वाढत वाढत एका महिन्यानें मोठ्या वाटाण्याएवढी झाली. ती डॉक्टरांना दाखविली तेव्हां त्यांनीं 'मधून मधून दाबून पहा, नाहींशी झाली नाहीं तर कापावी लागेल' म्हणून सांगितलें. त्याप्रमाणें दोन चार वेळां ती दाबली पण ती म्हणण्यासारखी कमी झाली नाहीं. पुढें या गोष्टीचें कांहीं दिवस विस्मरण झालें, व एके दिवशीं मनगटाकडे लक्ष गेलें तेव्हां दिसून आलें कीं ती गांठ पार नाहींशी झाली आहे ! ( दाबल्यानें आंतील गांठीवरील आवरण फुटलें असेल व त्यांतील द्रव्य वाहून गेलें असेल अशी याची उपपत्ति लागेल. पण दाबल्यानंतर गांठीमध्यें तावडतोब फरक मुळींच दिसून आला नाहीं, म्हणून गाठ नाहींशी होण्याची क्रिया पुढें क्रमाक्रमानें आपोआप झाली असें म्हणावें लागतें. )

मंत्रानें चामखीळ बरे झाल्याच्या अनेक कथा आहेत त्याचें बीज काय हें वरील हकीगतीवरून कळून येईल. चामखिळावर मनाचा परिणाम किती होतो (अथवा ते आकस्मिकपणें कसें नाहींसें होतात) याविषयीं

डॉ. ट्यूक यांनीं अनेक उदाहरणें दिलीं आहेत त्यांपैकीं पुढील एक पहाः—

"एक गृहस्थ एका स्त्रीशीं हस्तांदोलन करीत असतां त्यांना तिच्या हातावर चामखीळ दिसले. ते म्हणाले 'तुमचे चामखीळ पुढील रविवारापुढें राहणार नाहींत.' आणि खरोखरच त्या वेळेपर्यंत ते नाहींसें झाले व फिरून आले नाहींत."

युरोपियनांतील 'विकत घेण्याच्या' तोडग्यानें चामखीळ नाहींसें होतात याबद्दलही अनेक आख्यायिका आहेत. एखादा भला मनुष्य चामखीळवाल्याला म्हणतो "ही घे चवली व दे मला तुझे चामखीळ" व असें म्हणून तो तें नाणें देतो, आणि कांहीं दिवसांनीं ते चामखीळ नाहींसें झाले, असें आढळून येतें.

**पूर्वी रामबाण ठरलेले पण खरोखरीं निरर्थक असे उपाय**—पुढें सांगितलेले उपाय पाश्चात्यांमध्यें एकेका काळीं गुणकारी म्हणून फार प्रसिद्ध होते. ह्या उपायांमध्यें विशेष गुण नसतांना, त्यांना जें श्रेय मिळालें त्याचें कारण आपोआप किंवा कालांतरानें होणारा नैसर्गिक परिणाम व लोकांची भावना हेंच होतें असें दिसून येईल.

(१) Sympathetic Treatment म्हणजे 'सदृशोपाय'—हा युरोपमध्यें पुष्कळ वर्षे प्रचलित असा सर्वमान्य उपाय होता. त्याचें स्वरूप असें कीं, एकाद्यास शस्त्रानें जखम झाली असतां ती जखम स्वच्छ धुवून बांधून ठेवावयाची व ज्या शस्त्रानें जखम झाली असेल त्या शस्त्रास मलम लावावयाचें. तें शस्त्र न मिळेल तर त्या शस्त्राची प्रतिमा लाकडाची करावयाची व तिला तें मलम रोज चोळावयाचें !

ह्या मलमाचे पाठ अनेक होते. त्यांपैकीं कांहींमध्यें जुन्या प्रेताचे (mummy) भाग, माणसाचें रक्त, बेड्यांसकट फाशी दिलेल्या चोराच्या कवटीवरील शेवाळ इत्यादि घटक होते. या उपायाचा हा विशेष सांगत कीं, मलम शस्त्रास लावलें जात आहे तें रोग्यास सांगावेंही लागत नसे. मलम लावण्यास प्रारंभ झाला, कीं इकडे रोग्यास बरें वाटूं लागत असे. असा अनुभव शेंकडों वेळीं आल्याचीं उदाहरणें लोक सांगतात !

बेकन या प्रसिद्ध तत्त्ववेत्त्यानें या मलमाचा उल्लेख Natural History या ग्रंथांत केला आहे, व त्याच्या उपयोगाबद्दल विश्वसनीय माणसांचा पुरावा मिळतो म्हणून सांगितलें आहे. बेकनसाहेब म्हणतातः—" ज्या प्राण्यांपासून मलमास लागणारे पदार्थ मिळवावयाचे ते कसे मारावे याविषयीं जी माहिती दिली आहे ती आपणांस पसंत नाहीं. कारण त्यामुळें मलमाचा गुण आला नाहीं म्हणजे त्यांतील औषध योग्य प्रकारें मिळविलें गेलें नाहीं असें म्हणण्यास सबब मिळते. तथापि ते अमुक मुहूर्तावर केलें पाहिजे ही अट घातली नाहीं हें एक चांगलें आहे. कारण अशी अट असली कीं, गुण न येईल तेव्हां तें 'योग्य मुहुर्तावर (under a figure of heaven) केलें नाहीं' असें म्हणण्यास सबब मिळते. "

ह्या उपायासंबंधानें विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, ह्या उपायानें जनावरांच्याही जखमा बऱ्या होत असत असें लोक सांगतात.

ह्या उपायाबद्दल मोठमोठ्या युरोपियन पंडितांमध्यें वादही झाले आहेत. एकदां दोघा पंडितांनीं या उपायाबद्दल मंडनखंडनपर लेख लिहिले तेव्हां त्यांचा निर्णय करण्यासाठीं ते लेख त्यावेळच्या हेल्मॉंट नांवाच्या प्रसिद्ध भिषगाचार्याकडे पाठविले. त्यांनीं दोघांचेंही लिहिणें अंशतः चूक असल्याचें सांगून असा शोध लिहिला कीं " शस्त्रास जखमेचें रक्त लागलेलें असतें तेव्हां मलमाचा गुण खात्रीनें येतो; पण जेव्हां रक्त लागलेलें नसतें तेव्हा जास्त कडक औषधांचा उपयोग करावा लागतो. बेड्यांसकट फांशीं दिलेल्या गुन्हेगाराच्याच कवटीवरील शेवाळ उपयोग पडतें हें म्हणणें बरोबर नाहीं. अन्य रीतीनें देहांत शिक्षा झालेल्या गुन्हेगारांच्या कवटीवरील द्रव्यही तितकेंच गुणकारी आहे इ०" ! ! !

दुसरा एक उपाय असा होता कीं मलम, जखमेस न लावतां, जखमेच्या रक्ताचे डाग पडलेल्या कपड्यास लावावयाचें. हा उपायही गुणकारी म्हणून प्रसिद्ध झाला व त्याच्या उपयोगाबद्दल उमराव, राजे इत्यादि मोठमोठ्या लोकांची खात्री झाली !

( २ ) सर कैनेल डिग्बीची प्रसिद्ध Sympathetic Powder ह्या नावाची पूड एका काळीं फार प्रसिद्ध झाली होती. तिचा अद्भुत गुण हा

कीं, जखमी रोग्याच्या रक्तानें माखलेल्या कपड्यांना ती लावली, कीं जखम बरी ( अर्थात् कालांतरानें ) होत असे. ही पूड एका मिशनऱ्यानें मोठ्या श्रमानें मिळविली होती. ती काय आहे हें तो कोणास सांगत नसे. पुढें सर के० डिग्बी यांनीं त्याचें कांहीं काम केल्यामुळें त्यानें त्यांना तें औषध सांगितलें. ह्या पुडीच्या अद्‌भुत गुणासंबंधानें पुढील अनुभव पहा.

"हॉवेल या गृहस्थांना एक जखम झाली असतां, चार दिवसानंतर हॉवेल यांच्या पायमोज्याची रक्त लागलेली फीत ( गार्टर ) सर डिग्बी यांनीं, पूड घातलेल्या पाण्यांत बुडविली; व लागलीच त्या जखमेचा ठणका कमी झाला. फिरून कांहीं वेळानें जखम ठणकूं लागली तेव्हां हॉवेलनें सर डिग्बीकडे आपला नोकर पाठविला. लागलीच डिग्बी साहेबांनी गार्टर पुडीच्या पाण्यांत टाकला, व पुढें ५।६ दिवसांत जखम बरी झाली !

इंग्लंडचा राजा पहिला जेम्स, त्याचा मुलगा पहिला चार्लस, प्रधान डयूक ऑफ बकिंगहॅम व त्या वेळचे बडेबडे लोक ह्यांना ह्या पुडीच्या अद्‌भुत गुणाचा अनुभव आला. राजेसाहेबांनीं सर डिग्बींना ह्या पुडीचा गुप्त पाठ सांगण्यास सांगितले व त्यांनीं स्वतः अनेक वेळा या उपायाचा अनुभव घेतला.

ही पूड दुसरा तिसरा कांहीं पदार्थ नसून मोरचूत हा होता !"

( ३ ) **राजस्पर्श** ( Royal touch )—गंडमाळा व अपस्मार झालेल्या मुलांचें आरोग्य राजाच्या स्पर्शानें सुधारतें अशी इंग्लंडमध्यें फार वर्षें समजूत होती. ज्यांचा गादीवर योग्य हक्क पोंचत नाहीं, अथवा ज्यांनीं प्रचलित धर्मपंथ बदलला (उदाहरणार्थ, आठवा हेनरी व एलिझाबेथ राणी यांनीं रोमन कॅथोलिक धर्म बदलला) त्यांच्या अंगीं हा गुण नसावा अशी कांहीं लोकांना प्रथम शंका होती, पण ह्या उपायाच्या प्रत्यक्ष अनुभवानें ती खोटी टरली; एवढेंच नव्हे तर एलिझाबेथच्या अंगीं हा गुण आहे असें पाहून, ती राज्ञीपदाला योग्य नाहीं असें ज्यांना प्रथम वाटत होते, तेही तिचा हक्क मान्य करण्यास तयार झाले. चार्लस सारख्या व्यभिचारी राजाच्या अंगींही हा गुण पूर्णपणें वसत होता, व तो हॉलंडमध्यें पळून गेल्यावरही त्याच्याकडे अनेक लोक राजस्पर्शासाठीं जात असत. ही

समजूत ॲन राणीच्या कारकीर्दीपर्यंत ( १८व्या शतकापर्यंत ) चालू होती.

राजा ज्यांस स्पर्श करी त्यांस देणगीदाखल एखादें नाणें देई, व तें नाणें रोग्यानें जपून ठेवावें, अशी चाल होती.

राजदर्शन होणार एवढेंच नव्हे तर राजा स्पर्श करणार ही भावना, देणगीच्या नाण्याच्या दर्शनानें वारंवार होणारी भावनेची जागृति, या कामासाठीं मुद्दाम परगांवीं जाण्यामुळें हवापालट अन्नपालट इत्यादिकांचा होणारा परिणाम, व कांहीं दिवसांनीं विकारांत आपोआप होणारा फेरफार, या कारणांनीं रोग्यांस फायदा झाल्याचें दिसत असे. पण ही गोष्ट लक्षांत न घेतल्या-कारणानें, राजस्पर्शानंतर जी जी सुधारणा विकारांत होई ती राजस्पर्शानेंच होते ही भावना कायम राहिली.

( ४ ) Theriac ( या नांवाचा अर्थ सर्वव्याधित्राण असा आहे ) हें प्रख्यात औषध अनेक औषधांचें मिश्रण असें व तें सर्व रोगांवर चाले असा त्याचा युरोपांत पूर्वी लौकिक होता. त्याचे पाठही भिन्न असत. प्रसिद्ध फ्रेंच डॉक्टर बर्नार्ड हें सांगतात कीं, ते लहानपणीं एका औषधाच्या कारखान्यांत नोकर असतांना तेथें अशी चाल होती कीं, एकादें औषध बिघडलें, कीं "ठेवा तें थेरियाकसाठीं" म्हणून ठेवीत असत; व अशा-रीतीनें सांठलेलीं अनेक औषधें एकत्र करून हें 'व्याधित्राण' बनवीत.

( ५ ) डांबराचें पाणी ( Tar water ) व ( ६ ) सार्सापरिला हीं औषधें एकाकाळीं अनेक रोगांवर रामबाण म्हणून प्रसिद्ध होती.

दुसरी कांहीं प्रसिद्ध पण सर्व रोगांवर तादृश उपयोगी नसलेलीं औषधें:—

antimony, Calomel, व रक्त काढणें, या उपायांचें, हे उपाय अनेक विकारांवर रामबाण आहेत अशा समजुतीचें बंड अनेक वर्षें होतें, व त्यांच्या माहात्म्यासंबंधानें मोठमोठ्या डॉक्टरांनीं 'पुराणें' लिहिलीं आहेत; उदा. व्हॅलेंटाइन यांचा Triumphal Chariot of antimony म्हणजे "ॲंटिमनीचा विजयी रथ" या नांवाचा ग्रंथ. एकदां मिराबो या फ्रेंच वक्त्याचें, हृत्शूल या विकारांत, ४८ तासांत मिळून २॥ शेर रक्त काढलें !

मद्यार्क व सेंट जॉन लॅंगचा लेप हे अनेक रोगांवर उपयोगी म्हणून प्रसिद्ध होते.

सर्पदंशासाठीं व्हिस्की दारू.

Lichen या विकाराला सर्पत्वचा हें हिपोक्रेटिसचे मतें उत्तम औषध.

अपस्मारासाठीं हातांत बडिशेप धरणें हा उत्तम उपाय असें पिथॅगोरस या तत्त्ववेत्त्याचें मत होतें. P. २३४

**कांहीं विचित्र उपायः—**

विष्टा, मूत्र, मृत माणसांचे—विशेषतः फाशी दिलेल्या माणसांचे व इजिप्तमधील ममीचे ( प्राचीन काळच्या प्रेतांचे )—अवशिष्ट भाग.

निरनिराळ्या विकारांसाठीं सर्पाचे निरनिराळे भाग, उवा वगैरे कृमि.

स्मशानभूमींत उगवणाऱ्या वनस्पतींचे वद्यपक्षांत घेतलेले भाग.

फाशी गेलेल्या माणसाच्या मानेभोंवतीं दोराचा जो करकोचा पडतो त्यास स्पर्श करणें हा युरोपांत एका काळीं प्रसिद्ध उपाय होता. वारे गेलेल्या अवयवांत या उपायानें शक्ति आल्याचीं अनेक उदाहरणें सांगण्यांत येतात.

पायाच्या विकारासाठीं, मेलेल्या—विशेषतः फासावर चढून मेलेल्या—माणसांचे जोडे घालणें.

पोटदुखीसाठीं तान्ह्या मुलाच्या पायाचें पाणी पिणें. ( आपल्याकडे मुंज्या मुलाच्या पायाचें तीर्थ पिण्याची कांहीं बायकांची चाल आहेच ).

पिसाळलेल्या कुत्र्याचे विषावर ‘ रीबस, रीबस, एपिटेक्सिकम् ’ हे शब्द कागदावर लिहून तो कागद कुत्र्यास खावयास देणें !

**आंगठ्या**—पित्त, संधिवात यांसाठीं लोखंडाच्या आंगठ्या मध्ययुगांत युरोपमध्यें उपयोगांत होत्या एवढेच नव्हे तर परवांपर्यंत अमेरिकेंतही कांहीं ठिकाणीं वापरण्यांत येत असत.

**साम्यावरून औषधयोजनाः**—प्राचीन समजुतींमध्यें, साम्यावरून उपायाची योजना हा एक महत्वाचा भाग असे. याचे नमुनेः—

कावीळ रोगांत शरीराचा वर्ण पिवळसर होतो म्हणून पिवळ्या फुलांच्या झाडांचें औषध.

रक्तस्रावावर (रक्त तांबडें म्हणून) तांबड्या रंगाचा एक दगड (blood stone ).

वृश्चिकदंशावर Scorpion grass हें गवत; कारण त्याला विंचवा-सारखे आंकडे असतात.

मानसिक रोगावर Lunar caustic ( luna म्हणजे चंद्र; चंद्राचा मनावर परिणाम होतो अशी समजूत आहे).

पंडु रोगावर तांबडी दारू ( तांबड्या रंगानें फिकटपणा जाऊन लाली येईल या समजुतीनें ).

यकृताचे रोगावर पिवळसर ( straw ) रंगाची दारू.

धावरें या विकारांत सूज येते ती तांबूस असते, यावरून तांबड्या रंगाचा या विकाराशीं संबंध आहे या समजुतीनें एका काळीं तांबड्या वस्तूंचा या आजारावर उपाय म्हणून उपयोग करण्यांत येत असे; उदा०—तांबड्या मिरच्या, तांबड्या रंगाची क्रॅनबेरी फळें इ. हा विकार फिरून होऊं नये म्हणून तांबडी फ्लॅनेलही वापरण्यांत येत असे.*

**रत्नांचे गुणः**—रत्नांच्या भारी किंमतीमुळें,व साम्यतत्त्वामुळें, त्यांच्या-मध्यें अनेक गुणांची कल्पना लोकांनीं केली होती; व यांपैकीं कांहीं कल्पना अद्याप राहिल्या आहेत. उदाहरणार्थ,

हिरा यश अथवा अजिंक्यता देतो.

याकूत (Amethyst) अतिरिक्त मद्यपानाची इच्छा होऊं देत नाहीं.

Jacinth नें झोप येण्यास मदत होते.

अकीकनें दुःख कमी होते व हृदयास बळकटी येते.

क्रिसोलाइटनें शहाणपण येतें.

ज्योतीरस ( heliotrope )रत्नानें धैर्य येतें.

इंद्रनील( saphire )नें हिवताप जातो व नाकांतून रक्त वाहणें बंद होतें.

पुष्कराज ( topaz ) वेड बरें करतो.

रुधिराक्ष Cornelian रक्तस्राव थांबवितो.

राहूचा खडा (Jasper) व (haematite) आरोग्यदायक आहेत.

Smaragdum अपस्मार आणि पालक ( onyx ) व रुधिरपालक (sardonyx) दुःस्वप्नें नाहींशीं करतात.

---

* रंगांचा परिणाम कांहीं प्रसंगीं आरोग्यावर अंशतः होतो ही गोष्ट खरी आहे.

अकीक पाण्यांत उगाळून प्याल्यानें अनेक रोग बरें होतात. पण शिवाय त्याचा सर्पदंश, भूतबाधा, विषबाधा, यांवरही उपयोग होतो अशी समजूत होती. —Psychotherapy.

औषधासंबंधीच्या भ्रमांचीं वरीलसारखीं उदाहरणें इतकीं आहेत कीं, तीं दिलीं असतां एकाद्या मोठ्या कोशाएवढा ग्रंथ होईल. या बाबतींत तज्ञांचीं पुढील मतें पहा म्हणजे त्यावरून औषधाबद्दलचे भ्रम किती वर्षें टिकून राहतात हें दिसून येईल.

डांग्या खोकला वगैरे रोगांवर रामबाण म्हणून ठरविलेलीं किती औषधें निरुपयोगी ठरलीं, याबद्दल अगदीं अलीकडच्या एका वैद्यकीय ग्रंथांतील पुढील उल्लेख पहाः—

The number of drugs warmly advocated for the cure of whooping cough and then discarded is legion.

Almost every drug in the pharmacopoea has at one time or another enjoyed a vogue in the treatment of psoriasis. –An Index of Treatment (१९३३ची आवृत्ति.)

Digitalis has been recommended by some writers, but the majority of observers have found it unsatisfactory. ब्लूमरचा वैद्यककोश–पान १०७६.

## कांहीं रोग्यांना विशिष्ट व्यक्तींमुळें गुण कां येतो ?

Psycho-analysis अनवा मनोविश्लेषणशास्त्र नांवाचें जें शास्त्र निघालें आहे त्याचा असा एक सिद्धांत आहे कीं, भीति, वासना इत्यादि दबून राहून गेल्या तर त्यामुळें कांहीं मानसिकच नव्हे तर शारीरिक व्याधिही होतात, व ह्या वासना अथवा भीति ह्यांची जागृति करून, संभाषण समजूत इत्यादिकांनीं त्यांचें योग्य समाधान केलें किंवा त्यांस योग्य वळण दिलें, म्हणजे ते विकार बरे होतात.

कांहीं विकार भावनांच्या द्वारेंही बरे होतात. म्हणून जो मनुष्य भावना जागृत करतो किंवा वरील मनोविश्लेषणपद्धतीसारख्या ( केवळ त्याच नव्हे )

पद्धतीनें रोग्याच्या मनाचें समाधान करतो, त्याच्यामुळें दुर्धर व असाध्य विकारही नाहींसे होतात.

ज्यांनीं रोग्यांचे मनांत श्रद्धा उत्पन्न केली आहे अशा युरोपियन वैद्यांकडूनही धर्म, योग, इत्यादि साधनांवाचून साध्या उपायांनींही अनेक दुर्धर जीर्ण रोग बरे होतात अशीं अनेक उदाहरणें आहेत (पानें ५९–६२ पहा). म्हणून एकाद्या व्यक्तीचा, एकाद्या रोग्याचे रोगावर विशेष परिणाम झाल्यास, त्या व्यक्तीमध्यें दैवी अंशाची कल्पना करण्याचें कारण नाहीं.

## रामबाण औषधां-संबंधानें वस्तुस्थिति.

वस्तुस्थिति अशी आहे कीं, अद्यापपर्यंत बऱ्याच रोगांवर रामबाण औषध उपलब्ध झालें नाहीं. रामबाण औषधाचें लक्षण हें कीं, विकाराच्या ठराविक मुदतीपेक्षां कमी अशा अमुक दिवसांत तो रोग नाहींसा होईल असें त्या उपायासंबंधानें आधीं, शेंकडा ७५ प्रसंगीं तरी, सांगतां आलें पाहिजे.

अशीं रामबाण औषधें फक्त पुढील विकारावर उपलब्ध झालेलीं आहेतः—खरूज, पोटांतील कृमि, ॲमिबिक जातीचा अमांश, मलेरिया, उपदंश व आणखी फार तर दहापांच बिकट रोग.

पुढील विकारांवर रामबाण औषध सांपडलें नाहीं असें युरोपियन वैद्यांचें म्हणणें आहेः—

टायफॉइड ज्वर, पॅराटायफॉइड, टायफस, पीतज्वर, धावरें, न्युमोनिया, सेरेब्रो स्पायनल ज्वर, डांग्या खोकला, देवी, महामारी, प्लेग, क्षय, इसब, भूतोन्माद व याशिवाय निरनिराळ्या इंद्रियांसंबंधीं अनेक रोग.

अर्थात् वरील विकारांवर अमुक औषधाचा गुण आला अशी जी हजारों उदाहरणें आहेत त्यांत भ्रमाचा भाग बराच आहे.

जाहिरातींत कितीही प्रशंसा केली असली तरी क्षय, संततिप्रतिबंध, पुत्रसंतति, व्रण ( Cancer ), मोतीबिंदु, यांवर रामबाण औषध नाहीं असेंच नामांकित तज्ज्ञांचें मत आहे हें ध्यानांत ठेवावें.

**शंका**—बरींच औषधें निरुपयोगी तर असाध्य विकारावर औषध घेऊं नये काय ?

**उत्तर**—असाध्य मानलेल्या रोगांवर रामबाण औषध नाहीं, म्हणून त्यावर अधिकारी चिकित्सकांकडून उपाय करवूं नये असें मात्र नाहीं. विकार बरा करणें चिकित्सकाच्या हातांत नसले, तरी त्याच्या योजनेमुळें पुढील फायदे होतातः–( १ ) कुपथ्य अथवा विरोधी आहारविहार यामुळें विकार बलवत्तर होण्याचा संभव टळतो. ( २ ) वेदना किंवा त्रास कमी होतो. ( ३ ) निसर्गास अवश्य ती परिस्थिति उत्पन्न करण्यासंबंधानें योग्य तो सल्ला मिळतो. (४) मनास आधार व समाधान हीं प्राप्त होतात. यांमुळें कुशल वैद्यांमुळें रोगपरिहाराचा संभव वाढतो. तथापि, केवळ औषधास महत्त्व किती आहे याबद्दलचें जुनें सुभाषित

पथ्ये सति गदार्तस्य किमौषधनिषेवणं
पथ्येऽसति गदार्तस्य किमौषधनिषेवणं

(**भावार्थ**—पथ्यानें राहिलें तर आजाऱ्यास औषध कशास हवें, व पथ्यानें राहिलें नाहीं तर औषध घेऊन तरी काय उपयोग !)

हें नेहमीं लक्षांत ठेवावें.

**भोंदू वैद्यांचे चमत्कार**—आजपर्यंत अनेक भोंदू वैद्य सर्व देशांत होऊन गेले आहेत व त्यांच्यामुळें जे हजारों रोगी बरे झाले ( किंवा आपण आजारांतून मुक्त झालों अशी त्यांची समजूत झाली ) त्याचें एक कारण रोग्यांची भावनाच होय. असें मानण्यास कारण हें कीं, अशा चिकित्सकांची कीर्ति कांहीं कारणामुळें कमी झाली किंवा त्यांचें नावीन्य कमी झालें म्हणजे त्यांच्या चिकित्सेचा प्रभाव कमी होतो असें आढळून येतें.

कै० गोपाळराव भट, ज्यांनीं 'समोष्णीकरण वैद्यक' नांवाची चिकित्सापद्धति इकडे सुरू केली होती, ते जेव्हां कुमठा येथें मुनसब होते तेव्हां त्यांच्याकडे इतके रोगी येत असत कीं, कधीं कधीं घरांत बसण्यास जागा न पुरल्यामुळें घरापुढल्या रस्त्यांत रोग्यांची गर्दी होई. 'तुम्ही आमचे रस्ते बिघडवून टाकतां' ( म्हणजे तुमच्याकडे येणाऱ्या रोग्यांच्या

गाड्यांच्या रहदारीमुळें रस्ते खराब होतात ) असे तेथील एंजिनियर रावसाहेब भट यांना विनोदानें म्हणाल्याचें ते एकदां सांगत होते. ह्यांच्याकडे येणाऱ्या रोग्यांची गर्दी पुढें कमी झाली, व ते पुण्यांत होते तेव्हां थोडेच लोक त्यांचेकडे जात असत.

भोंदू वैद्यांचे चमत्कारांचीं कांहीं उदाहरणें—डाउई ( Dowie ) हा अमेरिकन वैदू आपण Elijah चा अवतार आहो असें म्हणे. आपण दोन लाख रोगी बरे केले असें एका प्रसंगीं त्यानें सांगितलें. ( Elijah हा बायबलमधील एक प्रेषित; यानें अनेक चमत्कार केल्याचें वर्णन आहे. )

श्लॅटर Schlatter ह्या अमेरिकन साधूची इतकी प्रसिद्धी झाली कीं, त्याला भेटण्यासाठी रस्त्यांत लोकांच्या झुंडीच्या झुंडी जमत; व तो रस्त्यानें जात असतां त्याची सावली पडली किंवा त्याच्या कपडयास हात लावला, तरी आपणांस फायदा होतो, असें लोक म्हणत असत. लांबच्या रोग्यांच्या फायद्यासाठीं तो आपल्या स्पर्शानें भारलेले हातरुमाल, प्रत्येकीं दहा डॉलर ( सुमारें तीस रुपये ) किंमत घेऊन पाठवीत असे. परंतु पुढें 'ही ठकबाजी करण्यास आम्ही मदत करूं इच्छीत नाहीं ' असें म्हणून यु. स्टेट्सच्या पोस्ट ऑफिसनें रुमालाची व्ही. पी. घेण्याचें नाकारलें व त्यामुळें हा मार्ग त्यास सोडून द्यावा लागला.

अशीं उदाहरणें कितीतरी आहेत !

पर्किन्स—विजेचा शोध लागल्यानंतर विजेनें घडणारे चमत्कार ऐकून, विशेषतः दोन धातु एकाद्या प्राण्याच्या स्नायूच्या तंतूस लावले असतां त्यांमध्यें विजेचा प्रवाह उत्पन्न होतो हें पाहून, पर्किन्स नांवाच्या एका अमेरिकन डॉक्टराच्या मनांत कल्पना आली कीं, धातूंच्या पट्टया माणसाच्या अंगास लावल्या, तर वीज उत्पन्न होऊन विकार बरा होईल. त्या कल्पनेस अनुसरून त्यानें धातूंच्या दोन पट्टया तयार केल्या. ह्या पट्टयांना एका बाजूस टोंक होतें, व तीं टोंकें टेकून पट्टया विकृत भागावरून ओढून अंगांत विद्युत्संचार करावयाचा असें त्यानें ठरविलें. या उपायाचा इतका परिणाम झाला कीं, संधिवातादि रोगामुळें होणाऱ्या वेदना व अनेक विकार यांवर या उपायाचा जादूप्रमाणें उपयोग होऊं

लागला ! व पर्किन्सकडे येणाऱ्या रोग्यांची संख्या वाढूं लागली. त्याचा लौकिक लौकरच युरोपपर्यंत गेला व डेन्मार्कच्या राजधानींतील सरकारी ( Royal ) हॉस्पिटलमध्यें या विजेच्या पट्टयांच्या उपायाचा उपयोग करण्यांत येऊं लागला. या नवीन उपायामुळें बऱ्या झालेल्या रोग्यांच्या हकीकतीचा एक मोठा ग्रंथ तेथील वैद्यांनीं प्रसिद्ध केला. पर्किन्सचा मुलगा बेंजामिन पर्किन्स हा इंग्लंडला आला व तेथें त्यानें ह्या पट्टयांच्या उपचारांना प्रारंभ केला. त्याच्याकडे हजारों रोगी आले व पुढें लौकरच ( १८०४ सालीं ) लंडन शहरामध्यें पर्किनियन इन्स्टिटयूट नांवाची संस्था निघाली. या संस्थेचे अध्यक्ष उपाध्यक्ष वगैरे अधिकारी बडे उमराव व सरकारी अधिकारी होते ( अशा संस्थांना बड्या लोकांच्या पाठिंब्याची वाण युरोपांतही बहुधा पडत नाहीं). २१ डॉक्टर व १९ सर्जन व अनेक पशु-वैद्य या उपायाचे पुरस्कर्ते बनले व त्याचा चोहोंकडे बोलबाला झाला.

पर्किन्सच्या अपूर्व यशामुळें त्याच्या कांड्यांना इतकें महत्त्व आलें व त्यांची किंमत इतकी वाढली कीं, त्यांच्यावर आपणास पुष्कळ कमाई करतां येईल या आशेनें लोक गाड्या, घोडे, जमिनी विकूनही त्या विकत घेऊं लागले.

पुढें न्यू यॉर्क शहरांत पीतज्वर या भयंकर तापाची साथ आली असतां ह्या तापावरही आपल्या कांड्या चालतील अशा भरंवशानें पर्किन्ससाहेब तेथें गेले, पण त्यांचें दुर्दैव असें कीं ते स्वतःच त्या तापाला बळी पडले !

एवढा बोलबाला ज्या कांड्याचा झाला त्यांची खरी किंमत काय होती हें पुढील हकीकतीवरून लक्षांत येईल.

ह्या वेळीं बाथ या शहरीं एक हेगार्थ नांवाचे डॉक्टर रहात होते. त्यांना ह्या नवीन उपायासंबंधानें शंका आली व आपली कल्पना खरी कीं खोटी हे पाहण्याकरितां त्यांनीं ह्या पट्टयांप्रमाणें पट्टया तयार करून, एक स्नेही डॉक्टर फॉकनर यांच्या साहाय्यानें, ह्या पट्टयांच्या योगें चिकित्सा करण्यास आरंभ केला. त्यांनीं ज्या पहिल्या पांच रोग्यांवर ह्या पटया चालविल्या त्यांना तावडतोब आराम वाटूं लागला. एका रोग्यांवर तर त्यांचा परिणाम इतका झाला कीं ' आग होऊं लागली, आतां उपाय पुरे करून

उद्या फिरून सुरू करा ' अशी त्यानें विनंती केली. हा उपाय पाहून त्यांचे दोन मदतनीसांचाही या उपायावर विश्वास बसला. लौकरच या डॉक्टरांच्याकडे रोग्यांची एवढी गर्दी झाली कीं, त्यांना जेवण्यासही फुरसत होईना. त्यांनीं खिळें व सील करण्याची लाख यांच्याही पट्टया करून त्यांचा उपयोग आपण स्वतः केला एवढेंच नव्हे, तर त्या इतर डॉक्टरांच्याकडेही अनुभव घेण्यासाठीं पाठवून दिल्या; व आश्चर्याची गोष्ट कीं ' उत्तम उपयोग होतो ' अशाबद्दल त्यांच्याकडूनही अनुभव कळविण्यांत आले ! P. पानें ४८–५०.

पट्टया वाटेल त्या द्रव्याच्या केल्या तरी त्यापासून रोग बरा होतो या अनुभवांवरून हें अनुमान उघड होते कीं, गुणाचें बीज पट्टयांत नसून तें लोकांच्या केवळ कल्पनेंत होतें. अर्थात् हे सर्व चिकित्साचमत्कार पट्टया शरीरांवरून ओढतांना होणारें संवेदन, विजेसंबंधानें लोकांना वाटणारें आश्चर्य, व एकंदरींत उपायाचें नाविन्य यांमुळें लोकांच्या मनांत उत्पन्न होणाऱ्या भावनांचे परिणाम होते.

या व पूर्वी दिलेल्या अनेक उदाहरणांवरून समजून येईल कीं, हेत्वाभासाबद्दल चिकित्सा केल्यावांचून, केवळ अनेकांना अनुकूल अनुभव आला ही गोष्ट एकाद्या नियमाचा खरेपणा ठरण्यास पुरीशी नाहीं.

## मंत्रांचा आजारावर होणारा परिणाम.

कांहीं मंत्रांचा परिणाम आजारावर झालासा वाटतो त्याचीं कारणें पुढीलप्रमाणें:—

( १ ) कांहीं विकार कालांतरानें आपोआप कमी होतात.

( २ ) उपायाच्या नाविन्याचा अथवा भावनेचा मनावर परिणाम होऊन त्या द्वारें शरीरावर परिणाम होतो.

( ३ ) मंत्र घालणाऱ्या व्यक्तीच्या स्पर्शाचा रोग्यावर परिणाम होतो.

( ४ ) मंत्राबरोबर पाणी शिंपडणें, चोळणें वगैरे ज्या क्रिया केल्या जातात त्यांचा शरीरावर परिणाम होतो.

( ५ ) मंत्र व त्याबरोबरचें तंत्र, आणि मंत्र घालणाऱ्याच्या चर्येचा मनावर होणारा परिणाम, यांमुळें विकाराच्या वेदनाकडलें लक्ष कमी होऊन वेदनांची तीव्रता कमी भासते. लक्ष दुसरीकडे गेले म्हणजे वेदनांचें विस्मरण होते हा अनुभव आहे. वृश्चिकदंशावरील उपायांवरून हीच गोष्ट लक्षांत येते.

मंत्राचा म्हणून समजला जाणारा परिणाम मंत्रावर फारसा अवलंबून नसून वर सांगितलेल्या कारणांवर अवलंबून आहे हें पुढील अनुभवांवरून दिसून येतें:—

( १ ) मंत्र येत नसतांही मंत्र घालण्याची कृति करून विंचू उतरणारे अनेक लोक आहेत. पाणी मंतरलेलें आहे असें खोटेंच सांगून साधें पाणी दिलें, तर मंतरलेल्या पाण्यासारखा परिणाम होतो असे अनेक अनुभव आहेत. ( यावरून गुणाचें कारण मंत्रच आहे असें म्हणतां येत नाहीं. )

( २ ) विंचू चावलेल्या माणसाच्या देखत त्याच्या नातेवाइकाच्या किंवा सोबत्याच्या अंगावर मंत्र घातलासें करून 'आता येथपर्यंत विंचू उतरला,' 'आतां त्याच्या खालीं उतरला'......असें ठासून सांगितल्यानें विंचू चावलेल्या माणसांस आपला विंचू उतरत आलासें वाटतें अशी उदाहरणें आहेत. यावरून विंचू उतरण्यांत भावनेचा भाग किती आहे हें दिसून येतें

( ३ ) लक्ष वेधेल असा एकादा रंगीत खडा 'मंतरलेला आहे' म्हणून दाखविल्यास त्यानें विंचू उतरतो.

( ४ ) विंचू चावलेल्या माणसानें आपल्या अंगावरचा कपडा ( धोतर, सदरा वगैरे ) काढून तो उलटा पेहेरल्यानें विंचू उतरला असा कांहींचा अनुभव आहे ( लक्ष वेदनावरून कपडे बदलण्याकडे जातें हें याचें कारण असावें. )

( ५ ) शेवग्याचा पाला आपल्या हातावर चोळून विंचू चावलेल्या माणसास आपल्या हाताकडे पहावयास सांगावयाचें, या कृतीनें एका गृहस्थानीं ( ज्ञानप्रकाशाचे एक संपादक रा.......यांनीं ) अनेकांचे विंचू जादूप्रमाणें उतरले आहेत. ( हा परिणाम कशाचा ! ).

( ६ ) रोग्याच्या समजुतीसाठीं, इंजेक्शन म्हणून केवळ थंड पाण्याची पिचकारी मारल्यानें विंचू उतरल्याचीं उदाहरणें आहेत.

वरील परिणाम कसे होतात याचा विचार केला असतां, मंत्राचें कारकत्व बरेंच नाहींसें होतें, असें दिसून येईल.

आजाऱ्याचे पश्चात् व त्यास त्यासंबंधानें कांहींही न सांगतां, मांत्रिकानें मंत्र म्हटल्यानंतर आजाराच्या स्थितींत ( स्वाभाविकपणें पडणाऱ्या फरकावांचून अन्य ) विशेष व मोजून पाहतां येण्यासारखा फरक दृष्टीस पडेल, तर तो मंत्राचा प्रभाव असें म्हणतां येईल. तसें कोणी दाखवीत असल्यास दाखवावें.

मंत्राचा परिणाम विंचवाचे विषावर खरोखरीं होत नाहीं यास प्रमाण— निरनिराळया जातींच्या विंचवांच्या विषाची तीव्रता कमीजास्त असते व कांहीं वेळां विषही अंगांत फार कमी जातें; म्हणून विष फार तीव्र नसतें किंवा थोडें असतें तेव्हां केवळ भीतीमुळें झालेला परिणाम मंत्रानें कमी होऊन विंचू उतरला असें वाटतें. पण विंचू जहाल असला, तर नांगी मारलेल्या जागेची फुणफुण पुष्कळ वेळपर्यंत कायम राहतेच, व ती मंत्रानें बंद होत नाहीं. एक जातीचे तांबूस विंचू हिंदुस्तानच्या काहीं भागांत आहेत त्यामुळें मनुष्यास मृत्युही येतो. त्यावर मंत्राचा कांहीं परिणाम होत नाहीं. होतो असें कोणास दाखविणें असल्यास मुंबईच्या हाफकिन् इन्स्टियूटमध्यें उंदरावर प्रयोग करण्याची सोय आहे.

# प्रकरण ५ वें.

## भ्रमांतील चूक कळून न येण्याचीं विशेष कारणें.

One of the most surprising things modern psychology has revealed is that most people pass through life without having done a single important act of independent thinking. They imbibe certain opinions & prejudices from their environment & believe that these are the results of their own thought.

—D. S. Gordon, Asst. Prof. of Education,
Mysore University.

We are most of us fools–Carlyle.

( वरील वाक्याचा अर्थ ' आपणांपैकीं बहुतेक खुळे असतात ' म्हणजे स्वार्थ, ममत्व, परंपरा इत्यादिसंबंधाच्या गोष्टींत आपणा बहुतेकांचीं मतें तर्कशुद्ध नसून भावनाप्रधान अथवा अंधश्रद्धायुक्त असतात असा आहे. Fool याचें भाषांतर मूर्ख शब्दानें नेहमींच चालत नाहीं. You are a fool याचा अर्थ बहुतेक प्रसंगीं ' ह्या बाबतींत तुझें करणें अथवा म्हणणें बरोबर म्हणजे विचारास धरून नाहीं ' एवढाच असतो. )

भ्रमांतील चूक कळून न येण्याचें सामान्य कारण अज्ञान होय हें उघड आहे. विशेष कारणें:—

( १ )

### अंधश्रद्धा अथवा चिकित्सक बुद्धीचा अभाव.

या वृत्तीमुळें, मनुष्याचें प्रतिकूल उदाहरणांकडे दुर्लक्ष होतें. हा दोष कमीजास्त मानानें बहुतेकांमध्यें असतो. एकदां एक ग्रह झाला म्हणजे बहुतेक मनुष्यांचें लक्ष फक्त अनुकूल उदाहरणांकडे जातें, व प्रतिकूल

उदाहरणांकडे मुळींच जात नाहीं; किंवा गेल्यास 'ते अपवाद असतील' किंवा 'त्यास अमूक कारण झालें असावें' अशी मनाची खोटी समजूत करण्यांत येते. एकाच माणसाविषयीं दोन माणसांचे ग्रह परस्परविरुद्ध असतात व दोघांनाही आपलाच समज बरोबर आहे असें वाटतें. उदाहरणार्थ, एकाच मनुष्यास एक गृहस्थ चांगला समजतो व दुसरा वाईट समजतो; आणि त्याच्याकडून वाईट गोष्ट झाल्यास पहिला म्हणतो 'होते एखादे वेळीं चूक,' व दुसरा म्हणतो 'हें पहा याच्या वाईट-पणाचें प्रत्यंतर.' ह्या बाबतींत वरुणदेवतेसंबंधाची ग्रीक लोकांमधील आख्यायिका सुप्रसिद्ध आहे. ही आख्यायिका पुढीलप्रमाणें आहे:—एक योद्धा समुद्रांतून प्रवासास निघाला असतां, त्या वेळच्या चालीस अनुसरून किनाऱ्यावरच्या वरुण देवतेस नवस करण्यास त्याला त्याच्या मित्रानें सांगितलें, व ज्यांना देवता नवसाला पावली त्यांनीं देवतेस दिलेल्या देवालयांतील शेंकडों देणग्या दाखविल्या. त्यावेळीं त्या योद्धयानें विचारलें "कांहींना देव पावला हें खरें, पण जे समुद्रांत बुडाले त्यांच्या खुणा येथें काय आहेत !"

या मुद्दयासंबंधानें पुढील नित्यानुभव लक्षांत घ्या:—

( १ ) बहुतेक माणसांना आपला चालू धर्म खरा व चांगला, व इतरांचा व आपला पूर्वीचा धर्म कमी प्रतीचा असें वाटतें. ज्यांचे आईबाप वैष्णव त्यांना द्वैतच खरें, व ज्यांचे आईबाप स्मार्त त्यांना अद्वैतच खरें असें वाटतें, तें अंधश्रद्धेमुळें कीं स्वतंत्रविचारक्षमतेमुळें !

( २ ) बहुतेक लोकांस आपल्या समजुती, आपली नीति, आपले आचारविचार चांगले, व इतरांचे तितके चांगले नाहींत असें वाटतें.

( ३ ) आतां निरुपयोगी ठरलेलीं शेंकडों नव्हे तर हजारों औषधें एका काळीं रामबाण म्हणून समजलीं जात होतीं, एवढेंच नव्हे तर त्यांचा तसा अनुभवही येत होता अशी लोकांची त्या वेळीं खात्री होती ( प्रकरण ४ पहा ).

During the first half of the 19th century the antiphlogistic treatment of pneumonia continued to be the only one followed in civilised countries and precisely the same treatment was adopted by surgeons for compound fractures, inflammations of the eye, and for pyemia, pericarditis, rheumatic and typhoid fever. The only important modification was the introduction of large doses of antimony.......

The mistake lay in having no control observations.

—Allbutt's System of medicine, Vol. V. Page 120.

चालत आलेल्या गोष्टी माणसें अंधळेपणानें चालू ठेवतात एवढेंच नव्हे तर त्यांतील चूक दिसल्यावरही त्यांचें समर्थन करण्याचा प्रयत्न कसा करतात यासंबंधानें वरील ग्रंथांतील पुढील माहिती पहा:

They did not know, because they never ventured to try, what would happen if these remedies had been omitted. The advocates of antiphlogistic treatment threw away their case by the assertion that they were right in bleeding before, and a presumed 'sthenic type' of fevers was dwelt upon with the same satisfaction that an old man contrasts the hard frosts and the heroic exploits of his youth with the mild winters and feeble powers of his contemporaries.

( ४ ) आज चुकीच्या म्हणून वाटणाऱ्या हजारों समजुती पूर्वींच्या लोकांना खऱ्या वाटत होत्या.

प्रत्यक्ष अनुभव पाहण्याची तसदी न घेतां केवळ समजुतीवर लोक अंधळेपणानें कसे अवलंबून राहतात व आपल्या समजुतीचें खोटें समर्थन कसें करतात यासंबंधानें पुढील उदाहरणें उद्बोधक आहेत:—

( १ ) सूर्य पृथ्वीभोंवतीं न फिरतां पृथ्वी स्वतःभोंवतीं फिरते हा सिद्धांत कोपर्निकस यानें मांडल्यावर प्रतिपक्षांतील कांहींनीं अशी शंका घेतली कीं, ' पृथ्वी स्वतःभोंवतीं फिरत असेल तर एकाद्या उंच मनोऱ्या-

वरून पूर्वेच्या बाजूस एक फूट अंतरावरून धोंडा खालीं सोडला, तर त्यास पृथ्वीमुळें पूर्वेकडे जाण्याची गति प्राप्त होत असल्यामुळें तो पायथ्याच्या पूर्वेस एका फुटापेक्षां जास्त अंतरावर पडला पाहिजे.' हा प्रयोग प्रत्यक्ष केला असता, तर वरील शंकेंत गृहीत धरल्याप्रमाणें धोंडा खरोखरच पूर्वेकडे पडतो ही वस्तुस्थिति दोन्ही पक्षांना कळून आली असती; पण तें कोणींही केलें नाहीं. उलट, कोपर्निकसाचे अनुयायांनीं 'तशी गोष्ट कां होत नाहीं' याबद्दल कांहींतरी खुलासा देण्याचा प्रयत्न केला!

( २ ) ॲरिस्टॉटलच्या पदार्थविज्ञानशास्त्रांतील '...पट वजनाचा पदार्थ तितक्या पटीच्या वेगानें खालीं पडतो' या सिद्धांताची कसोटी पाहण्याकरितां गॅलिलियोनें पिसाच्या झुकत्या मनोऱ्यावरून एक दहा पौंडाचें व दुसरें एक पौंडाचें वजन खालीं टाकण्याचा प्रयोग केला, त्यावेळीं वरील सिद्धांताच्या उलट दोन्हीं वजनें सारख्याच वेगानें खालीं आलीं. पण त्या वेळच्या प्रोफेसरांची ॲरिस्टॉटलवर इतकी श्रद्धा होती कीं, त्या प्रयोगांतील वस्तुस्थितीचें प्रत्यंतर अन्य प्रयोगांनीं पाहण्याऐवजीं "ॲरिस्टॉटल चूक असणें शक्य नाहीं; म्हणून या प्रयोगांत कांहीं दृष्टिभ्रम असला पाहिजे" असें ते म्हणूं लागले!

गॅलिलिओच्या नवीन ज्योतिषविषयक कल्पनाबद्दल त्याचा केवढा छळ झाला तें सुप्रसिद्ध आहे.

गॅलिलिओप्रमाणें 'सापेक्षते'च्या कल्पनेचे पुरस्कर्ते जगद्विख्यात प्रो० ऐनस्टाईन यांचाही उपहास लोकांनीं केला.

बर्ट्रंड रसेल हे आपल्या The Scientific Outlook या पुस्तकांत लिहितात "Galileo......was hissed at his lectures–a fate which has at times befallen Einstein in Berlin. पान २५.

( वरील पुस्तक १९३१ सालीं प्रसिद्ध झालें असल्यामुळें ऐनस्टाइन यांच्या उपहासाशीं हिटलेरशाहीचा अथवा ज्यूंच्या द्वेषाचा संबंध जोडतां येत नाहीं हें लक्षांत ठेवावें. )

नवीन कल्पनांविषयींचा पुरावा पाहण्यासही तयार नसलेले लोक आधुनिक शास्त्रज्ञांतही सांपडतात.

मनुष्यस्वभावांत गतानुगतिकत्व व पुराणप्रियता किती आहे यासंबंधानें प्रख्यात डॉ० ऑस्लर यांनीं प्रो० सिजविक यांचे म्हणून दिलेले पुढील विनोदी विचार वाचनीय आहेत.

"We think so, because all other people think so;
Or because—or because afterall we do think so;
Or because we were told so and think we must think so;
Or because we once thought so and think we must think so;"
Quoted as occurring to Mr. Henry Sidgwick, in his sleep, by Sir W. Osler in his Essay on Harvey.

यावरून आपल्या समजुतींत तर्कशुद्धता किती कमी असतें याचा सुज्ञांनीं विचार करावा.

( २ )

## तार्किक संबंधाविषयीं अज्ञान.

बरेच लोकभ्रम कार्य कारण-भावासंबंधाचे अथवा सूच्यसूचकभावा-संबंधाचे असतात व त्यांतील भ्रम अथवा चूक ही कीं, संबंध खरा नसून तो तसा मानला जातो. तो तसा मानला जाणें यास हेत्वाभास म्हणतात ( हेतु म्हणजे कारण; त्याचा जो आभास तो हेत्वाभास. ) आतां हेत्वाभास कसा ओळखावा याचा विचार आपण करूं या.

तर्क म्हणजे अनुमान; दोन वस्तूंमध्यें लक्ष्यलक्षण,सूच्यसूचक अथवा कार्यकारण भाव यांचा संबंध असल्यास एका वस्तूवरून दुसऱ्या वस्तू-विषयीं अनुमान काढतां येतें. अशा संबंधास तार्किक संबंध असें नांव दिलें आहे.

## हेत्वाभास किंवा तार्किकसंबंधाभाव कसा ओळखावा ?

एका गोष्टीवरून दुसऱ्या गोष्टीचें अनुमान आपण करतों, तें त्यांमध्यें कांहीं संबंध असतो म्हणूनच. हा संबंध पुढीलपैकीं एकाद्या प्रकारचा असतो.

( १ ) कार्यकारणसंबंध, अथवा

( २ ) सूच्यसूचकसंबंध अथवा लक्ष्यलक्षणसंबंध.

कार्यकारणसंबंधाचे पुढील प्रकार मानतां येतीलः—

( अ ) पूर्ण कार्यकारणसंबंध म्हणजे जेथें कार्याचें कारक म्हणून जें कारण दिलेलें असतें तें पूर्णत्वानें कारक असतें, म्हणजेच जेथें दिलेल्या कारणास दुसऱ्या कोणत्याही कारणाचें साहाय्य लागत नाहीं. उदाहरणार्थ– ( १ ) सामान्यतः *हवेचें उष्णतामान व तिची भूपृष्ठापासून उंची, यांमधील, अथवा ( २ ) एकाद्या खाद्य पदार्थांतील साखरेचें प्रमाण व त्याची गोडी यांमधील संबंध.

( ब ) अपूर्ण कार्यकारणसंबंध, याचे भेदः—

( १ ) एकाद्या कार्यास कारणीभूत एक गोष्ट नसून **अनेक गोष्टी समुच्चयानें** असतात. उदाहरणार्थ—संपत्तिमान् होण्यास विपुल धनप्राप्ति व प्राप्तीहून कमी व्यय हीं दोन्हीं कारणें अनुकूल लागतात.

( २ ) एकाद्या कार्यास अनेक गोष्टींपैकीं प्रत्येक गोष्ट स्वतंत्रपणें कारण होऊं शकतें. उदा०–पुष्कळ पैसे मिळण्यास ( १ ) कंत्राटें घेण्याचा धंदा, ( २ ) मोठ्या प्रमाणावर व्यापार, ( ३ ) सॉलिसिटरचा धंदा, ( ४ ) सावकारी, ( ५ ) कारखानदारी...इ०.

**सूच्यसूचक संबंध**—नऊ वाजले म्हणजे तोफ उडावयाची अथवा दिवे बारीक व्हावयाचे, अथवा सकाळीं दहा वाजले कीं जेवणाचीं पानें वाढलीं जावयाचीं असा जो परिपाठ कित्येक ठिकाणीं असतो, तेथें दोन समकालीन गोष्टींमधील संबंध कार्यकारणभावाचा नसून तो केवळ सूच्य-सूचक अथवा लक्ष्यलक्षण असा असतो. अन्य उदाहरणें:—फडीवरील दहाचा आंकडा व सापाचा विषारीपणा ( यांमध्यें कार्य-कारणभाव नसून केवळ सूच्यसूचक संबंध आहे ), घंटा होणें व आगगाडीचें येणें इ०.

---

* सामान्यतः म्हणण्याचें कारण हवेच्या कांहीं थरांत वरील नियमास कांहीं अपवाद सांपडतात.

कोणत्याही दोन वस्तूंमध्यें, वरील प्रकारचा संबंध असतोच असें नाहीं. संबंध मुळींच नसेल, किंवा तो वर सांगितलेल्या संबंधांपैकीं एखाद्या प्रकारचा पूर्ण अथवा अपूर्ण असेल. हा संबंध कोणता आहे हें कळणें जरूर आहे; कारण त्यावरच अनुमान काढणें अवलंबून आहे. संबंध कांहींच नसेल तर एका गोष्टीवरून दुसऱ्या गोष्टीविषयीं अनुमान काढणें अर्थात् चुकीचें होईल. यास्तव अनुमानास तार्किक संबंधाची आवश्यकता आहे. म्हणून दोन गोष्टींत संबंध असल्याची कसोटी काय याचा विचार करूं या.

संबंधाविषयीं सामान्यतः चुकीची अशी समजूत आहे कीं, जेथें पक्ष असेल तेथें साध्य असणें व जेथें जेथें साध्य असेल तेथें तेथें पक्ष असणें ही नियमाच्या खरेपणाची कसोटी होय. परंतु या दोन कसोट्यांपैकीं, दुसरी कसोटी बरोबर नाहीं. कारण कीं, कोणत्याही सत्य विधानाचा व्यत्यास, म्हणजे पक्षाच्या जागीं साध्य व साध्याच्या जागीं पक्ष घालून केलेलें विधान, खरा असतोच असें नाहीं. ( पक्ष म्हणजे दिलेली किंवा गृहीत गोष्ट, लक्षण अथवा वाक्यांतील उद्देश्य. साध्य म्हणजे पक्षांविषयीं विधान, इष्ट उत्तर, लक्ष्य, किंवा वाक्यांतील विधेय.) उदा०–'ब्राह्मण हिंदू असतात' ह्या विधानांतील पक्षसाध्यसंबंध खरा आहे; परंतु जे हिंदु असतात ते ब्राह्मण असतात हा व्यत्यास खरा नाहीं. यावरून नियम खरा असण्यास व्यत्यास नेहमींच खरा असण्याची जरूरी नाहीं, असें दिसून येईल.

नियम अथवा सिद्धांत यासंबंधानें तर्कशास्त्राची कसोटी, जीस अन्वय-व्यतिरेक म्हणतात, ती पुढीलप्रमाणें असते. (अन्वय म्हणजे जेथें जेथें पक्ष आहे तेथें तेथें साध्य असणें. व्यतिरेक म्हणजे जेथें जेथें साध्य नाहीं तेथें पक्ष नसणें.) ज्या सर्पाच्या ( सर्प म्हणजे सरपटणारा लांबोळा प्राणी ) डोक्यावर दहाचा आंकडा असतो तो नाग असतो, ह्या नियमाचा अन्वय-व्यतिरेक पुढीलप्रमाणें—

अन्वय–ज्यावर दहाचा आंकडा असतो तो नाग असतोच असें आढळून आलें पाहिजे.

व्यतिरेक–जो नाग नसतो त्यावर दहाचा आंकडा नसला पाहिजे.

हीं दोन्हीं विधानें खरीं आहेत म्हणून वरील नियम बरोबर आहे.

पूर्ण म्हणजे सर्वस्वीं खऱ्या नियमास वरील अन्वयव्यतिरेकाची कसोटी लागली पाहिजे; परंतु असे पूर्ण नियम गणितशास्त्राबाहेर, विशेषतः सामान्य व्यवहारांत, फारच थोडके असतात. म्हणून इतर नियमांना ही कसोटी पूर्णत्वानें लागू पडत नाहीं. उदा० पुढील नियम घ्या.

| पक्ष | साध्य |
|---|---|
| बहुतेक सराफ, अथवा बडे सरकारी अधिकारी | श्रीमंत असतात. |

यांतील पक्षसाध्यांची क्षेत्रें तर्कशास्त्राच्या पद्धतीनें पुढीलप्रमाणें दाखवितां येतील.




(वरील आकृतींत डावीकडील स हे वर्तुळ पक्षाचें (उ०सराफांचें) क्षेत्र व उजवीकडील श्री हे वर्तुळ 'श्रीमंतां'चें क्षेत्र दर्शवितें. श्रीमंतांचें क्षेत्र मोठें असल्यामुळें दुसरें वर्तुळ मोठें काढलें आहे.)

वरील नियमासंबंधानें असें आढळून येईल कीं, यांत व्यवहारांत उपयोगीं पडण्यापुरतें सत्य असूनही त्यास अन्वयव्यतिरेकाच्या कसोट्या लागू पडत नाहींत. कारण अन्वयाच्या उलट, सराफ असून श्रीमंत नाहींत, व व्यतिरेकाच्या उलट, लोक श्रीमंत नसून सराफ आहेत, (आकृतींतील १ हा भाग पहा) असा अनुभव येतो. म्हणून हा नियम अन्वयव्यतिरेकाच्या कसोट्यांनीं खोटा ठरेल. पण नियम पूर्ण नसला तरी तो अंशतः, म्हणजे सराफ बहुधा श्रीमंत असतात या स्वरूपांत, खरा व व्यवहारांत

कांहींसा उपयोगीं पडणारा आहे. ( कारण क्ष मनुष्य सराफ आहे एवढें कळल्यानें तो दरिद्री बहुधा नसावा असें समजून येतें. ) तेव्हां, असा नियम व निवळ खोटा नियम यांमध्यें फरक आहे; व हा फरक ओळखण्याचें साधन असणें अवश्य आहे. अर्थात् सोडवावयाचा प्रश्न हा कीं, किती उत्तरें बरोबर आलीं म्हणजे नियम कमीजास्त मानानें अथवा अंशतः खरा समजावयाचा? यास कोणी उत्तर देतील कीं, विरुद्ध उदाहरणें शेंकडा २५-३० पेक्षां जास्त नसतील तर तो नियम खरा समजावा, व यांपेक्षां तीं बरींच जास्त असतील तर नियम खोटा मानावा. ही कसोटी कांहीं अंशीं खरी आहे व ती कांहीं प्रसंगीं उपयोगीं पडेल यांत संशय नाहीं; पण ती सर्व प्रसंगीं उपयोगीं पडणारी नाहीं, व ती तर्कशास्त्रदृष्ट्याही यथार्थ होत नाहीं. उदाहरणार्थ बॅरिस्टरीची परीक्षा व हायकोर्ट जज्जशिप ( म्हणजे हायकोर्ट जज्जची जागा ) यांमध्यें थोडा कार्यकारण संबंध खास आहे; परंतु बॅरिस्टरीची परीक्षा पास होऊन हायकोर्ट जज्ज न झालेल्यांचीं उदाहरणें शेंकडा ८० हूनही जास्त सांपडतील. तसेंच डोळे आलेल्या रोग्यांचें सान्निध्य व डोळे येणें यांमध्यें कार्यकारण संबंध असूनही अशा मनुष्याच्या सान्निध्यांत राहून डोळे आले नाहींत अशीं किती तरी उदाहरणें सांपडतील. या अपवादांचें कारण अर्थात हें कीं, वर सांगितलेलें कारण संपूर्ण कारण नसून तें कारणसमुच्चयांपैकीं एक व अर्थात् अपूर्ण आहे; म्हणून इतर अनुकूल कारणांच्या अभावीं त्या कारणाचें कार्य घडत नाहीं. असो; प्रश्न हा कीं, अशा प्रकारच्या अपूर्ण कार्यकारणसंबंधामुळें एकाद्या नियमास जर अपवाद अनेक आढळत असतील, तर तेथें कार्यकारणसंबंध मुळींच नाहीं कीं अल्प आहे हें ठरविण्यास कसोटी कोणती? यास उत्तरः— घेतलेल्या उदाहरणांसंबंधानें आपणांस असें दिसून येतें कीं, बॅरिस्टरची परीक्षा झालेले सर्व लोक जरी हायकोर्ट जज्ज होत नसले व त्यांमध्यें हायकोर्टजज्जांचें प्रमाण शेंकडा एक जरी असलें, तरी दुसऱ्या कोणत्याही लोकांपैकीं शेंकडा एक राहू द्या पण लाखांत एकही मनुष्य हायकोर्ट जज्ज होऊं शकत नसल्यामुळें हें प्रमाण इतर लोकांतील हायकोर्ट जज्जांच्या प्रमाणापेक्षां जास्त आहे. तसेंच डोळे आलेल्या माणसाच्या सान्निध्यांत राहून डोळे आलेल्या माणसांचें प्रमाण केवढें जरी अल्प—दहांत एक—

असलें, तरी हें प्रमाण अशा माणसांच्या सान्निध्यांत नसलेल्या लोकांतील डोळे आलेल्या लोकांच्या प्रमाणापेक्षां जास्त आहे. कारण, त्या लोकांत तें प्रमाण हजारास एक इतकेंही आढळत नाहीं. यावरून वरील विधानांत कार्यकारण संबंध मुळींच नाहीं असें नसून तो थोडा तरी आहे असें सिद्ध होतें. यावरून संबंध-पूर्ण अथवा अपूर्ण-ओळखण्याचा नियम असा होईल कीं, एरवीं, म्हणजे मानीव कारणाभावीं अथवा विवक्षितलक्षणाभावीं, मानीव कार्याचें अथवा साध्याचें जें प्रमाण आढळतें, त्यापेक्षां तें कारणानें युक्त अथवा तल्लक्षणयुक्त वस्तूंमध्यें जर जास्त मानानें आढळेल, तर त्यांमध्यें कांहीं संबंध आहे असें मानण्यास हरकत नाहीं.

व्यवहारोपयोगी नियमांचा मुख्य हेतु, अज्ञात गोष्ट पूर्वीपेक्षां जास्त प्रमाणांत ज्ञात करून देणें,' हा आहे. नियमांत थोडीफार सत्यता असेल तर नियमज्ञानाभावीं इष्ट गोष्ट ज्या प्रमाणांत यदृच्छेनें आढळून येईल त्यापेक्षां ती नियमाच्या साहाय्यानें जास्त प्रमाणांत आढळून आली पाहिजे; व तशी ती आढळून आली, म्हणजे नियमाची उपयुक्तता अंशतः सिद्ध झाली. उ० पत्त्यांमध्यें ठिपक्यांचे प्रकार चारच असतात. म्हणून पत्ते वाटेल तसे घेतले तर त्यांत प्रत्येक प्रकारचे पत्ते एक चतुर्थांश येण्याचा संभव पुष्कळच आहे. अर्थात् न पाहतां पत्ते निवडण्याच्या एकाद्या अद्भुत पद्धतीनें विशिष्ट प्रकारचेच ( चौकट, किलवर इ० ) पत्ते आपल्या हातांत येतात असा नियम कोणास सिद्ध करावयाचा असेल, तर त्या पद्धतीनें घेतलेल्या पत्त्यांत इष्ट प्रकाराच्या पत्त्यांचें प्रमाण एक चतुर्थांशापेक्षां जास्त असतें असें दाखवितां आलें पाहिजे. हीच कसोटी कोणत्याही नियमाचा खरेंखोटेंपणा पाहाण्यास लावली पाहिजे.

यावरून व्यवहारोपयोगी व अर्थात् ( अंशतः अथवा पूर्णपणें ) खऱ्या नियमाची कसोटी ही ठरतें कीं, त्या **नियमाभावीं अथवा यदृच्छेनें घेतलेल्या अनेक वस्तूंमध्यें साध्यांचें जें प्रमाण असतें त्यापेक्षां, अंशतः तरी सत्य असणाऱ्या नियमाप्रमाणें निवडलेल्या वस्तूंमध्यें साध्यांचें प्रमाण जास्त आढळून आलें पाहिजे.**

उलट, हेंही ध्यानांत ठेवावें कीं, **यथार्थ इष्ट उत्तरांची संख्या केवढी-**

**ही मोठी** ( कोटी अथवा परार्धही ) **असली, अथवा यथार्थ उत्तरांचें एकंदर उत्तरांशीं प्रमाण शेंकडा कितीही–९९ अथवा १००–असलें तरी तेवढयावरूनच नियमाची सत्यता ठरत नाहीं.** (नियमाची सत्यता म्हणजे पक्षसाध्यांतील तार्किक संबंध. ) सत्यता ठरण्यास, त्या लक्षणानें युक्त नसलेल्या वस्तूंमध्यें इष्टांचें प्रमाण काय आहे अथवा इष्टानिष्ट वस्तूंच्या समुच्चयामध्यें इष्टांचें प्रमाण काय आहे हें लक्षांत घेतलेंच पाहिजे. यथार्थ उत्तरांच्या **शेंकडा प्रमाणावरून नियमाची सत्यता ठरवावयाची असेल तर असा** नियम सांगतां येईल कीं, सर्वसमुच्चयांत इष्टानिष्ट-**वस्तूंचे जें प्रमाण असेल त्यापेक्षां तें नियमानुसार निवडलेल्या वस्तूंमध्यें, बरेंच भिन्न असावयास पाहिजे.**

अंकप्रमाणशास्त्रा( Science of Statistics )मध्यें दोन भिन्न गोष्टींमध्यें कांहीं संबंध आहे कीं नाहीं हें कसें ठरवावयाचे यासंबंधानें अशी कसोटी दिली आहे कीं,

$$\frac{A}{B} = \frac{a}{\text{not-B}} \quad \text{असेल}$$

तर A व B यांमध्यें कांहीं संबंध नाहीं असें समजावें. वरील संज्ञांचें अर्थ पुढीलप्रमाणें. B = विशिष्टलक्षणयुक्त गोष्टी, उदाहरणार्थ ग्रहयुतिजवळचे दिवस. A =विशिष्ट लक्ष्य, उ० पर्जन्ययुक्त दिवस अथवा पर्जन्यमान. a म्हणजे B लक्षणयुक्तांशिवाय अन्य लक्ष्यें; उदा० युतियुक्त दिवसांशिवाय इतर दिवसांपैकीं पर्जन्ययुक्त दिवस अथवा या दिवसांतील पर्जन्यमान. not-B म्हणजे B लक्षणविहीन वस्तु; उदा० ग्रहयुतिलक्षणयुक्त दिवस सोडून इतर दिवस.

( ३ )

**वस्तुस्थितीविषयीं अज्ञान.**

याविषयीं माहिती पुढें प्रकरणें ८-१३ यांत दिली आहे.

( ४ )

**संदिग्धता—**

निमित्त व परिणाम, अथवा कारण व कार्य यांचे अर्थ स्पष्ट

पाहिजेत, व कारण व कार्य यांमधील अवधीला कांहीं तरी नियमित अशी मर्यादा मानणें जरूर आहे; उदाहरणार्थ, " कारणानंतर कार्य फार तर अमूक काळांत घडतें " इ०. ही कालमर्यादा फार मोठी असतांही उपयोगी नाहीं. कारण मर्यादित कालांत कार्य घडेल, तरच कार्यकारण संबंध आहे कीं नाहीं याचा अनुभव पाहतां येईल. नाहींतर तो पाहणें अशक्य होईल व अनवस्था प्रसंग उद्भवेल. अमूक विहिरीचें पाणी प्याल्यानें २–४ दिवसांत अथवा फारतर १-२ महिन्यांत ताप येतो असा नियम कोणीं सांगितला, तर त्याचा खरेंखोटेंपणा कांहीं दिवसांनीं समजून येईल. पण पाणी प्याल्यानंतर १,२ वर्षांत ताप येतो असा कोणी कार्य-कारण संबंध कल्पिला, तर त्याच्या खरेपणाचा निश्चय कसा व्हावयाचा ! १,२ वर्षांत आहारविहाराचे अनेक प्रकार होणार; यास्तव एक वर्षानंतर ताप आला तर तो विहिरीच्या पाण्यामुळें, कीं दुसऱ्या कशामुळें, याचा निर्णय कसा व्हावयाचा ! म्हणूनच हा निर्णय होण्यास, कार्य होण्याचा अवधि कांहींतरी निश्चित व मर्यादित मानणें जरूर आहे हें उघड आहे. तसा मानला नाहीं तर कार्यकारण संबंध नसतानांही ( कार्य केव्हांतरी आढळून आल्यानें ) तो आहे असा भास होईल. अशा प्रकारच्या कार्य-कारणासंबंधाच्या विधानांत जो दोष असतो त्यास संदिग्धता हें नांव देतां येईल.

विधान मर्यादित ( म्हणजे स्पष्ट ) असलें तर त्याची संदिग्धता कमी होऊन त्याचा खरेंखोटेंपणा लवकर पाहतां येतो. पण, 'माझ्या शापामुळें या कुटुंबांतील कोणाचें तरी नुकसान होईल, अथवा माझ्या आशिर्वादा-मुळें अमूक व्यापाऱ्यास एकदां बराच फायदा येईल ' अशा संदिग्ध विधानांचा खोटेपणा कसा कळून येणार !

पायगुण, शुभाशुभ वगैरेसंबंधाच्या पुष्कळ कल्पना या अशा संदिग्धते-मुळेंच उत्पन्न झालेल्या व टिकलेल्या आहेत. किती दिवसांनीं व कशा प्रकारचा अनिष्ट परिणाम घडावयाचा ह्यासंबंधानें यांत कांहींच स्पष्टपणा नसल्यामुळें वर्षांदोन वर्षांत कसलीही गोष्ट घडली तरी तिशीं याचा संबंध जोडतां येतो व त्यामुळें खोटेपणा कळून येत नाहीं.

भविष्यें खरीं ठरलीं असें पुष्कळ वेळां वाटतें याचें एक कारण पक्ष व साध्य यांतील संदिग्धता हें असतें. कांहीं योग अनुकूल व कांहीं योग प्रतिकूल असा संदिग्ध पक्ष व प्रकृति बिघडणें, द्रव्यहानि, भांडणतंटा असें संदिग्ध व म्हणून अतिव्यापक साध्य असल्यावर घडलेल्या कोणत्यातरी वृत्ताचा संबंध कोणत्यातरी पक्षाशीं लावणें सुलभ होतें असें दिसून येईल. "अमुक ग्रह अमक्या अंशावर आल्यावर अमुक विशिष्ट ( सामान्य नव्हे ) प्रकारची गोष्ट होईल" असें सांगून तसें नेहमीं, निदान ७५ प्रसंगीं, घडेल तर त्यांतील संदिग्धता दोष नाहींसा होऊन तें भविष्य 'शास्त्रीय' या संज्ञेस अवश्य प्राप्त होईल.

**लबाडांचा अथवा अंधश्रद्धांचा आधार संदिग्धता हाच असतो.**

भोंदू अथवा लबाड मनुष्य लबाडी छपविण्यास काय करतो याचा विचार केला असतां तो संदिग्धतेचाच उपयोग करतो असें दिसून येईल. ज्या भोंदूनें संधि साधून हातचलाखीनें सोनें दुप्पट करून दाखविलें आहे, तो, चाणाक्ष माणसापुढें दंभस्फोट होण्याचा प्रसंग आला तर तो टाळण्यासाठीं, काय सबबी सांगेल बरें ! ( १ ) आज दिवस चांगला नाहीं; (२) ती वनस्पति आज खात्रीची मिळाली नाहीं; ( ३ ) आज तब्येत नीट नाहीं; ( ४ ) काल विटाळशीचा शब्द ऐकल्यानें सिद्धि गेली; ( ५ ) हा चमत्कार पूर्वीं विशेष कारणास्तव करून दाखविला, पण तें कारण आतां राहिलें नाहीं म्हणून तो आम्ही करूं इच्छित नाहीं; ( ६ ) तो करण्यास आमच्या गुरूंची सध्यां परवानगी नाहीं......इत्यादि.

वर ज्या सबबी सांगितल्या आहेत त्या सर्व संदिग्धतेच्या पोटीं येणाऱ्या आहेत. ह्यामुळें पाहिजे तेव्हां त्यांच्या मार्गे लपतां येते. ह्याच अडचणी निःसंदिग्ध भाषेंत व अगोदरच सांगितल्या तर त्या नडतील, म्हणून त्या मोघम ठेवण्यांत व मागून सांगण्यांत येतात.

**ज्यांच्याजवळ खरें ज्ञान आहे ते सबबी सांगत नाहींत** हें ध्यानांत ठेवावें. जे जे नवीन शास्त्रीय शोध जगांत खरे म्हणून ठरलेले आहेत ते पुढें आणणाऱ्यांनीं अशा सबबी कधींच सांगितल्या नाहींत; एवढेंच नव्हे तर चौकशी करणाऱ्या कोणाही माणसास ते फिरून फिरून

अनेक प्रयोग करून दाखविण्यास एका पायावर तयार असतात, असें आढळून येतें; व हें करणें अवश्यही आहे. अनेक वेळां वापरल्याशिवाय नव्या वस्तूचे—घोड्याचे वगैरे—गुणदोष कळून येत नाहींत, त्याप्रमाणें कोणतीही कल्पना, विशेषतः वादग्रस्त कल्पना, अनेक प्रकारें योजून पारखल्याशिवाय, तिचा खरेंखोटेंपणा पूर्णपणें कळून येत नाहीं. पाहिजे तितका अनुभव न घेतल्यामुळें खोटया गोष्टींतील खोटेपणा कळून आला नाहीं अशाबद्दल अनेक उदाहरणें आहेत. यास्तव, चमत्कारांचा किंवा कोणत्याही नवीन गोष्टींचा इतरांनीं शोध करणें, व जे शोध करतात त्यांना चमत्कार करणारांनीं शोध करण्याची संधि देणें, अवश्य आहे.

यासंबंधीं शास्त्राचें मत पहाः—

Science insists on continual verification by testing against facts, because *the bitter experience of history is that without such constant testing, man's imagination and logical faculty run away with him and in the long run make a fool of him.*

Page 18. J. Huxley in "Science and Religion."

बरेच मंत्र, रोगांवरील तोडगे, खोटीं औषधें, वगैरेंमधील असत्यता कळून न येण्याचें एक कारण संदिग्धता हें होय. वास्तविक स्थिति अशी आहे कीं, बरेच रोग केवळ कालांतरानें, अथवा उपोषण, थंड पाण्याचें स्नान, थंड पाण्याचा प्रयोग, यांनीं पूर्णपणें बरे होतात किंवा सौम्य होतात; कोणतीही स्थिति-उत्कर्षाची किंवा अवनतीची-कालांतरानें बदलते; कालांतरानें दुष्काळाचा सुकाळ व सुकाळाचा दुष्काळ होतो. स्थित्यंतर हा जगाचा नियमच आहे. अवतार समजल्या जाणाऱ्या विक्रमशिवाजीसारख्यांचेंही राज्य टिकत नाहीं. अशी स्थिति असल्यामुळें, अमक्यामुळेंच अमूक झालें असें विधान करणें असल्यास, कार्य कोणत्या निश्चित स्वरूपाचें व केव्हां होणार याविषयीं निःसंदिग्ध माहिती आगाऊ दिली पाहिजे. ती तशी न देतां, कार्य झाल्यावर तें मंत्र, औषध किंवा शकून यामुळें झालें, व झालें नाहीं, म्हणजे ' पूर्णभक्तिपूर्वक विधि केला नाहीं,' ' मंत्राची सांगता

पूर्ण झाली नाहीं,' 'औषध बरोबर तयार केलें गेलें नाहीं किंवा घेतलें गेलें नाहीं' अशी सबब सांगावयाची, हें बरोबर नाहीं. अशा संदिग्ध विधानामुळें आत्मवंचन व परवंचन घडतें, व कारणाची असत्यता कळून येत नाहीं.

यावरून भ्रम टिकविण्यास संदिग्धता कशी उपयोगीं पडते तें दिसून येईल.

---

## प्रकरण ६ वें.

## सत्यता कशी पहावयाची?

एका दृष्टीनें लोकभ्रमांचे पुढील प्रकार करतां येतील:—

( १ ) वैयक्तिक अद्भुत वृत्तें म्हणजे विनानियम पूर्वी घडलेलें, किंवा हल्लीं अनियमित रीतीनें कधींतरी घडणारे चमत्कार.

( २ ) एकाद्या व्यक्तीकडून नियमित प्रसंगीं वारंवार घडणारे व वेळीं गेलें असतां दृष्टीस पडण्याजोगे चमत्कार.

( ३ ) कोणा माणसावर अवलंबून नसणारे व केव्हांही पहातां येण्यासारखे अथवा भौतिक कार्यकारणसंबंधाचे किंवा सूच्यसूचकसंबंधाचे चमत्कार.

### सत्यतेच्या कसोट्या.

( १ ) पहिल्या व दुसऱ्या प्रकारांच्या चमत्कारांचे, कालाच्या दृष्टीनें दोन पोटभेद होतील:—( अ ) भूतकालीन, व ( ब ) वर्तमानकालीन.

पैकीं भूतकालीन चमत्कारांच्या सत्यतेच्या कसोटया:—

( १ ) सांगणाऱ्या व्यक्तीची योग्यता म्हणजे विश्वसनीयता.

( २ ) सांगणाऱ्या व्यक्तीनें चमत्कार स्वतः पाहिला, कीं दुसऱ्याकडून हकीकत ऐकली.

( ३ ) सांगणाराचा त्यांत कांहीं स्वार्थ किंवा पक्षाभिमान अथवा अभिनिवेश कितपत आहे.

( ४ ) त्या चमत्काराचे दुसरे साक्षी असल्यास त्यांची विश्वसनीयता.

( ५ ) तशाच प्रसंगीं तसा चमत्कार अन्य ठिकाणीं झाल्याबद्दल विश्वसनीय माहिती. तसा घडला नसल्यास न घडण्यास समाधानकारक कारण काय ?

वरील प्रमाणांवरूनही भूतकालीन चमत्कारांची सत्यता पूर्णपणें निश्चित करणें शक्य नाहीं. कारण कोण साक्षीदार विश्वसनीय मानावयाचा व तो किती विश्वसनीय मानावयाचा, त्याचा म्हणून समजला जाणारा लेख कितपत अस्सल आहे, लेखक श्रद्धाळू किंवा फसण्यास पात्र कितपत होता, इत्यादी-संबंधानें निश्चित मोजमाप नसल्यानें, विश्वसनीयतेसंबंधानें मतभेद होणें अपरिहार्य आहे. शिवाय त्यावेळची नैसर्गिक स्थितिच भिन्न होती असें कोणीं विधान केलें, तर तें खोडणें सोपें नाहीं. ( मात्र या बाबतींत शास्त्रज्ञांचा असा सिद्धांत आहे कीं, निसर्गाचे नियम बदलत असल्याबद्दल—निदान गेल्या १०-५ हजार वर्षांत बदलल्याबद्दल—पुरावा नाहीं.) असो; पण वरील कारणास्तव भूतकालीन चमत्कारांच्या सत्यतेचा निर्णय होणें कठीण आहे.

जे चमत्कार हल्लींही केव्हां तरी घडतात त्यांची सत्यता ठरविणें कठीण आहे; कारण त्यांचा कांहींच नियम नसल्यामुळें त्यांचें अवलोकन करणें शक्य नसतें. एकाद्या जागीं बसून वर्षानुवर्ष रात्रंदिवस जागत राहणें कोणास शक्य नाहीं व एकादा मनुष्य पुष्कळ वेळ बसून राहिला असतांना चमत्कार घडला नाहीं, तर 'आम्ही काय करावें ! ते चमत्कार घडणें तुमच्या मर्जीवर थोडकेंच आहे ' असे चमत्काराचे पुरस्कर्ते म्हणणारच.

**वारंवार घडणाऱ्या वर्तमानकालीन वृत्तांतांची कसोटी—**

तज्ज्ञांनीं समक्ष पाहणें, व त्यांत पूर्वी सांगितलेले हेत्वाभासादि दोष नाहींत याविषयीं खात्री करून घेणें.

**कार्यकारणभावविषयक चमत्कार**—प्रत्यक्ष अथवा प्रयोगांनीं पाहून त्यांस शास्त्रीय ( १६-१७ व ७४ पानांत दिलेली ) कसोटी लावून पाहणें.

### चमत्कारांचे परीक्षकांची लायकी.

चमत्कारांची परीक्षा करणाऱ्यांमध्यें पुढील प्रकारचे लोक पाहिजेतः—

( १ ) कांहीं तर्कशास्त्रज्ञ व तत्त्वज्ञ—चमत्कारांवरून काढलें जाणारें अनुमान तर्कशास्त्रानुसार निर्दोष आहे काय हें ठरविण्यासाठीं.

( २ ) कांहीं शास्त्रज्ञ—चमत्काराची उपपत्ति आधिभौतिक शास्त्रानें काय लागतें हें ठरविण्यासाठीं. 'शास्त्रज्ञ' यांमध्यें वैद्य, डॉक्टर यांचा समावेश होतोच.

( ३ ) व्यवहारचतुर व चाणाक्ष लोक—चमत्कारांमध्यें गावगुंडी, लबाडी वगैरे आहे कीं काय हें पाहण्यासाठीं.

( ४ ) जादूच्या खेळाच्या तंत्राची माहिती असलेले लोक—चमत्कारांत हातचलाखीचा किंवा दुसरा कांहीं 'युक्तीचा' प्रकार आहे कीं काय हें पाहण्यासाठीं.

---

## प्रकरण ७ वें.

## बेभरंवशी आधार व भ्रामक प्रमाणें.

बेभरंवशी म्हणजे ज्यांवर निश्चयानें अवलंबून राहतां येत नाहीं असे आधार—

शास्त्रीय व अर्थात् तार्किक दृष्टीनें अविश्वसनीय अशीं अनेक प्रमाणें व आधार सामान्य लोकच नव्हे, तर समाजांत सुशिक्षित म्हणून समजले जाणारे लोकही कधीं कधीं उपयोगांत आणतात, म्हणून त्यांबद्दल थोडी माहिती देणें इष्ट आहे.

मात्र पुढील प्रकारचे आधार सर्वस्वीं अविश्वसनीय आहेत असें आमचें म्हणणें नाहीं. ते पूर्णपणें विश्वसनीय नाहींत हा आमचा मुख्य मुद्दा आहे.

( १ ) **वर्तमानपत्रांतील बातम्या**—एकादी गोष्ट कोणा माणसानें सांगितली तर ती खरी असते वा नसते, पण वर्तमानपत्रांतील अथवा ग्रंथांतील ( अथवा 'छापून आलेली' ) गोष्ट खरी असलीच पाहिजे अशी पुष्कळांची समजूत असते; पण हें बरोबर नाहीं. सर्व वर्तमानपत्रांचे संपादक टिळकआगरकर यांच्या तोडीचे असतात असें नाहीं; व असले तरी, त्यांतील सर्व लेख त्यांचेच असतात असें नाहीं. त्यांत लिहिणारे कांहीं लेखक सामान्य दर्जाचीं एवढेंच नव्हे तर कधीं पोटाकरितां 'संपादकास रुचेल तें, अथवा बाजारांत विकेल तें' लिहिणारीं माणसेंही असतात. बऱ्याच ग्रंथकारांची तीच स्थिति. शिवाय चांगले लेखकही, जेथें पक्षाभिमान किंवा पूर्वग्रह यांचा संबंध असतो, तेथें थोडी अतिशयोक्ति करतात, किंवा फाजील श्रद्धा दाखवितात. मतभेदाचा विषय असेल तेव्हां ज्या सभेस ७५ माणसें खरोखरीं आलेलीं असतात, तिचें वर्णन करतांना, अनुकूल पक्ष 'शें दीडशें श्रोते जमले होते' असें वर्णन करतो, व विरुद्ध पक्ष 'जेमतेम ४०।५० लोक जमले होते' असें लिहितो, हा नेहमींचा अनुभव आहे. हकीकतींत असत्यता येण्याचें आणखी एक कारण, न पाहिलेल्या किंवा लक्षांत न राहिलेल्या गोष्टींची उणीव, अजाणतेपणें काल्पनिक वर्णनानें भरून काढण्याची स्वाभाविक प्रवृत्ति, हें होय. म्हणूनच पाहिलेल्या गोष्टींचें वर्णनांत प्रामाणिक माणसांचीहि एकवाक्यता आढळून येत नाहीं. पूर्वग्रह किंवा रागद्वेष नसतांही वर्णिलेल्या हकीकतींत किती भाग काल्पनिक असतो याचा अनुभव पाहण्यासाठीं अनेक प्रयोग मानसशास्त्रज्ञांनीं केलेले आहेत. यांपैकीं एक पुढील प्रकारचा होता. कॉलेजांतील पदवीधरांच्या वर्गांत प्रोफेसरांचें भाषण चालू असतां एक मनुष्य तेथें शिरला व तो प्रोफेसरांशीं भांडला व त्यांशीं त्यानें थोडीबहुत धक्काबुक्की केली. याबद्दल "त्या माणसावर खटला करावयाचा आहे," म्हणून घडलेली हकीकत यथातथ्य लिहावयास श्रोत्यांना व्याख्यात्यांनीं सांगितलें. त्यावेळीं त्यांच्या लेखांवरून असें दिसून आलें कीं, पुष्कळांच्या हकीकती वस्तुस्थितीशीं विसंगत होत्या. नंतर व्याख्यात्यांनीं जेव्हां सांगितलें कीं "झालेलें भांडण खरें नसून तें पूर्वी ठरविलेलें एक नाटकच होतें व त्यांतील सर्व भाग आधीं ठरलेलाच होता" तेव्हां आपण न

जाणतां वर्णनामध्यें आपल्या पदरचें किती घुसडतों हें सर्वांस कळून येऊन आश्चर्य वाटलें !

वर्तमानपत्रांतील हकीकती कितपत यथार्थ असतात याविषयीं पुढील अनुभवांचा विचार करा.

( १ ) महायुद्धाचे वेळीं विरुद्धपक्षाविषयीं वर्तमानपत्रांत आलेली माहिती.

( २ ) हिंदुमुसलमानांचे दंग्यांत विरुद्ध पक्षांविषयीं त्या त्या वर्तमानपत्रांतील माहिती.

( ३ ) कोणत्याही मारामारीची अथवा दंग्याची विरुद्ध वर्तमानपत्रांत येणारी हकीकत.

सामान्यपणें असें समजण्यास हरकत नाहीं कीं, जेथें विरुद्धपक्ष इनकार करण्यास हजर नसतो तेथें, विशेषतः हकीकत फुगवून सांगण्यानें जेथें आपल्या पक्षाचा फायदा होण्यासारखा असतो तेथें, वर्तमानपत्रांतील हकीकती बहुधा एकांगी असतात. म्हणून नाटककंपन्यांचे खेळ, सभा, चमत्कार, बड्या लोकांच्या शिकारी, इत्यादिकांविषयींच्या वर्तमानपत्रांतील हकीकती पूर्णपणें विश्वसनीय नसतात. शिकारीच्या जनावरांनीं लिहिलेलीं वर्तमानपत्रें असतीं, तर कांहीं राजे व साहेब यांचें शिकारींतील कौशल्य व धैर्य यांविषयीं काय हकीकत प्रसिद्ध झाली असती याचीही वाचकांनीं कल्पना करावी !

वर्तमानपत्रांचे चालकांची दृष्टि बहुधा व्यापारी असते, म्हणून खपेल तो माल वाचकांना देणें त्यांना अवश्य असते. या कारणास्तव त्यांना स्वतः अविश्वसनीय वाटणाऱ्या बातम्याही ते ' लोकांना रुचतात ' म्हणून देतात हें वाचकांनीं विसरूं नये.

वर्तमानपत्रांतील अविश्वसनीय बातम्यांचीं कांहीं उदाहरणें:—

( १ ) श्री० ...... महाराज यांच्या चमत्कारांनीं भरलेलीं अनेक पत्रें अनेक वर्तमानपत्रांकडे गेलीं होती व त्यांतील अनेक प्रसिद्धही झालीं होतीं. हे चमत्कार खरे नव्हते असें पूर्ण चिकित्सेअंतीं कळून आलें आहे व ते " भावनामूलक होते " असें...महाराजांनींही कबूल केल्याबद्दल मजजवळ साक्षीपुरावा आहे.

( २ ) माताड येथील बोलणारें वासरूं.

( ३ ) पंजाबमधील हिस्सार या शहरीं एका खुनाच्या खटल्यांत एका माकडानें कोर्टांत गुन्हेगारास ओळखल्याची...दैनिकामध्यें आलेली हकीगत.†

प्रसिद्ध इंग्रजी दैनिकांतून पुढीलसारख्या खोट्या बातम्या प्रसिद्ध झाल्या आहेत:—

( १ ) प्रो० राव हे (वास्तविकपणें १ ड्राम ॲसिड प्यालें असतां) एक औंस ॲसिड प्याले.

( २ ) मुंगसानें चाऊन तोंडांत घातलेल्या औषधानें सर्पदष्ट मनुष्य बरा होणें—हैद्राबाद येथें घडलेल्या ह्या चमत्कारासंबंधानें टाइम्स ऑफ इंडिया वर्तमानपत्रांतून कांहीं दिवसांपूर्वी बातमी प्रसिद्ध झाली होती. तिजसंबंधानें विश्वसनीय बातमी देण्याबद्दल केसरीपत्रांतून केलेल्या विनंतीला उत्तर मिळालें नाहीं. यावरून ह्या बातमींत कितपत तथ्य आहे याचा विचार करावा.

( ३ ) भुताटकीचे अनेक चमत्कार.

प्रसिद्ध सार्वजनिककार्यकर्ते श्री० गोपाळराव देवधर यांचेकडे एका गृहस्थांनीं "वर्तमानपत्रांत आलेली माझ्यासंबंधीं हकीगत खोटी आहे, मी तिचा इनकार करतों" अशी तक्रार केली असतां, ते म्हणाले "वर्तमानपत्रांतील बातम्यांचा इनकार तुम्ही कराल, तर तुम्हांस चार जन्महीं पुरणार नाहींत !"

१९३८च्या केसरींतील पुढील एक उतारा पहा:—

"कित्येक लोकांना, छापलेलें कांहीं पाहिलें कीं तें विश्वसनीय वाटतें; आणि जुन्या ग्रंथांत कोठें कांहीं लिहिलेलें आढळलें कीं तें वज्रलेप समजण्याचा भोळेपणा बरेचजण करतात. पण शिष्टलिखाणांत असल्या गोष्टींचा उपयोग शास्त्रीय दृष्ट्या म्हणून करूं पाहाणारे लोक एक मूर्ख तरी असले

---

† ही खोटी असल्याबद्दल तेथील डे० कमिशनरांचें पत्र मीं आणविलें आहे.

पाहिजेत किंवा लबाडी करून लोकांची दिशाभूल जाणूनबुजून करीत असले पाहिजेत, यांत शंका बाळगण्याचें कारण नाहीं."

## (२) ग्रंथांतील असत्य विधानें.

ग्रंथांतूनही असत्य विधानें थोडींथोडकीं नसतात. नमुन्यादाखल उदाहरणें:—

माहितीच्या बाबतींत बहुतेक प्राचीन ग्रंथांत थोडयाबहुत चुका आढळतातच, पण अगदीं अर्वाचीन ग्रंथांतही आढळतात. भरतीओहटीसंबंधीं माहिती देतांना 'चंद्र सूर्यापेक्षां पृथ्वीला जवळ असल्यानें त्याचें आकर्षण पृथ्वीवर जास्त घडतें' हें चुकीचें विधान इकडील पुस्तकांतच नव्हे तर कांहीं इंग्रजी पुस्तकांत अद्याप आढळतें. वस्तुस्थिति अशी आहे कीं, सूर्याचें पृथ्वीवरील आकर्षण चंद्राच्या २।३ शें पट आहे. पण भरती-ओहटी चंद्रामुळें विशेष घडते याचें कारण हें कीं, भूपृष्ठ व भूमध्य यांवरील सूर्याच्या आकर्षणांत जो फरक आहे त्याच्यापेक्षां भूपृष्ठ व भूमध्य यांवरील चंद्राच्या आकर्षणांतील फरक पुष्कळ जास्त आहे.

परदेश, परसंस्कृति यांसंबंधानें तर ग्रंथांतून अनेक चुका आढळतात.

ॲरिस्टॉटलसारख्यांच्या ग्रंथांतही चुकीचीं विधानें अनेक आहेत; त्यांपैकीं एक नमुना–'समुद्रकांठीं राहणाऱ्यांमध्यें मृत्यु ओहटीच्या वेळेलाच होतो'. यासंबंधानें प्लिनी या प्रसिद्ध ग्रंथकारानें अशी दुरुस्ती केली कीं, 'हें विधान फक्त माणसांसंबंधानें खरें आहे पण इतर प्राण्यांसंबंधानें नाहीं.' पुढें १७२७–२९ सालीं यासंबंधीं केलेल्या प्रत्यक्ष अवलोकनावरून कळून आलें कीं, माणसांसंबंधानेंही हें विधान खरें नाहीं!

'कौतुकचिंतामणि' या ग्रंथांत पुढील प्रयोगांविषयीं माहिती आहे:— दृष्टीबंधन म्हणजे नजरबंदी, शत्रूचें सैन्य स्तंभित करणें, शस्त्रस्तंभन, अग्निस्तंभन, अन्न शिजण्याचें बंद करणें, आग बंद करणें, वीज पडण्याचें बंद करणें, वशीकरण, भूमिगत द्रव्य ओळखणें, बंद दारें खुलीं करणें, सर्प, विंचू इ० उत्पन्न करणें, मेणाच्या हत्यारानें लोखंडी पदार्थ फोडणें, भांडयांतील दूध भांडयावर कोळशाची रेघ ओढून नाहींसें करणें...इ०.

**कौटिलीय अर्थशास्त्र**—भाग २ पानें १८४-५, १८७-१८९, १९०-१९६ यांतील कांहीं भाग.

Magazine of Astrology Vol. 21. pp. 145–47. by Prof. B. S. Rao, यांतील पुढील माहिती पहा:—

During the Great War–1914 to 1918–the Germans developed the art of agriculture so wonderfully that they were able to sow and reap paddy, wheat, barley and other grains in ¼th or ⅕th of the time they naturally required. Paddy, it is said, was sown and reaped in one or two weeks....They extracted some oils from the dead soldiers and other animals and when that was applied to the plants they yielded splendid and quick results.

From the Pilla Thyalam made in Cochin, the wearer of this oil becomes invisible. Candles made from the extracts of dirty women are able to make the men invisible. From Drisyanjanam we are enabled to see the deeply hidden treasures in the earth.

## इतिहासांतील अविश्वसनीय हकीकती.

बखरींत अविश्वसनीय हकीकती अनेक आढळतातच, पण शुद्ध इतिहास म्हणून लिहिलेल्या ग्रंथांतही कधीं कधीं आढळतात. यासंबंधीं कांहीं उदाहरणें:—ब्लॅक होल, संभाजीनें सोयराबाईस भिंतींत चिणल्याची हकीकत व एकंदरीनें संभाजीची योग्यता, शिवाजीमहाराजांनीं लहानपणीं विजापुरास कसायापासून गाय सोडवून घेतल्याची हकीकत......इ.

बखरींतील खोट्या हकीकतींचीं कांहीं उदाहरणें:—पृथ्वीराजानें महमद घोरीचा केलेला वध, सदाशिरावभाऊंचे वधाबद्दल राघोबादादा पेशव्यांनीं अहमदशहा अबदालीचा घेतलेला सूड...इ०.

अशीं उदाहरणें शेंकडों देतां येतील.

## ( ३ ) स्वतःचा प्रत्यक्ष अनुभव.

पुष्कळांना असें वाटतें कीं, अनेक वेळां एखाद्या गोष्टीचा प्रत्यक्ष अनुभव आला म्हणजे ती खरी असली पाहिजे; परंतु प्रत्यक्ष अनुभवांमध्यें हेत्वाभास किती प्रकारचे असूं शकतात याबद्दल जी माहिती ह्यावेळपर्यंत ( विशेषतः १–४ प्रकरणांत ) दिली आहे तिजवरून दिसून येईल कीं, योग्य चिकित्सा केल्यावांचून ( अर्थात अनुभवांत हेत्वाभास नाहीं अशी खात्री करून घेतल्यावांचून) दहापांच नव्हे तर हजारों–लाखों–अनुभवांचा पुरावाही शास्त्रीय दृष्ट्या बिलकूल ग्राह्य मानतां येत नाहीं.

खोटीं औषधें, निरुपयोगी ताईत व भोंदू लोक यांना, शहाण्या समजल्या जाणाऱ्या अनेक माणसांकडून, अद्यापही किती पाठिंबा मिळतो यावरून बऱ्याच माणसांचे प्रत्यक्ष अनुभव हे शास्त्रीय किंवा तात्त्विक बाबतींत विश्वसनीय प्रमाण मानतां येत नाहीं असें दिसून येईल.

## ( ४ ) सर्टिफिकेटांचा पुरावा.

निर्भेळ सत्याच्या दृष्टीनें, मोठ्या माणसांचीं सर्टिफिकिटेंही पूर्ण ग्राह्य पुरावा होत नाहींत. सर्टिफिकिटें देणारीं माणसें जहागीरदार, नबाब अथवा कलेक्टर, सिव्हिल सर्जन या दर्जाचीं असलीं म्हणजे त्यांची ग्वाही पुराव्याच्या दृष्टीनें पूर्ण समाधानकारक मानिली पाहिजे असें पुष्कळांना वाटतें. पण तेंही बरोबर नाहीं. यास कारणें:—

( १ ) राजे, नबाब यांचीं सर्टिफिकिटें त्यांच्यासाठीं त्यांचे चिटणीस कारभारी वगैरे माणसांनीं लिहिलेलीं असतात व भिडेमुळें अथवा श्रद्धालुपणामुळें, त्यांनीं लिहिलेल्या माहितींत कधीं कधीं असत्य विधान, निदान अतिशयोक्ति असते. ‘ जाऊं द्या कीं, गरिबाचें कल्याण होतें तर लिहा दोन शब्द अधिक’ अशीही लेखकाची वृत्ति असते. कांहीं जहागीरदार किंवा श्रीमंत हे स्वतः अज्ञ किंवा बेफिकीर असतात व जेथें स्वतःची हानि नाहीं तेथें वाटेल त्या शिफारशीवर सही करतात.

**( २ ) कांहीं लोक मोठे अधिकारी असले तरी त्यांना सर्व विषयांची माहिती असते असें नाहीं.** अर्थात् ज्या विषयाची त्यांना माहिती नाहीं त्यासंबंधानें त्यांनीं दिलेल्या प्रशंसापत्रास फारसें महत्त्व देतां येत नाहीं. उदा० फॉरेस्ट ऑफिसर किंवा कलेक्टर यांचें औषधाबद्दलचें मत.

( ३ ) सिव्हिल सर्जनसारखे अधिकारीदेखील कांहीं प्रसंगीं पुरेशी सावधगिरी न ठेवतां प्रशंसापत्रें देतात. याबद्दल ठळक उदाहरण पुढील होय. लेक्सिन ( Lexin ) हें औषध सर्पविषावर निरुपयोगी आहे असें हाफ्किन् इन्स्टिटयूटमध्यें ह्या औषधाच्या मालकाच्या समोर केलेल्या प्रयोगांत ठरलें, पण अशा औषधालाही एका I. M. S. मधील अधिकाऱ्यांनीं सर्टिफिकेट दिलें आहे असें त्या औषधासंबंधाच्या पुस्तकांवरून दिसून येतें.

सर्टिफिकेट देणारांची समजूत पूर्ण प्रामाणिक असेल; पण येथें तो मुख्य मुद्दा नसून, लायक समजल्या जाणाऱ्या माणसांच्या सर्टिफिकेटांतही पूर्ण सत्य असतेंच असें नाहीं हा आहे.

**( ५ ) मोठया** ( अधिकारानें अथवा विद्वत्तेनें मोठ्या ) **माणसांच्या साक्षीच्या अथवा लेखाचा पुरावा.**

पुष्कळांची अशी समजूत आहे कीं, चमत्कारासंबंधानें मोठया माणसांच्या अनुभवांचा पुरावा ग्राह्य मानला पाहिजे. पण हें बरोबर नाहीं. यांस कारणें:—

( अ ) मोठीं माणसें सर्व विषयांत तज्ञ असतात असें नाही. राजे, गव्हर्नर, प्रधान यांसारखे गृहस्थ राहू द्या, पण मोठमोठे विद्वान् व शास्त्रज्ञही चमत्कार पाहातांना चकल्याचीं अनेक उदाहरणें आहेत.

( ब ) मोठया माणसांवरही प्रचलित समजुतींचा परिणाम झालेला असल्यामुळें त्यांची दृष्टि कमजास्त मानानें कलुषित अशी असते, व आपला धर्म, आपल्या देशबंधूंचीं कृत्यें, आपल्या लोकांचे गुण यासंबंधीं मोठ्या माणसांचींही मतें पक्षपाताचीं असतात असें आढळून येईल.

**( ६ ) प्रतिभासंपन्न लेखक किंवा शास्त्रज्ञ यांचे सर्व अनुभव— हेही नेहमींच** साधार किंवा पूर्णपणें विश्वसनीय असतात असें नाहीं.

याचें कारण हें कीं, त्यांच्यामध्येंही कधीं कधीं कांहीं बाबतींत अंधश्रद्धा असते अथवा कधीं हेत्वाभास असतो. शिवाय त्यांची गति एका विषयांत विशेष असली म्हणजे ती वाटेल त्या विषयांत तितकीच चांगली असतेच असें नाहीं. उलट असें पुष्कळ वेळा, आढळतें कीं, एका विषयांतील तज्ञ इतर विषयांत फारच अज्ञ असतात. म्हणून ते फसण्याचा संभव असतो.

अशा माणसांच्या पुराव्याच्या अविश्वसनीयतेचीं उदाहरणें:—

( १ ) स्टेड या प्रसिद्ध लेखकानें, एका मृतात्म्याच्या फोटोग्राफच्या अस्सलपणासंबंधानें, १९०९ सालीं 'फॉर्ट नाइटली रिव्ह्यू' या नियत-कालिकामध्यें लिहिलेल्या लेखांत, पुढील विधान केलें होतें.

"No one in England, so for I have been able to ascertain, knew that any Piet Botha ever existed." यावरून त्यांचें अनुमान हें कीं, 'बोथा ह्या व्यक्तीची इंग्लंडमध्यें कोणास माहिती नाहीं, तर त्यांचा फोटो कांहीं युक्तीनें दुसऱ्या फोटोशेजारीं काढण्याची शक्यता कोठून? अर्थात् हा फोटो बोथाच्या एका मित्राचा फोटो काढण्याच्या वेळीं तेथें आलेल्या बोथाच्या भुताचाच असला पाहिजे.' यासंबंधानें वस्तुस्थिति अशी आहे कीं, बोथाचा फोटो कांहीं वर्षांपूर्वी २४ नोव्हेंबर १८९९च्या 'ग्रॅफिक' या सचित्र वर्तमानपत्रांत दिलेला होता व फोटोखालीं "किंबर्लेजवळच्या लढाईत मारल्या गेलेल्या कॉमंडांट ( किल्ल्याचा अधिकारी किंवा सेनापति ) बोथा यांचा फोटो" असा मजकूर होता !

( २ ) इंग्लंड व इतर पाश्चात्य देश यांमध्यें १६–१८ ह्या शतकांत एकंदर १०।५ हजार बायका, त्या चेटक्या होत्या असें कोर्टांत पुराव्या-निशीं ठरून, जाळल्या गेल्या. ह्या चेटक्यांना 'केरसुणीच्या काठीवर बसून जातांना पाहिलें' म्हणून अनेक सन्मान्य व्यक्तींनीं कोर्टांत शपथ-पूर्वक प्रतिज्ञालेख दिलेच; पण सर टॉमस ब्राऊन यांसारख्या विद्वान लेखकांनीं चेटूक करणें कसें शक्य आहे याबद्दलची उपपत्ति व आपली खात्रीही ग्रंथांतन प्रतिपादिली आहे! शेक्सपीयर. मिल्टन यांचाही

चेटक्यांवर विश्वास होता. सैतानाच्या दुष्ट खोडयांचा अनुभव अनेक वेळा आल्याचें प्रसिद्ध धर्मसुधारक ल्यूथर यांनीं लिहिलें आहे! कांहीं चमत्कारांस ऑलिव्हर लॉजसारख्या शास्त्रज्ञांची मान्यता आहे म्हणून ते खरे असले पाहिजेत असें ज्यांना वाटतें त्यांनीं पुढील गोष्टी ध्यानांत ठेवाव्या:—

( अ ) त्यांच्या तोडीच्या इतर अनेक शास्त्रज्ञांची समजूत त्यांच्या उलट आहे, याची वाट काय ?

( ब ) वकिलींत अत्युच्च दर्जाची बुद्धिमत्ता असतां, राजकारण किंवा व्यवहार यांत शहाणपणाचा अभाव व धार्मिक बाबतींत मनोदौर्बल्य ज्यांचेमध्यें दिसतें, अशा अनेक व्यक्ति आपल्या पाहण्यांत आहेत. यावरून एकाद्या मनुष्याची बुद्धि एका विषयांत उत्तम चालत असली म्हणजे त्याच्यामध्यें अंधश्रद्धा किंवा मनोदौर्बल्य याचा भाग नसतो असें नाहीं असें दिसून येतें. अशा स्थितीमुळें कांहीं शास्त्रज्ञांच्या बुद्धींत कांहीं दोष असणें शक्य आहे. विशेषतः विशिष्ट धर्मश्रद्धा किंवा संसारिक आपत्ति यामुळें कांहीं शास्त्रज्ञांचे मनांत दौर्बल्य उत्पन्न होते. सर ऑ० लॉज यांचा मुलगा लढाईंत मृत्यु पावल्यामुळें त्यांचें मन ‘ मृतात्म्याशीं संभाषण ’ या विषयाच्या बाबतींत अंधश्रद्धायुक्त झालें आहे व त्यांच्यामध्यें अंधश्रद्धेचा भाग आहे, असें अनेक लेखकांनींही दाखविले आहे. अमेरिकेंतील प्रसिद्ध लेखक डॉ० राबिन्सन हे त्यांच्यासंबंधानें पुढीलप्रमाणें लिहितातः—

.........whose opinions deserve no more consideration than those of a coloured mammy on a southern plantation.

—Critic and Guide, Vol. 30 अंक ५, पान १२७.

क्रिस्त हाच सर्वश्रेष्ठ अवतार होय यासंबंधानें लॉजसाहेबांचें मत पुढीलप्रमाणें आहेः—

Yes, truly Christ was a planetary manifestation of Deity—a revelation to the human race, the highest and simplest it has yet had.

—पान ३८३, “Raymond.”

ख्रिस्ती धर्मासंबंधाचें लॉजसाहेबांचे वरील मत मान्य करण्यास जे तयार नाहींत त्यांनीं तरी 'हें लॉजसाहेबांचें मत आहे, म्हणून तें सत्य असलेंच पाहिजे' असें म्हणणें बरोबर नाहीं. लॉजसाहेब हे पहिल्या दर्जाचे शास्त्रज्ञ व फार थोर गृहस्थ आहेत याविषयीं वाद नाहीं; पण त्यांच्या कोणत्याही मतांत भावना अथवा केवळ श्रद्धा याचा भाग मुळींच नाहीं असें म्हणतां येत नाहीं.

शास्त्रज्ञ फसल्याबद्दलही अनेक उदाहरणें आहेत. प्रख्यात् शास्त्रज्ञ क्रुक्स यांना कांहीं ( केट फॉक्स वगैरे ) मध्यस्थांनीं फसविल्याचें प्रसिद्ध आहे.

**एक शंका**—लोकांतील (व वर्तमानपत्रांतील, ग्रंथांतील वगैरे) बातम्या अविश्वसनीय, तर सर्व इतिहास खोटा काय ?

सर्व बातम्या खऱ्या असतात असें जरी नसलें, तरी त्या नेहमीं सर्वस्वीं खोट्याच असतात असें नाहीं. **माणसें वस्तुविपर्यास करतात तो पूर्वग्रह, विकारवशता व अन्य मानसिक दोष आणि स्वार्थबुद्धि यांमुळें करतात.** असें कारण जेथें नसतें, तेथें माणसांचें विधान बहुधा खोटें नसतें. वास्तव **वरील दोषांमुळें जेवढी अयथार्थता वर्णनांत आलेली असेल तेवढी वगळली असतां राहिलेलें खरें** मानण्यास सामान्यतः हरकत नाहीं; उ० 'दोघांची मारामारी झाली' असें त्या ठिकाणचे भिन्न पक्षांचे बहुतेक लोक स्वतंत्रपणें सांगत असले, म्हणजे त्यांतील कोणी कोणास कसे व कोणत्या क्रमानें मारले याबद्दलचें प्रत्येकाचें विधान खरें नसलें, तरी मारामारी झाली एवढा भाग खरा असतो. म्हणून सामान्य नियम असा सांगता येईल कीं, **जेथें सांगणाराचा स्वार्थ अथवा पूर्वग्रह** (prejudice) **व १ल्या प्रकरणांत सांगितलेलें दोष यांचा संबंध नसतो तेथें वर्णिलेली हकीगत स्थूलमानानें खरी** म्हणून समजण्यास हरकत नाहीं. विशेषतः ज्यांचे हितसंबंध एरवीं वादीच्या विरुद्ध असतात अशा पूर्वग्रहाविरहित व चाणाक्ष अशा अनेक व्यक्तींनीं प्रत्यक्ष पाहिलेली व वादीस अनुकूल अशी एकाच अर्थाची हकीकत सांगितली,

तर ती विश्वसनीय मानण्यास हरकत नाहीं. कारण तींत विरुद्ध भाग असता तर त्यांनीं तो पुढें आणण्यास कमी केलें नसतें.

## भ्रमांचें समर्थन करणारीं कांहीं भ्रामक प्रमाणें.

(१) " ज्या पूर्वजांनीं इतकीं वर्षें या समजुती खऱ्या मानल्या ते वेडे होते काय ? "

वरील आक्षेपांत निरनिराळीं विधानें आहेत तीं पुढीलप्रमाणेंः—( १ ) पूर्वज वेडे होते काय ? ( २ ) जर ते वेडे नव्हते, तर त्यांच्या समजुती खोट्या कशा ? यांस उत्तर—

सर्व पूर्वज वेडे होते असें कोणाचेंही म्हणणें नाहीं. तथापि पूर्वज म्हटले कीं, ते पूर्णपणें शहाणे असा जो कांहींचा समज आहे तोही बरोबर नाहीं. हल्लींचे सर्व लोक पूर्णपणें शहाणे नाहींत हें सर्वांस मान्य आहे. हेच लोक एक हजार वर्षांनीं येणाऱ्या पिढीचे प्राचीन पूर्वज होतात. हे पूर्वज जर पूर्ण शहाणे नाहींत, तर हल्लींच्या लोकांचे पूर्वज शहाणे असले पाहिजे असे मानण्यास आधार काय ?

वडील माणसांविषयींच्या पूज्यबुद्धीमुळें वडील माणसें आपणांस शहाणीं वाटतात, व त्यावरून असा मिथ्याग्रह होतो कीं, त्यांचे वडील व त्या वडिलांचे वडील हे चढत्या प्रमाणांत शहाणे असले पाहिजेत. पण हा भ्रम आहे. येथें हें लक्षांत घेणें जरूर आहे कीं, जुन्या पिढीचे लोकांपेक्षां पुढील पिढीचे लोकच जास्त शहाणे असण्याचा संभव जास्त आहे; कारण नवीन पिढ्यांना जुन्या पिढ्यांच्या अनुभवाचा फायदा मिळतो. तथापि हा नियम अबाधित नव्हे. कांहीं कारणामुळें ज्ञानाचा व बुद्धिमत्तेचा ऱ्हासही होतो. म्हणून खरा नियम हा कीं, प्राचीनत्व किंवा आधुनिकता यांपैकीं कोणतीही गोष्ट शहाणपणाचा विश्वसनीय पुरावा नव्हे. वस्तुस्थिति अशी आहे कीं, कोणत्याही पिढीमध्यें कांहीं अज्ञानाचा भाग असावयाचाच. हें अज्ञान हल्लींच्या काळापेक्षां पूर्वकालीं सामान्यतः जास्त होतें. तथापि पूर्वींचे सर्व लोक सर्व बाबतींत वेडे होते असें कोणाचेंही म्हणणें नाहीं.

जर ते वेडे नव्हते, तर त्यांच्या समजुती खोटया कशा ? यास उत्तर हें कीं, त्यांच्यामध्यें कांहीं अज्ञानाचा भाग होता त्यास अनुसरून कांहीं खोटया समजुती होत्या. शहाण्या माणसांमध्यें कांहीं अज्ञानाचा भाग असतो याविषयीं पूर्वी व पुढें कांहीं उदाहरणें दिलेलीं आहेतच.

प्राचीन कालच्या खोट्या समजुतीची उपपत्ति दुसरी अशीही मानतां येईल कीं, ह्या खोटया समजुती पूर्वीच्या लोकांमध्यें जे शहाणे होते त्यांनीं प्रचलित केलेल्या नसून त्यांतील अज्ञानी लोकांनीं प्रचलित केल्या होत्या.

( २ ) " हें नास्तिकांचें मत आहे. "

हा आक्षेप कांहींसा गालि ( गालि म्हणजे शिवी ) स्वरूपाचा आहे. प्रतिपक्ष्यास निंदात्मक विशेषण देऊन अथवा श्रोत्यांच्या किंवा वाचकांच्या पूर्वग्रहांचा फायदा घेऊन प्रतिपक्ष्याचें मत चुकीचें असलेंच पाहिजे असा ग्रह उत्पन्न करण्याचा हा प्रकार आहे. नास्तिक या शब्दाचा मूळ अर्थ ' न अस्ति असें म्हणणारा ' एवढाच आहे. या अर्थानें कोणतेंही अस्तिपक्षाचें मत प्रतिपादणाऱ्याच्या दृष्टीनें त्याचा प्रतिपक्षी नास्तिकच आहे. पण व्यवहारांत या शब्दाचा उपयोग सामान्यतः ' ईश्वराचें अस्तित्व न मानणारा ' अशा अर्थी केला जातो. पुष्कळांच्या दृष्टीनें, ईश्वराचें अस्तित्व न मानणें अयोग्य आहे व तें विपर्यस्त मनोवृत्तीचें किंवा विचाराभावाचें द्योतक आहे; म्हणून एकाद्यास नास्तिक म्हणण्यानें त्याचीं मतें चुकीचीं असलीं पाहिजेत असा श्रोत्यांचा ग्रह होतो. पण हा ग्रह बरोबर नाहीं. प्रथम हें लक्षांत ठेविले पाहिजे कीं, लोकभ्रमविरोधक हे ईश्वराचें अस्तित्व न मानणारेच असतात असें मुळींच नाहीं. युरोपमधील प्रॉटेस्टंट लोक रोमन क्याथोलिक लोकांच्या कांहीं धार्मिक समजुती व कांहीं सामान्य लोकभ्रम खोटे मानतात, पण ते ईश्वराचें अस्तित्व न मानणारे आहेत असें नाहीं. तथापि लोकभ्रमविरोधक हे नास्तिक असतात असें मानले तरी असें कळून येईल कीं, ईश्वराचे अस्तित्व न मानणारे लोक अज्ञानी, विवेकहीन, किंवा विपर्यस्तमतप्रतिपादक असतात असेंही नाहीं. उलट, अशा लोकांमध्येंच उदारमतवादी व समाजसुधारक जास्त आढळतात. जैन व बौद्ध मिळून जगांत १०–४० कोट लोक आहेत व ह्यांची ईश्व-

राची कल्पना इतकी भिन्न आहे कीं, त्यांची निरीश्वरवाद्यांतच गणना होते. हे सर्व निरीश्वरवादी लोक इतर लोकांपेक्षां विचारीपणांत जर कमी नाहींत,* तर लोकभ्रमविरोधी हे नास्तिक आहेत असे जरी क्षणभर गृहीत धरले, तरी तेवढ्याच कारणावरून त्यांचे विचार विपर्यस्त अथवा चुकीचे मानतां येणार नाहींत. यास्तव ते नास्तिक आहेत असें म्हणण्यानें त्यांच्या मताचें अयथार्थत्व मुळींच सिद्ध होत नाहीं.

मात्र, आपण मानतों तो धर्म किंवा ते ग्रंथ जे मानीत नाहींत त्यांस नास्तिक म्हणावयाचे असेल, तर कोणत्याही धर्माचा अनुयायी भिन्न धर्माच्या अनुयायांचे मतें नास्तिक ठरतो हें ध्यानांत ठेवले पाहिजे. या अर्थानें हिंदू लोक कट्टया मुसलमानांचे दृष्टीनें काफिर अथवा नास्तिकच आहेत. एवढेंच काय, पण वैष्णवांचे मतें शंकराचार्यानुयायीही नास्तिक आहेत. एवंच या विशेषणांत गालिप्रदानापेक्षां विशेष अर्थ नाहीं.

( ३ ) "ही समजून तुम्ही आज जरी खोटी ठरवितां तरी लक्षांत ठेवा कीं, पूर्वी खोटया मानलेल्या समजुती मागाहून खऱ्या ठरल्या, त्याप्रमाणें ही समजूत पुढें खरी ठरेल."

ही निवळ आशा आहे. हे कांहीं प्रमाण नव्हे. जें आज संभाव्य वाटतें

---

* जैन व बौद्ध या निरीश्वरवादी लोकांचे धर्मग्रंथ अतिशय तर्कप्रधान आहेत असें विद्वानांचें मत आहे. शिवाय, सर्व शास्त्रज्ञ नास्तिक असतात हा समजही चुकीचा आहे. नास्तिक हा शब्द 'ईश्वर व धर्म यांस बिलकूल न मानणारे' या अर्थी घेतला, तर त्या अर्थानें सर्व शास्त्रज्ञ (अथवा त्यांचे अनुयायी ) नास्तिक असतात असें नाहीं. बऱ्याच-निदान कांहीं शास्त्रज्ञांचा दोन्हीवर विश्वास आहे हे Science and Religion या नवीन पुस्तकांत हक्स्ले, जीन्स, एडिंग्टन इत्यादि नामांकित शास्त्रज्ञांचे जे लेख आहेत त्यांवरून दिसून येईल. मात्र ईश्वराचें स्वरूप व धर्माची व्याप्ति यासंबंधाची शास्त्रज्ञांची कल्पना सामान्य कल्पनेहून भिन्न असते. विश्वात्म्याशीं समरस होणें ह्या अर्थानें धर्मानुचरण शास्त्रज्ञांना मान्य आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

तें पुढें पूर्णपणें सत्य ठरतेच असें नाहीं. प्रथम खोटया किंवा महत्त्वशून्य वाटलेल्या गोष्टींपैकीं कांहीं मागाहून खऱ्या किंवा महत्त्वाच्या ठरतात हें खरें; पण तसें नेहमींच घडत नाहीं. ही गोष्ट नियम या सदराखालीं येत नसून अपवाद या सदराखालींच येते. आपण आधार घेतो तो नियमाचा, अपवादाचा नव्हे. अपवादाचा आधार घेणें हें, खून करणारा मनुष्य क्वचित् निरपराधी ठरतो म्हणून खुनी मनुष्य सुटावयाचाच, किंवा तोटयाचा म्हणून वाटलेला उद्योग क्वचित् फायदेशीर ठरतो म्हणून आज बिनफायद्याचा वाटणारा उद्योग पुढें फायदेशीर होणारच असें समजावयाचें व त्यांत पैसे घालावयाचे यासारखें अविचारीपणाचें आहे.

( ४ ) "आम्ही पाहिलेलें खोटें असें तुम्ही म्हणतां तर आमच्यापेक्षां तुम्ही शहाणे आहांत काय? ( अथवा आम्हांला तुमच्यापेक्षां अक्कल कमी आहे काय?" )

वरील प्रकारचें विधान आक्षेपकानें केलें असतां त्याचा त्यास इष्ट असा थोडाबहुत परिणाम कधीं कधीं होतो. कारण 'हो, आम्ही जास्त शहाणे आहोंत ( अथवा आम्हांला तुमच्यापेक्षां जास्त अक्कल आहे)' असे म्हणण्याइतका धीट असा वादी नेहमींच असतो असें नाहीं.

वरील आक्षेपास यथार्थ उत्तर पुढील होय. टीका करणारा किंवा विरुद्ध विधान करणारा मनुष्य जास्त शहाणा असेल तरच त्याचें म्हणणें खरें असतें, नाहींतर नसतें, असा नियम नाहीं. फार बुद्धिवान् माणसांच्या बोलण्यांत अथवा कृतींतही लहान मोठे दोष असतात. दोष दिसण्यास दोष पाहणारा मनुष्य जास्त बुद्धिमान् असावा लागतो असें नाहीं. तेव्हां 'तुम्ही जास्त शहाणे असाल तरच आमचें म्हणणें अमान्य करणें योग्य आहे' असा वरील आक्षेपांत जो गर्भितार्थ आहे तो योग्य नाहीं असें दिसून येईल. हा नियम चर्चाक्षेत्रांत पाळणें बहुतेक अशक्य आहे व हा नियम मतस्वातंत्र्याच्या तत्त्वाच्या विरुद्ध आहे. हा नियम प्रतिवादी पाळतात असेंही पण दिसून येणार नाहीं. नाना फडणीस, न्यायमूर्ति रानडे, म० गांधी, टिळक इत्यादि व्यक्तींपेक्षां प्रतिवादी जास्त शहाणे नसूनही त्यांच्या कृतींमध्यें दोष काढण्याचा हक्क ते जर बजावतात, तर 'तुम्ही जास्त शहाणे

असाल तरच आमचें म्हणणें अमान्य करा ' असा सवाल त्यांना प्रतिपक्षीयांना करतां येत नाहीं.

वादांच्या निर्णयाचें मुख्य साधन कोण शहाणा आहे हें नसून कोणाचें म्हणणें साधार किंवा वस्तुस्थितीस धरून आहे हें आहे. यास्तव यास अनुसरून विवादित गोष्टींचा निर्णय करावा. त्याचा निर्णय ' तुम्ही जास्त शहाणे काय ' यानें होत नाहीं.

( ५ ) " ह्या समजुती खोटया मानाव्या हा तुमचा आमच्यावर बौद्धिक जुलूम कां ! "

हा कांगावा आहे. आपल्यापेक्षां दुसऱ्यानें जास्त अपराध केला नसतांनाही जुलूम किंवा आततायीपणा केवळ दुसऱ्याकडूनच घडतो आहे अशी ओरड करणें ह्यास कांगावा म्हणतात. वरील प्रकारच्या आक्षेपांत प्रतिपक्ष्यावर जुलमाचा जो आरोप आहे तो खरा नाहीं, म्हणून या आक्षेपास कांगावा असें नांव दिलें आहे. विश्वास ठेवणारे लोक " पिंपळावर मुंजा दिसतो व तो पिंपळाखालून जाणाऱ्यांना लागतो " असें आपल्या समजुतीप्रमाणें लोकांना सांगतात, त्याप्रमाणें दुसऱ्या पक्षाचे लोक ' मुंजा लागणें हा भीतीचा व श्रद्धाळूपणाचा परिणाम आहे ' असें आपल्या समजुतीप्रमाणें सांगतात यांत जुलूम कोठें आहे ! मत प्रतिपादणें ह्यास जुलूम म्हणत नाहींत, कारण प्रत्येक पक्ष तें करतो. दुसऱ्याच्या मर्जीविरुद्ध, आपल्या केवळ शारीरिक बलानें, अथवा भीति दाखवून, एकाद्यास कृति करावयास लावणें यास जुलूम म्हणतात. तशी कृति प्रतिपक्ष्याकडून जर घडत नाहीं तर त्यांच्या प्रतिपादनास जुलूम कां म्हणावयाचें ! विरुद्ध मताचें प्रतिपादन हा जुलूम, तर तो करीत नाहीं कोण ! अशी ओरड करणारे लोक तरी आपल्या मताचें प्रतिपादन करीत नाहींत काय ! तो जर जुलूम नव्हे, तर विरुद्धमतप्रतिपादन तरी जुलूम कसा !

( ६ ) "असें म्हणणारांनीं याचा खोल विचार केला नाहीं."

हें केवळ विधान आहे व पुराव्यावांचून असें म्हणणें हा केवळ आरोप होय. सिद्धांतांतील चूक सिद्ध झाल्यावर हा दोष काढावा. पण चूक

तिऱ्हाइतांस मान्य होण्यापूर्वी असें म्हणणें म्हणजे प्रतिपक्षी खोल विचार न करणारे आहेत अशी त्यांची व्यर्थ निंदा करणें व आपण खोल विचार करणारे आहोंत अशी केवळ प्रौढी मिरविणें होय.

( ७ ) "खोटें असें तुम्ही सिद्ध करा; तोंपर्यंत हें (आमचें म्हणणें) खरें आहे असेंच मानलें पाहिजे." ( प्रस्तावना पहा ).

( ८ ) " कांहीं खोटे हिरे असतात म्हणून खरे हिरे नाहींत असें नाहीं."

आपण जो चमत्कार सांगतो तो खरा आहे हें सिद्ध करण्यास वरील प्रकारचें प्रमाण पुढें केलें जातें. पण त्यानें इष्ट गोष्ट खरोखरीं सिद्ध होत नाहीं. ती खरी असण्याचा संभव आहे एवढेंच वरील नियमावरून म्हणतां येईल. पण ती खोटी असण्याचाही संभव आहे; म्हणून ती खरी मानतां येतच नाहीं. हिरे खरे असूं शकतात यावरून विवक्षित हिरा खरा असें ठरत नाहीं. तो खरा ठरण्यास तो परीक्षेस उतरला पाहिजे. त्याप्रमाणें विवादित विधान ( चमत्कार वगैरे ) खरें ठरण्यास तें सिद्ध केलें पाहिजे. तोंपर्यंत तें असिद्ध अथवा असत्य असेंच मानणें व्यावहारिक व तर्कशास्त्राच्या दृष्टीनें योग्य आहे.

( ९ ) " परिपक्वानुभव ग्राह्य मानला पाहिजे."

यावरून वृद्ध माणसांचीं मतें ग्राह्य मानलीं पाहिजेत असें कांहींचें म्हणणें असतें. मनुष्याचा मेंदू जोपर्यंत चांगला असतो तोंपर्यंत तो विचारक्षम असतो परंतु तो दुर्बल होऊं लागला म्हणजे त्याची विवेक-शक्ति कमी होते; त्यामुळें त्यापुढील अवस्थेंतील मनुष्याचीं मतें ग्राह्य मानतां येत नाहींत. एका प्रख्यात लेखकांना अर्धांगवायूचा विकार झाल्यानंतर, त्यांनीं जन्मभर प्रतिपादिलेलीं कांहीं मतें बदललीं असें नुकतेंच अनुभवास आलें आहे.

( १० ) "निःस्वार्थी संन्याशाला खोटें सांगण्याची जरूरी काय ?"

स्वतःची मालमत्ता असावी यासंबंधानें एकादा संन्यासी पूर्णपणें

निःस्वार्थी असला, तरी पंथ अथवा पक्ष यासंबंधानें तो पूर्णपणें निःस्वार्थी अथवा अभिनिवेशरहित असतो असें नाहीं. शिवाय त्यास भ्रांति होणें अशक्य नाहीं. सांगणारी व्यक्ति निःस्वार्थी संन्यासी म्हणून त्या व्यक्तीचा अनुभव अथवा त्याचें विधान खरें मानावयाचें, तर निरनिराळे धर्म व पंथ यांतील संन्याशांचे परस्परविरोधी अनुभव खरे मानण्याची अनवस्था प्राप्त होईल.

( ११ ) "डॉक्टर आणि वकील स्वतःच्या कामांत दुसऱ्या तज्ज्ञ डॉक्टराची अगर वकिलाची मदत जर घेतात, तर दुसऱ्याचा देहभोग घालविण्यास समर्थ असणाऱ्या साधूंनीं स्वतःचा आजार अथवा स्वतःवरील संकट टाळण्यास डॉक्टर अथवा वकील यांचें साहाय्य घेण्यांत विसंगति कोठें आहे" !

वरील विचारसरणींत दोष हा कीं, ह्यांत जो मूळ आधार घेतला आहे तो चुकीचा आहे. चूक ही कीं, या आधारांत वैद्य (अथवा डॉक्टर) सर्व आजार बरे करूं शकतात व वकील कोणत्याही पक्षकारास खटल्यांत यशस्वी करतात, हें गृहीत धरलें आहे. पण हें अगदीं खोटें आहे. असाध्य रोगांची संख्या फार मोठी आहे (पान ५८ पहा), व रोग्यास निसर्गाचें साहाय्य असल्यावांचून त्यास बरा करण्याचें सामर्थ्य औषधांत नाहीं हें आधुनिक वैद्यशास्त्राचें तत्त्व आहे. त्याचप्रमाणें, वाटेल त्या खटल्यांत यश देण्याचें सामर्थ्य सामान्य राहूं द्या पण केवढ्याही नामांकित वकीलामध्यें नसतें. तसें असतें तर प्रत्येक श्रीमंत रोगी व पक्षकार यशस्वी झाला असता. बरें, वकील किंवा वैद्य तरी दुसऱ्याचें साहाय्य केव्हां घेतो ! नेहमींच्या कामासाठीं नव्हे, तर काम विशेष अवघड असेल तेव्हां, किंवा कालाभाव किंवा आजार वगैरे अडचणींमुळें स्वतःला सवड नसेल तेव्हां. परंतु दुसऱ्यास अनामयता, संतति, संपत्ति इत्यादि देणाऱ्या साधु पुरुषांना वरीलसारखी अडचण असण्याचें कारण काय ? ते असले चमत्कार करतात ते त्यांचा निसर्गावरील अधिकार, अथवा त्यांचा देवदेवतांजवळील वशीला ह्यांच्या साहाय्यानें, असें जर त्यांच्या भक्तांचें म्हणणें आहे, तर ह्या सामर्थ्याचा उपयोग स्वतःचा इसबासारखा त्वग्विकार, मूळव्याधीमुळें होणारा

रक्तस्राव, अथवा दत्तक मुलास होणारा क्षयरोग, यांसारख्या आपत्ति घालविण्याचे कामीं करण्यास त्यांना वकीलवैद्यांच्या वरील अडचणीसारखी अडचण येण्याचें कारण काय? त्या आपत्ति जाऊं नयेत अशी त्यांची इच्छा असते असें म्हणतां येत नाहीं; कारण ते स्वस्थान सोडून या आपत्ति घालविण्यासाठीं वैद्यादीकडे मुद्दाम जातात असें आढळून येतें.

भक्तास सत्पुरुषांच्या सामर्थ्यानें जो फायदा झाला असें सांगण्यांत येतें त्यांतील बराच भाग काल्पनिक असतो, व जो खरा असतो तो निसर्ग अथवा श्रद्धा यामुळें झालेला असतो (भावनेचा आजाराच्या कामीं होणारा उपयोग ३ व ४ प्रकरणांत पहा) अशी आमच्या मतें वस्तुस्थिति आहे. ही समजूत खोटी असून तो परिणाम साधूंच्या कर्तृत्वाचाच असेल तर तेंच कर्तृत्व त्यांना स्वतःच्या कामीं कां उपयोगीं पडूं नये?

(१२) "संशयात्मा विनश्यति असें वचन आहे म्हणून...ह्याविषयीं संशय बाळगणारे लोक स्वहितास मुकतील."

संशयात्मा विनश्यति याचा खरा अर्थ असा दिसतो कीं, इष्ट हेतु साधण्यास खात्रीचा मार्ग उपलब्ध असतां विनाकारण संशय घेऊन जो निष्क्रिय राहतो व करावयाचा उपाय जो करीत नाहीं तो हितास मुकतो. ह्याचा अर्थ हा नव्हे कीं, कोणीं वाटेल तें तत्त्व किंवा वाटेल तो मार्ग सुचविला असतां, तें तत्त्व किंवा तो मार्ग ह्यावर जो विश्वास ठेवीत नाहीं तो नाश पावतो. जगांत अज्ञान टिकलें आहे तें अंधश्रद्धेनें; व ज्ञानाची प्रगति झाली आहे ती चालू पद्धति बरोबर कीं चूक यासंबंधानें विचारी लोकांच्या मनांत संशय आल्यानें. संशयाच्या महत्त्वासंबंधानें विद्वानांची पुढील मतें पहा.

To scepticism we owe that spirit of inquiry, which has reformed every department of knowledge, has chastized the despotism of princes & has diminished the prejudices of the clergy.

Without doubt there will be no inquiry & without inquiry there will be no knowledge.

Scepticism, the very name of which is an abomination to the ignorant, because it disturbs their cherished superstitions.......

—Buckle's "History of civitisation", Chapter VI.

प्राचीन काळीं असलेल्या अज्ञानाच्या स्थितींत आजही असणारे समाज पाहिले, तर त्यांच्या स्थितीचें कारण संशयाचा अभाव हेंच दिसून जर येतें, तर पुराव्याच्या अभावीं एकादी गोष्ट मान्य न करणारांना 'संशयात्मा विनश्यति' हें तत्व सांगणें म्हणजे बागुलबोवा दाखवून भिवविण्यासारखें आहे.

पुरेसा पुरावा नसतांना दोन अथवा अनेक पक्षांपैकीं एक पक्ष स्वीकारणें हें स्वतःस सदाशिवराव भाऊ पेशवे म्हणविणाऱ्या अनेक इसमांविषयीं शंका धरणाऱ्या पार्वतीबाईनें किंवा नलरूपधारी देवांना पाहून संशयांत पडलेल्या दमयंतीनें पतित्वाचा हक्क सांगणारांपैकीं कोणातरी एकास स्वीकारण्याइतकेंच धोक्याचें नव्हे काय !

( १३ ) "आम्ही छातीठोकपणें सांगतों कीं, आमचें मत खरें आहे."

खरें "छातिठोक सांगणें" हें कीं, सांगणारानें तिऱ्हाइत पंचांकडून आपल्या विधानास मान्यता मिळविण्याची हमी घेतली पाहिजे, व मान्यता न मिळाल्यास कांहीं तरी दंड देण्याची तयारी जाहीर केली पाहिजे. तसें जोंपर्यंत केलें नाहीं तोंपर्यंत हें म्हणणें केवळ 'दमबाजी' या सदरांत येतें. कारण अशी जबाबदारी न घेतां कोणासही असें विधान करतां येण्यासारखें आहे; व बेजबाबदार लोक हें विधान करतात हें आपणांस माहीतही आहे. पंचांकडून आपल्या विधानास मान्यता मिळविण्याची हमी न घेतां केवळ वरील प्रकारच्या विधानानें जें आपला पक्ष खरा असें ठरवूं पाहतात त्यांनीं विचार करावा कीं, जो पक्ष अथवा पंथ त्यांना असत्य किंवा भ्रममूलक वाटतो त्याचे अनुयायी असें विधान करूं शकतील कीं नाहीं ! कांहीं भाविक ख्रिस्ती, भाविक मुसलमान, भाविक जैन, भाविक लिंगाईत, भाविक वैष्णव "आम्ही छातिठोकपणें सांगतों कीं आमचाच धर्म खरा आहे" असें विधान करतात, किंवा करूं शकतील कीं नाहीं ! असें विधान

कोणीं केलें व तें मत कितीही प्रामाणिक असलें,तरी केवळ ह्या विधानामुळें त्या मताची सत्यता जशी सिद्ध होत नाहीं, तशी तिऱ्हाईत पंचांपुढें सिद्धता देण्याची व ती पंचांनीं अमान्य केल्यास दंड देण्याची ज्यांनीं तयारी दर्शविली नाहीं त्यांच्या वरील प्रकारच्या विधानानें त्यांच्या पक्षाची सिद्धता होत नाहीं. तशी तयारी न दाखवितां असें विधान करणें ही केवळ वल्गना होय.

---

# कांहीं लोकभ्रम व त्यांसंबंधानें वस्तुस्थिति—

## प्रकरणें ८–१५.

## प्रकरण ८ वें.

## मृतात्म्यांशीं संभाषण.

प्लँशेट, टेबल अथवा स्वयंलेखन (automatic writing) यांचे द्वारें ज ज्ञान मिळतें तें मृतात्म्याकडूनच प्राप्त होतें, अशी जी कांहींची समजूत आहे, तिच्यांत विशेष तथ्य आहे असें दिसत नाहीं. याविषयीं खुलासाः—

### व्यक्ति अमुकच याची खरी कसोटी.

कोणतीही व्यक्ति, ती अमूकच व्यक्ति आहे, हें आपण त्या व्यक्तीच्या इतरांस साधारण असणाऱ्या लक्षणांवरून न ओळखतां, असाधारण लक्षणांवरून ओळखतों. मृतात्म्याप्रमाणें सांकेतिक पद्धतीनें ( 'होय उत्तर असेल तर टेबलाचे अमुक ठोके द्या' इ० ) संभाषण करणाऱ्या अदृश्य अशा व्यक्तीच्या अनन्यत्वाचें लक्षण, त्या व्यक्तीचें असाधारण ज्ञान हेंच होय. अशा प्रकारचें ज्ञान मृतात्म्यांकडून मिळणाऱ्या माहितींत आढळून येत नाहीं. संदेशांत ज्या गोष्टी येतात त्या मध्यस्थास किंवा शेजारच्या गृहस्थांस माहीत असलेल्या अथवा ज्यांची मध्यस्थास अनुमानानें थोडीबहुत कल्पना करतां येईल, अशाच बहुतांशीं असतात. ज्या गोष्टी फक्त मृतात्म्यास

माहीत व ज्या गोष्टींची मध्यस्थास कल्पनाही करतां येणार नाहीं, अशा गोष्टी संदेशावरून हमखास समजतात यास पुरावा नाहीं; उदा०, लोकमान्यांचा आत्मा संदेश देतो असें म्हणतात, त्या वेळीं मध्यस्थास जर खाल्डियन भाषा अथवा उच्च गणित येत नसेल, तर त्या भाषेसंबंधानें अथवा उच्च गणितासंबंधानें विचारलेल्या अवघड प्रश्नांस उत्तर ( उत्तर थोडक्यांत देण्यासारखें असलें तरी ) मिळत नाहींच; पण अगदीं साध्या प्रश्नासही यथार्थ उत्तर मिळत नाहीं असें केसरी ऑफिसांत श्री. ऋषि यांनीं केलेल्या प्रयोगांत आढळून आल्याचें सुप्रसिद्ध आहे. ( १०-७-३४ च्या केसरींतील श्री० न. चिं. केळकर यांचा लेख पहा. )

या कसोटीवांचून मृतात्मा लोकमान्यांचा असें समजणें हें तांबडी पगडी, काळा वर्ण अथवा हातांत सोडगा एवढ्याच ( अर्थात् कांहीं इतर व्यक्तींनाही सामान्य असणाऱ्या) लक्षणांवरून, एकाद्या गृहस्थास लोकमान्य समजण्यासारखें चुकीचें आहे.

मध्यस्थांस माहीत नसलेल्या गोष्टी मध्यस्थांनीं सांगितल्या आहेत अथवा त्यांनीं त्यांच्या शक्तीबाहेरच्या गोष्टी केल्या आहेत अशीं कांहीं उदाहरणें सांगण्यांत येतात; परंतु त्यांपैकीं बरीच विश्वसनीय नसतात. जीं विश्वसनीय असतात तीं मध्यस्थास ज्ञान मृतात्म्याकडूनच होतें याचें निःसंदेह प्रमाण मानतां येत नाहीं. मध्यस्थांस ' माहीत नसलेल्या गोष्टी ' त्यांनीं सांगितल्या, म्हणून त्यांचें ज्ञान त्यांना मृतात्म्याकडूनच प्राप्त झालें असलें पाहिजे असें मानण्याकडे कांहींचा कल कां होतो याचें कारण त्यांनीं पुढील गोष्टी लक्षांत घेतलेल्या नसतात हें होय.

## गैरसमजाचीं कारणें.

( अ ) मध्यस्थास काय गोष्टी माहीत आहेत व काय माहीत नाहींत याबद्दल त्यांनीं पूर्ण चौकशी केलेली नसते. विशेषतः ज्या गोष्टी आपणांस माहीत नाहींत असें मध्यस्थ म्हणतो त्या त्यानें पूर्वी कधीं तरी ऐकल्या असल्यानें त्याच्या अधस्तलस्थ ( Sub-conscious ) मनामध्यें अथवा अंतर्मनामध्यें त्या असण्याचा संभव आहे कीं नाहीं याचा पूर्ण शोध केलेला नसतो.

( ब ) मनुष्य विशिष्ट प्रसंगीं आपल्या नेहमींच्या शक्तीबाहेर काम करूं शकतो याविषयीं पुष्कळांना पुरीशी माहिती नसते. स्वप्नामध्यें आपण एकादें काल्पनिक पुस्तक वाचतों किंवा एखाद्या विद्वानाचें व्याख्यान ऐकतों, त्यावेळीं जागें झाल्यावर वाचलेला अथवा ऐकलेला कांहीं मजकूर आपणांस चांगला आठवतोही. हा मजकूर त्या पुस्तकास किंवा त्या विद्वानास शोभेसा—अर्थात् सकृद्दर्शनीं अन्य व्यक्तीनें रचलेल्यासारखा—असतो. तथापि हा मजकूर अथवा प्रबंध दुसऱ्याची कृति नसून आपलीच कृति अथवा निर्मिति असते, हें उघड आहे. ही कृति कांहीं प्रसंगीं आपल्या नेहमींच्या कृतीपेक्षां श्रेष्ठ असते, हें कसें? याचें कारण हेंच कीं, विशेष प्रसंगीं मनाची एकाग्रता किंवा मेंदूचें उद्दीपन झाल्यामुळें आपला मेंदू नेहमींपेक्षां जास्त योग्यतेचें काम करूं शकतो. Somnambulist म्हणजे निद्राभ्रमी मनुष्य, तसेंच hypnotised म्हणजे मोहनिद्रावश मनुष्य कधीं कधीं नेहमींपेक्षां जास्त धीटपणा, हुशारी, अथवा बुद्धिमत्ता दाखवूं शकतो हा अनुभव आहेच. (यासंबंधानें हडसनसाहेबांचें Psychic Phenomena या पुस्तकाचें तिसरें प्रकरण पहा.) म्हणून, बहुतेक अशाच स्थितींत असलेल्या मध्यस्थास स्वतःच्या शक्तीनेंच दुसऱ्या-सारखी एकादी कविता रचणें किंवा कांहीं वेळ भाषण करणें हें शक्य आहे. अशा कृतीवरून रचना करणारी व्यक्ति मध्यस्थाहून अन्य ( मृतात्मा ) आहे असें ठरत नाहीं. तें तसें ठरण्यास ती कृति मध्यस्थास सर्वस्वीं अशक्य अशीच असली पाहिजे. मध्यस्थास ( अथवा कोणाही व्यक्तीस ) आपल्या नेहमींच्या बौद्धिक पातळीच्या वर थोडें जातां आलें, तरी त्यास मुळींच अज्ञात अशा भाषाविषयक अथवा शास्त्रीय गोष्टी सांगता येणें शक्य नाहीं, व तसें मध्यस्थ सांगतो असें दिसत नाहीं. तसें होत असल्यास प्रत्यक्ष दाखवावें, अशी आमची प्लॅन्शेटच्या पुरस्कर्त्यांना विनंती आहे व ह्या मुद्यावरच आमचा विशेष भर आहे.

( क ) शेजारच्या मनुष्यांचे मनाचा मध्यस्थाचे मनावर परिणाम ( Telepathy ) होतो ही गोष्ट लक्षांत घेतलेली नसते. एका मनुष्याचे विचाराचा थोडाबहुत परिणाम क्वचित् प्रसंगीं शेजारच्या माण-सांचे मनावर होत असल्यामुळें मध्यस्थाजवळ बसणाऱ्या लोकांच्या कल्प-

नांचा कधीं कधीं मध्यस्थाच्या मनावर परिणाम होतो. दोन मेंदू अथवा दोन मनें यांमध्यें कधीं कधीं संभाषणावांचून कल्पनाविनिमय अल्प प्रमाणांत होऊं शकतो असें मानण्यास थोडासा (पुष्कळ नव्हे) आधार आहे. यासंबंधानें 'Thought Transference' by Podmore, 'Mental Radio' by Upton Sinclair. ही पुस्तकें व Scientific American यांत १९३३-३४ सालीं आलेले लेख पाहावे.

( ड ) माहिती नसलेल्या माणसानें दिलेलीं उत्तरें काकतालीय न्यायानें क्वचित् जुळतात. ( प्रकरण ११ पाहा.)

अद्‌भुत वाटणारी जी माहिती मध्यस्थाकडून कधीं कधीं मिळते तिची उपपत्ति वरील कारणांवरून लागण्यासारखी आहे. म्हणून मध्यस्थाच्या कांहीं यथार्थ उत्तरांवरून तें मृतात्म्याचेंच ज्ञान असावें अशी खात्री होत नाहीं. वरील गोष्टी लक्षांत घेतां असें दिसून येईल कीं, जी माहिती मध्यस्थाजवळ असलेल्या कोणाही माणसास नाहीं व जी मध्यस्थास कल्पनेनेंही मिळण्यासारखी नाहीं पण जी मृतात्म्यास आहे (हीस आपण '**मृतात्म्याचें असाधारण ज्ञान**' म्हणूं या) ती मध्यस्थानें सांगणें हा, त्यास मृतात्म्याकडूनच प्रेरणा होत आहे, याचा **खरा पुरावा** होईल. तसा पुरावा मिळत असल्याचें दिसत नाहीं.

## संदेशांची उत्पत्ति.

मध्यस्थाचे द्वारें संदेश कसे येतात, याविषयीं शास्त्रज्ञांना मान्य अशी कल्पना पुढीलप्रमाणें आहे. ही कल्पना समजण्यास मनाचें स्वरूप व एक शारीरिक अथवा मानसिक धर्म,याविषयीं पुढील माहिती असणें इष्ट आहे.

( अ ) **मनाचें स्वरूप**—मन हें एखाद्या श्रीमंताच्या किंवा जहागिरदाराच्या अनेकमजली हवेलीसारखें आहे. अशा हवेलीच्या निरनिराळ्या मजल्यांत अनेक वस्तु असतात व नोकरांकडून केलीं जाणारीं अनेक कामें चालू असतात. या हवेलीच्या सगळ्यांत वरच्या मजल्यांत मालक राहतो, असें समजा. अशा स्थितींत वरच्या मजल्यांत चालणाऱ्या क्रियांचीच त्यास विशेष जाणीव असणार. बाकीच्या मजल्यांत काय ठेवलें आहे व काय चाललें आहे त्यांशीं मालकाचा प्रत्यक्ष

अथवा अप्रत्यक्ष संबंध असूनही त्याची मालकास अगदीं सामान्य व अंधुक कल्पना असते, पण पूर्ण जाणीव नेहमीं नसते. या उदाहरणांत मालक व हवेली यांचा जो संबंध तसाच कांहीं अंशीं आपण अथवा आत्मा व मन यांचा आहे.* मनरूपी हवेलींतील मालकाच्या विशेष वापराचा जो भाग त्यास बाह्य मन व हवेलीचे इतर भाग यास अधस्तलस्थ अथवा अंतर्मन अशीं मानसशास्त्रांत नांवें आहेत.× बाह्य मनांतील कल्पनांची जाणीव आत्म्यास असते व त्यांतील व्यापार त्याचे इच्छेनुरूप चाललेले असतात; पण अंतर्मनाविषयीं स्थिति याहून निराळी असते. आपण पूर्वीं पाहिलेल्या तथापि सकृद्दर्शनीं विस्मृत एवढेंच नव्हे पण अननुभूत अशा वाटणाऱ्या अनेक गोष्टी आणि विचार व बरेच आनुवंशिक संस्कार आपल्या अंतर्मनांत सांठवलेले असतात. ह्यांची जाणीव सामान्य जागृत अवस्थेंत आपणांस नसते. म्हणूनच कांहीं गोष्टी अंतर्मनांत संग्रहीत असूनही त्या 'आपणांस माहीत नाहींत' असें आपण अज्ञानानें म्हणतों. परंतु पूर्वींचा ठसा स्पष्ट होईल असें उद्दीपन मनास मिळालें, म्हणजे ह्या विस्मृत गोष्टींची आपणास आठवण होते (जणू काय कोणी सांगितल्यावर आपण मनोरूपी हवेलीच्या त्या दालनांत जाऊन तेथें काय आहे तें पाहून येतो). असें उद्दीपन स्वप्नांत, मन एकाग्र झालें असतां, मोहनिद्रेंत किंवा स्वयं-लेखनाचे वेळीं सूचना ( suggestion ) दिलेली असतां, किंवा एखाद्या विकारांत, मेंदूस मिळतें, व त्यामुळें माहीत नाहींत अशा वाटणाऱ्या

---

* कांहीं शास्त्रज्ञ मनास समुद्राची उपमा देतात. त्यांच्या मतें बाह्य मन हा त्या समुद्राचा केवळ पृष्ठभाग आहे, व समुद्राचा अदृश्य भाग दृश्य भागाच्या मानानें जसा फारच मोठा तशी अंतर्मनाची व्याप्ति बाह्य मनाचें मानानें फार मोठी आहे व त्यामध्यें समुद्राच्या अंतर्भागाप्रमाणें अगणित वस्तूंचा ( सर्व पूर्व संस्कारांचाच नव्हे तर पूर्वजांवरील संस्कारांचा) अगाध संग्रह आहे.

× सोयीसाठीं मनाचे दोन भाग मानले आहेत; पण मनें दोन नसून एकच आहे असें आधुनिक शास्त्राचें मत आहे हें विसरतां कामा नये.

( परंतु वास्तविकपणें पूर्वी परिचित असलेल्या ) गोष्टींची स्मृति जागृत होते, व त्या कशा माहीत झाल्या याची बाह्य मनास जाणीव नसल्यानें, त्या दुसऱ्या कोणा व्यक्तीनें आपल्या मनांत घातल्या आहेत असा भास होतो. सकृद्दर्शनीं अज्ञात अशा गोष्टी मध्यस्थाचे मनांत येण्याचें अथवा त्यास माहीत होण्याचें कारण हें आहे.

**संचार व स्फूर्ति यांसंबंधाच्या बऱ्याच चमत्कारांचें उत्पत्तिस्थान कल्पनाशक्ति व अंतर्मन** हीं होत, असें शास्त्रज्ञांचें मत आहे. अंतर्मनासंबंधानें प्रख्यात मानसशास्त्रज्ञ युंग अथवा जंग ( मानसशास्त्रांत ज्यांनीं क्रांति घडवून आणली आहे त्यांमध्यें फ्रूड अथवा फ्राइट्, युंग, व ॲडलर ह्यांस अग्रगण्य समजतात ) यांचें म्हणणें पुढीलप्रमाणें आहे:—

The unconscious is for me not only the receptacle of all unclean spirits and other odious legacies of dead situations.........it is the one ever living and creative seed ground which manifests itself through ancient symbolical images.

—" Secret Ways of the Mind."

अंतर्मनाच्या साहाय्यानें आभास किती पूर्णपणें उत्पन्न होतो यासंबंधानें हडसनसाहेबांच्या The Law of Psychic Phenomena या पुस्तकांतील पुढील हकीगत पहा ( प्रकरण ३, पानें ३२-३४ ).

" प्रोफेसर कार्पेंटर यांनीं सुशिक्षित स्त्रीपुरुषांच्या सभेंत एका पदवीधर गृहस्थास ( त्यांचा उल्लेख आपण ' सी ' या संज्ञेनें करूं या ) हिप्नोटाइझ केलें व विचारलें 'सॉक्रेटिसच्या मृतात्म्याला भेटण्याची तुमची इच्छा आहे काय?' होय असें उत्तर येतांच ' हे पहा सॉक्रेटिस येथें कोपऱ्यांत उभे आहेत ' असें म्हणून त्या कोपऱ्याकडे बोट केलें. लागलीच ' सी ' च्या चेहऱ्यावर आदरभावना दिसूं लागली व त्यांनीं पुढें होऊन सॉक्रेटिसला ( अर्थात् त्या काल्पनिक व्यक्तीला ) आदरपूर्वक प्रणाम करून बसण्यासाठीं खुर्ची दिली. ' सॉक्रेटिस तुमच्या वाटेल त्या प्रश्नांस उत्तर द्यावयास तयार आहेत ' असें प्रो. कार्पेंटर यांनीं ' सी 'ना सांगताच,

त्यांनीं प्रथम बिचकत व भीतभीत प्रश्न विचारण्यास प्रारंभ केला, व कांहीं वेळानें ते निर्धास्तपणानें प्रश्न विचारूं लागले. प्रश्नास सॉक्रेटीसकडून जें उत्तर येई ते 'सी' उच्चारून दाखवीत असत. ह्याप्रमाणें दोन तास प्रश्नोत्तरें झालीं. सॉक्रेटीसच्या उत्तरांची भाषा त्या तत्त्ववेत्त्यास पूर्णपणें साजेशीच होती. हें संभाषण चालू असतां सर्व सभा चित्राप्रमाणें स्तब्ध होती व त्यांपैकीं कांहींना तें संभाषण इतकें खरें वाटलें कीं, ते मृतागमन-वादी* नसूनही, 'सी' हा गृहस्थ खरोखरच सॉक्रेटिस किंवा त्यासारखा कोणी तत्त्ववेत्ता याच्या मृतात्म्याशीं बोलत आहे असें त्यांचें मत झालें.

यापुढील बैठकींत निरनिराळे मृतात्मे प्रो. कार्पेंटर यांनीं 'सी' पुढें (हे पहा अमुक...आले आहेत असें 'सी'च्या पुढें केवळ विधान करून) बोलावले. आश्चर्याची गोष्ट ही कीं, या भिन्न मृतात्म्यांचे दर्जा-प्रमाणें 'सी'ची वागणूक व मृतात्म्याकडून मिळणाऱ्या उत्तरांची भाषा व विवेचनपद्धति यांत फरक होई ! हें सर्व संभाषण टिपून घेऊन कोणीं छापलें असतें तर तो अध्यात्मविद्येवरील एक उत्तमपैकीं ग्रंथ झाला असता."

समाधिस्थितींत कांहीं लोक वेदान्तविषयक माहिती उत्तम रीतीनें बोलतात असा जो चमत्कार दृष्टीस पडतो त्याची उपपत्ति वरील माहिती-वरून चांगली लागेल.

**अंतर्मनाच्या सामर्थ्याचें एक आश्चर्यकारक उदाहरण—**

लंडन येथील फिजिकल (पदार्थविज्ञानशास्त्राच्या) सोसायटीचे अध्यक्ष प्रोफेसर बॉइस यांना एका रात्रीं एका यंत्राबद्दल स्वप्न पडलें. सकाळीं उठतांक्षणींच त्यांनीं स्वप्नाची नोंद करून त्याप्रमाणें यंत्र तयार करण्यास प्रारंभ केला. हें यंत्र, घरांत जळणासाठीं वगैरे खर्च होणारा गॅस मोजण्याचें मीटर होतें. हें यंत्र पूर्वीच्या यंत्राहून इतकें उत्तम आहे कीं, पूर्वी

---

* मृतांच्या आत्म्याचें भूलोकीं आगमन होतें व ते प्लॅन्चेट वगैरे साधनांनीं आपले विचार प्रकट करतात असें जे प्रतिपादतात त्यांना मृतागमन-वादी ही संज्ञा लावली आहे.

दरवर्षास अशा यंत्रासाठीं जें तीन लाख गॅलन पाणी लागत असे तें या यंत्राला अवघें एक गॅलन लागतें ! येथें प्रश्न असा कीं, ही यंत्राची कल्पना डोक्यांत आली कोठून ? यास उत्तरें दोनः—पहिलें, ही कल्पना कोणा दिवंगत शास्त्रज्ञाच्या आत्म्यानें डोक्यांत घातली. दुसरें उत्तर, आपलीं इंद्रियें आपण खाल्लेल्या अन्नापासून रक्त, मांस, मज्जा इत्यादि पदार्थ आपल्या जाणीवेवांचून बनवितात, त्याप्रमाणें आपलें अधस्तलस्थ मन आपल्या पूर्व ज्ञानापासून नवीन ज्ञान व कल्पना बनवितें, व या धर्मास अनुसरून प्रो. बॉइस यांच्या अधस्तलस्थ मतानें ह्या यंत्राची कल्पना बसविली. पहिली कल्पना ग्राह्य मानली, तर शास्त्रीय कल्पनांचा जगामध्यें जो क्रमाक्रमानें उदय दिसतो त्याऐवजीं तो एकाएकीं धरणीकंपाप्रमाणें दिसून आला असता. उदाहरणार्थ, मधुमेह विकाराचें कारण स्वादुपिंडाच्या ( pancreas च्या ) विशिष्ट भागाचा क्षय होय हें ज्ञान एकाद्या बाईच्या किंवा शेतकऱ्याच्या द्वारेंही एकाद्या शास्त्रज्ञ आत्म्यानें जगांत प्रकट केलें असतें. पण हजारों नवीन शोधांपैकीं १।२ शोधही त्या विषयाचा अभ्यास न करणाऱ्या पण एरव्हीं साक्षर एवढेंच नव्हे पण विद्वान असलेल्या लोकांचेद्वारा मृतांच्या आत्म्यांनीं प्रकट केल्याचें दिसत नाहीं. निरनिराळ्या व्यक्तींत ज्ञानसंपादनासंबंधानें फरक दिसतो तो हा कीं, जी गोष्ट एका व्यक्तीस वीस वर्षांच्या विचारानें साध्य होते ती दुसरीस एका वर्षाच्या विचारानें साध्य होते. पण हा फरक स्मरणशक्तींतील फरकाप्रमाणें विचारशक्तींत असणाऱ्या फरकास अनुसरून नैसर्गिक आहे. त्याच्या उपपत्तीसाठीं मृतात्म्याच्या साहाय्याच्या कल्पनेची जरूरी नाहीं. असले चमत्कार मृतात्मे घडवीत असते, तर भास्कराचार्यांच्या लीलावतीसारखे ग्रंथ एखाद्या अल्पशिक्षितानें लिहिले असते. वेदान्तादि विषयांवरील ग्रंथ किंवा एखादें काव्य मृतात्म्याच्या स्फूर्तीमुळें झालेल्या अद्भुत ज्ञानाचें उदाहरणें म्हणून सांगण्यांत येतें. परंतु अशा ग्रंथास विशिष्ट शास्त्रीय ग्रंथांचें ज्ञान किंवा गहनविचारशक्ति हीं लागत नसून सामान्य उपलब्ध ग्रंथांचें वाचन व थोडीबहुत कल्पनाशक्ति एवढया गोष्टी पुरेशा असल्यामुळें, हीं उदाहरणें परात्म्याकडून होणाऱ्या स्फूर्तीची होत नाहींत. ज्यानें व्याकरण वाचलें नाहीं अशा पण व्युत्पन्न म्हणजे काव्यनाटकादि ग्रंथ पढ-

लेल्या विद्वानानें पाणिनीच्या सारखा व्याकरणग्रंथ अथवा अशा ग्रंथावरील टीका लिहिल्याचीं उदाहरणें जर बरींच आढळतील, तर तो मृतात्म्याकडून मिळणाऱ्या स्फूर्तीचा पुरावा होईल. पण तशीं उदाहरणें बहुतेक नाहींत.

अशा कांहीं उदाहरणांत जी अद्भुत शक्ति दिसते ती त्या व्यक्तीची नसून दुसऱ्या एकाद्या मृतात्म्याची असावी असें जें कांहींना वाटतें त्याचें कारण त्यांना एरव्हीं या अद्भुत शक्तीची उपपत्ति काय लावावी ही अडचण पडतें हें होय. पण या अडचणीसाठीं मृतात्म्यांच्या कल्पनेकडे जाण्याचें कारण नाहीं. मुलीला तिसऱ्या वर्षी रजोदर्शन, दहाव्या वर्षी गर्भधारणा, दहा वर्षांच्या मुलामध्यें १६ वर्षांच्या मनुष्याचीं लक्षणें दिसणें, गोंदूचा गोविंदा' होणें (या सर्व चमत्कारास आधुनिक शास्त्रीयग्रंथांत आधार आहेत ) हे शारीरिक चमत्कार निसर्गरूपी यंत्राच्या चाकावरील ब्रेक ढिलें पडल्यामुळें अथवा अशाच कांहीं कारणानें जर होतात, तर बौद्धिक गोष्टींत असेंच चमत्कार स्वाभाविक कारणांनीं होणें शक्य आहे. गणितशास्त्राच्या ज्या भागाचें आकलन सामान्य मनुष्यास सर्व जन्मांत व्हावयाचें नाहीं त्याच्या दसपट भागाचें आकलन दहापांच वर्षांत करणाऱ्या सीनियर रँग्लरचें बौद्धिक सामर्थ्य जर नैसर्गिक, तर काव्यादि कल्पनामय ग्रंथांची रचना अल्पकाळांत करणाऱ्या व्यक्तीचें सामर्थ्य स्वतःसिद्ध नसून तें अन्यप्राप्त आहे असें मानण्यास कारण काय ?

येणेंप्रमाणें, मनाचें स्वरूप व मानसिक चमत्कार यांसंबंधानें वस्तुस्थिति आहे.

( ब ) **कृतींत रूपांतर पावण्याचा कल्पनांचा धर्म**—कृतींत रूपांतर पावण्याचा धर्म आपल्या सर्व विचारांत व कल्पनांत असतो. ह्यासंबंधानें पुढील प्रयोग ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. दोऱ्यास एकादी जड वस्तु लंबकाप्रमाणें बांधून दोरा हातांत धरावा. नंतर लंबक विवक्षित दिशेनें हलतो आहे अशी कल्पना करावी म्हणजे कांहीं वेळानें तो तसा हलूं लागेल. थोड्या वेळानें ही कल्पना बदलून, लंबक निराळ्या दिशेनें हलतो आहे अशी कल्पना करावी. म्हणजे थोड्या वेळानें तो तसा हलत आहे असें दिसेल. या हालचालीचें कारण अर्थात् आपल्या कल्पनेचा आपल्या स्नायूंवर आपोआप होणारा परिणाम हें होय.

स्नायूंचे हालचालींवर कल्पनांचा आपोआप होणारा जो परिणाम वर सांगितला आहे त्यामुळें मध्यस्थ, जाणिवेवांचून अथवा अबुद्धिपुरःसर, प्लँशेट अथवा अन्य साधन यास चालना देऊन त्याकडून उत्तर दर्शवितो. प्लँशेट अथवा पोन्सिल हलण्याचें सामान्य कारण, मेंदूकडून स्नायूंस मिळणारी चालना, हेंच होय.

जें मध्यस्थानें कधींच ऐकलें अथवा पाहिलें नाहीं तें त्यास सांगतां येत नाहीं व सर्व उत्तरें मध्यस्थाच्या ज्ञानास अनुरूप अशींच असतात, यावरून वरील उपपत्तीची यथार्थता कळून येणारी आहे.

मध्यस्थास जें खरोखरींच माहीत नसतें त्याविषयीं मध्यस्थाकडून कांहीं सांगितलें गेलें, तर तें बहुतेक खोटें ठरतें. तें क्वचित् प्रसंगीं खरें ठरतें त्याचीं कारणें १०३-४ पानांत क ब ड या पॅऱ्यांत दिलीं आहेत.

मध्यस्थांकडून येणारीं उत्तरें मृतात्म्यांकडून आलेलीं असतात ही कल्पना व वरील कल्पना यापैकीं कोणती वस्तुस्थितीशीं बहुतांशीं जुळते, ह्याचा विचार करावा म्हणजे वरील कल्पनाच चांगली जुळते असें दिसून येईल.

## मृतात्म्यांशीं संभाषण होतें असें प्रतिपादणाऱ्यांना आव्हान

मृतात्मे खरोखरींच ज्ञानसंक्रामण करूं शकत असतील, तर मृतात्म्यांच्या आगमनाचा निःसंशय गमक आमच्या मतें पुढील अनुभव होईल. तो दाखवावा असें पुरस्कर्त्यांस आव्हान आहे.

लेखनाची प्रेरणा जर मृतात्म्याकडून मिळत असेल तर मध्यस्थास अथवा जवळच्या माणसाना ज्या प्रश्नाचीं उत्तरें माहीत असणें शक्य कोटीच्या पलीकडे आहे, पण जीं मृतात्म्यास माहीत आहेत तीं मध्यस्थास देतां आलीं पाहिजेत. उदाहरणार्थ, ज्या १२।१४ वर्षांच्या मध्यस्थामार्फत त्याचे कोणी कैलासवासी डॉक्टर नातेवाईक बोलूं शकतात, अशा मध्यस्थानें कै० डॉक्टरांच्या आत्म्याच्या संदेशावरून डॉक्टरांना अवश्य माहीत असणाऱ्या पण सामान्य मनुष्यास माहीत नसणाऱ्या अशा विचारलेल्या औषधांचीं इंग्रजी किंवा लॅटिन नांवें सांगावीं. मध्यस्थास ज्ञात व अज्ञात गोष्टी कोणत्या याबद्दल मागाहून

वाद नको म्हणून मध्यस्थ कोण व मृतात्मा कोणाचा हें कळल्यावर, अशा प्रकारचे प्रश्न कोणत्या जातीचे, हें आम्ही आधीं सांगू, व ह्यांचीं उत्तरें मृतात्म्यास असणें शक्य आहे अशी मान्यता समंजस माणसांनीं दिल्यावरच हे प्रश्न मध्यस्थामार्फत विचारूं. प्रश्नांचीं उत्तरें बरोबर येतील तर मृतात्माच संभाषण करीत आहे, हें सिद्ध होईल. उत्तर न आल्यास अथवा भलतें आल्यास, उत्तरें दुसऱ्या आत्म्याकडून न येतां मध्यस्थाचे मेंदूतून येतात हें सिद्ध होईल. अशा प्रसंगीं फ्रॅन्शेटचे पुरस्कर्ते असें म्हणतात कीं, "मृतात्म्या कोणी तोतया आहे". यासंबंधानें पुरस्कर्त्यांना अशी तजवीज करतां येईल कीं, आधीं, वाटेल त्या प्रकारें, मृतात्मा 'अमक्याचाच' अशी त्यांनीं आपली खात्री करून घ्यावी, व तशी त्यांची खात्री झाल्यावरच आम्ही प्रश्न विचारूं. Test question अथवा कसोटीचा प्रश्न विचारीपर्यंत "मृतात्मा अस्सल" व भलतें उत्तर आलें कीं, "तो तोतया" असें जर पुरस्कर्ते म्हणूं लागले, तर या विवादित गोष्टीचा निकाल लागणें कधींच शक्य नाहीं. कारण ही सबब केव्हांही कोणासही पुढें आणतां येईल अशी आहे. अशा सबबीची अडचण येऊं नये यास्तव मृतात्मा कोणाचा याबद्दल पुरस्कर्त्यांनीं आपली खात्री करून घेऊनच तसें आश्वासन देणें जरूर आहे. तसें आश्वासन दिल्यावरच आम्ही प्रश्न विचारूं.

मृतात्मे येतात याबद्दल देतां येण्यासारखा दुसरा एक पुरावा—मृतात्मे बैठकीच्या जागीं येऊं शकतात, तसे ते शेजारच्या खोलींतही जाऊं शकतील. अशा एका खोलींत फळ्यावर मोठ्या अक्षरांनीं एक संख्या आम्ही लिहितों, ती मृतात्म्यांच्या साहाय्यानें मध्यस्थानें सांगावी. हें दाखविण्यास ह्या मताचे कोणी पुरस्कर्ते तयार आहेत काय ?

## आव्हानासंबंधानें कांहीं आक्षेप व त्यांस उत्तर.

वरीलसारख्या मागणीसंबंधानें फ्रॅन्शेटचे पुरस्कर्त्यांकडून पुढील आक्षेप येतातः—"मृतात्मे कोणाचे नोकर आहेत काय ? त्यांनीं तुमच्या प्रश्नांचीं उत्तरें कां द्यावीं ? त्यांना जास्त महत्त्वाची कामें असतात म्हणून असल्या क्षुल्लक गोष्टींत त्यांनीं वेळ कां घालवावा ? त्यांच्याविषयीं शंका घेणें त्यांना अपमानास्पद वाटणें साहजिक नाहीं काय ?...इ०."

यांस उत्तर—

मृतात्मे नोकर नाहींत हें अगदीं कबूल. मृतात्मे बोलावल्यावर येतात व आपल्याशीं संभाषण करतात, म्हणून आपणच (प्लॅन्शेटचे पुरस्कर्ते) आम्हांस सांगतां व ह्याबद्दल वारंवार ग्वाही देतां. सर ऑलिव्हर लॉजसारखे कांहीं शास्त्रज्ञ ही गोष्ट खरी मानतात म्हणून ती आम्ही मानावी असें आपलें म्हणणें असेल, तर वादच संपला. अशा अंधश्रद्धेमुळेंच असत्य टिकतें हें ज्ञानाचा इतिहास सांगतो हें आपणांस माहीत आहे. दुसऱ्यांस जें खरें वाटतें तें मानावयाचें, तर ऑलिव्हर लॉज साहेबांस खिस्ती धर्म श्रेष्ठ वाटतो म्हणून, अथवा लॉर्ड हॅडले यास मुसलमानी धर्म खरा वाटतो म्हणून, तसें सर्वांनीं मानलें पाहिजे, असें होईल. तसें मानण्यास सर्वांनीं तयार व्हावें असें आपलें म्हणणें आहे काय ? कोणी पंडित एकादी गोष्ट मानतात म्हणून ती खरी असली पाहिजे, असा नियम केला, तर तो आपणांसही असा नडेल कीं, मृतात्मे संभाषण करितात ही गोष्ट खोटी मानणारे पुष्कळ शास्त्रज्ञ आहेत, म्हणून ती खोटी असली पाहिजे असें आपणांस मान्य करावें लागेल. मोठमोठ्या शास्त्रज्ञांजवळ अनेक वर्षें राहून ज्यांनीं त्यांची आपल्या चमत्कारांबद्दल खात्री केली आहे परंतु जे पुढें लबाडी करतांना पकडले गेले आहेत, एवढेंच नव्हे तर ज्यांनीं फसविल्याबद्दल कबुली दिली आहे अशा व्यक्तींचीं उदाहरणें अनेक आहेत (प्रकरण १५ पाहा.) मॅस्कॅलिन, हाउडिनी यांसारख्या प्रसिद्ध पाश्चात्य जादूगारांनीं मध्यस्थांकडून होणारे सर्व चमत्कार आपण करून दाखवितों म्हणून आव्हान दिल्याचेंही सुप्रसिद्ध आहे. यावरून, हे चमत्कार करण्यास मृतात्मेच लागत नसून ते युक्तीनें होण्यासारखें आहेत हें उघड होते. याप्रमाणें या चमत्कारांना दुसरी बाजू आहे, म्हणून आम्ही त्यांसंबंधानें साशंक आहों, व प्रत्यक्ष अनुभव घेऊं इच्छितों. वादग्रस्त गोष्टीची शहानिशा वारंवार होणें जरूर आहे व ती तशी करावी असें आपण म्हणत असाल तर आम्ही आपल्याशीं चर्चा करूं इच्छितों. आपल्या इतर शंकांबद्दल आमचें म्हणणें पुढीलप्रमाणें आहे:—आपल्या प्रयोगाचेवेळीं आम्ही अथवा आमचे प्रतिनिधि, वृद्ध अथवा वडील माणसांस जो मान द्यावयाचा तो मृतात्म्यांना द्यावयास

तयार आहेत. तो मान असा कीं, ते सर्वांच्या देखत हात जोडून आपण सांगाल त्या भाषेनें त्यांची विनंती करून प्रश्नांचीं उत्तरें मागण्यास तयार आहेत. जर मृतात्मे खरोखरच येत असतील, तर जे मृतात्मे आपल्या देखरेखी-खालीं झालेल्या बैठकीस येऊन महत्त्वाच्या प्रश्नांबरोबर अनेक क्षुल्लक अथवा तादृश उपयोगी नसणाऱ्या प्रश्नांचीं उत्तरें देण्यांत बराच काळ खर्च करतात, त्यांनीं आमची विनंती मान्य करावी अशी अपेक्षा धरणें गैर होईल काय ? मृतात्म्यांत तोतया व्यक्ति असतात असें आपणच सांगतां, तर येणारा मृतात्मा कोण याची चौकशी अथवा परीक्षा करण्यापासून, त्यांना राग येण्याचें कारण काय ? (अशा चौकशीस 'परीक्षा' हें नांव देऊन चौकशी करणारे आपल्याकडे श्रेष्ठत्व घेतात असें फ्लॅशेटचे पुरस्कर्ते ध्वनित करतात तें अयोग्य आहे. वाद जर सत्यासत्यतेबद्दल आहे तर कसोटी लावण्यास नांवें ठेवून कसें चालेल ? )

मृतात्मे सांगतील त्या दिवशींच आम्ही तुमच्या मध्यस्थांचे द्वारें त्यांच्याशीं संभाषण करूं इच्छितों. तर त्यांचा विचार घेऊन, ते म्हणतील तेव्हां आपण बैठक ठरवावी अशी विनंती आहे. असें जोंपर्यंत आपण करणार नाहीं तोंपर्यंत आपल्या पक्षास वास्तविक आधार आहे असें म्हणतां येत नाहीं.

## मृतात्म्यांचें असाधारण ज्ञान मध्यस्थांना प्राप्त होत नाहीं याविषयीं ठळक अनुभव.

मृतात्म्यांच्या आगमनाच्या खरेपणाची कसोटी म्हणून आजपर्यंत जे महत्वाचे प्रयोग केले गेले त्यांवरून मृतात्म्यांचें आगमन सिद्ध होत नाहीं असेंच म्हणावें लागतें. यासंबंधानें पुढील अनुभव पाहाः—

( १ ) " मिसेस व्हेरॉल यांनीं समाधिस्थितींत जे संदेश लिहिले त्यांपैकीं कांहीं संदेश, मायर्स यांनीं मृतात्म्यांच्या आगमनाची कसोटी पाहण्याकरितां कांहीं मजकूर लिहिलेला कागद आंत घालून व नंतर मोहोरबंद करून जें पाकीट १८९१ मध्यें सर ऑ. लॉज यांच्याजवळ देऊन ठेवलें

होतें, त्यांतील मजकुरासंबंधाचे होते. हें पाकीट ११ डिसेंबर १९०४ रोजीं उघडून पाहिले तेव्हां असें दिसून आलें कीं, मिसेस व्हेरॉल यांच्याद्वारें आलेल्या संदेशांतील मजकुराचें साम्य मायर्स यांच्या लेखांतील मजकुरांशीं नव्हतें."

( २ ) " मृतात्म्याच्या अस्तित्वाच्या कसोटीसाठीं हॅना बाइल्ड यांनीं जिवंतपणीं मुद्दाम लिहून ठेवलेल्या पत्रांतील मजकूर म्हणून त्यांचे मृत्यूनंतर त्यांच्या मृतात्म्याकडून आलेल्या एका संदेशांत कांहीं माहिती आली; पण ती खोटी ठरली. स्टॅटन मोझेसच्या मृतात्म्यास त्याच्या इहलोकींच्या स्नेह्यांचीं नांवें विचारलीं असतां, जीं नांवें सांगण्यांत आलीं तीं खोटीं ठरलीं. G. P. ह्यांनीं दोन नांवें सांगितलीं तींहि खोटीं ठरलीं !"

—पानें २०० व ३४६, पॉडमोअर यांचा Spiritualism हा ग्रंथ.

( ३ ) प्रख्यात जादुगार हौडिनी ह्यांनीं आपल्या A Magician among the Spirits या ग्रंथांत सांगितलेला अनुभव—

" मेल्यानंतर भेट देऊन आपले विचार कळवावयाचे याविषयीं १०–१२ माणसांशीं मीं करार केले होते. खूण पटावी म्हणून मीं कांहीं सांकेतिक खुणा व हस्तांदोलनाचे विशिष्ट प्रकार ठरवून ठेवले होते...... मरणानंतर ह्या माणसांचे मृतात्मे आल्याबद्दल निरनिराळ्या प्रसंगीं निरनिराळ्या मध्यस्थांनीं सांगितलें; पण ठरलेली खूण मला कोणाहि मध्यस्थाकडून एकदाहि मिळाली नाहीं.

" माझ्या आईच्या मृतात्म्याकडून एक शब्द ऐकण्यासाठीं मी माझ्या संपत्तीचा मोठा भाग मोठ्या आनंदानें दिला असता. ( परंतु तसा योग कोणी आणून दिला नाहीं.)

" गेलीं तीस वर्षें मीं मृतागमनविद्येवरील सर्व लेख वाचले आहेत व ह्या विषयावरील लेखांचा फार मोठा संग्रह मजजवळ आहे......

......ह्या तीस वर्षांत अस्सल चमत्कार असा मला एकहि आढळून आला नाहीं."

( ४ ) श्री. ऋषि यांनीं पुण्यास केलेले स्वयंलेखनाचे प्रयोग मीं अनेक वेळां पाहिलेले आहेत. त्यांमध्यें मध्यस्थाचे कानावरून कधींहि न

गेलेली अथवा मध्यस्थास तर्कानें सांगतां न येईल, किंवा क्वचित् काकतालीय न्यायानें बरोबर न ठरेल अशी माहिती स्वयंलेखनात आली, असें दिसलें नाहीं.

'केसरी' ऑफिसांत श्री. ऋषींचे जे प्रयोग झाले त्यांमध्यें लोकमान्यांचे आत्म्यानें दिलेलीं म्हणून जीं उत्तरें आलीं तीं बरोबर नव्हतीं हें श्री. न. चिं. केळकर यांनीं १०-७-३४च्या केसरींत प्रसिद्ध केलेंच आहे.

मध्यस्थास माहीत नसण्यासारखी गोष्ट विचारली कीं माहिती येण्याचें बंद तरी होतें, किंवा ती माहिती चूक ठरते; असा अनुभव पुष्कळ वेळां येतो.

( ५ ) प्रख्यात मानसशास्त्रज्ञ प्रो. जेम्स हे Varieties of Religious Experiences या पुस्तकांत लिहितात ( पान ५२४ ):—

"मेसर्स मायर्स, हॉजसन, हिस्लॉप यांच्या अश्रांत परिश्रमांबद्दल मला अत्यंत आदर वाटतो व त्यांनीं ठरविलेल्या अनुकूल निर्णयाचा माझ्या मनावर बराच परिणाम झाला आहे; तथापि मृतांचे आत्मे परत येतात हें सिद्ध होण्यास प्रत्यक्ष अनुभवाची उणीव आहे."

प्रख्यात लेखक डीन इंज ह्यांचा अभिप्राय असाच आहे.

बर्नार्ड शॉ हे प्रख्यात लेखक म्हणतातः—

"Seances could prove nothing. . . . I cheated & was amazed at my success and by the discovery that the more cultivated, clever and imaginative my victims were, the more easy it was to cheat them.

Even when I owned up, they would hardly believe me. . . . I could not feel about the experiences of Lodge and Doyle as they did themselves."

—Illustrated Hindu Weekly 9-12-34.

## विरुद्ध शास्त्रज्ञ साक्षीदार.

( ६ ) प्रयोग पाहूनहि ज्यांचा अविश्वास कायम आहे असे अनेक शास्त्रज्ञ आहेत. यासंबंधांत पुढील अभिप्राय पहाः—

" सर ऑ. लॉज, क्रुक्स हे शास्त्रज्ञ म्हणून त्यांच्या साक्षी खऱ्या मानावयाच्या असें कोणास वाटत असेल तर त्यांनीं हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, पुढील शास्त्रज्ञ व तत्त्वज्ञ वरील मताच्या उलट मताचे आहेतः– डार्विन, फॅराडे, टिंडॉल, क्लिफर्ड, हर्बर्ट स्पेन्सर, हेल्महोल्ट्झ, हेकेल, सर रे लँकेस्टर, लॉर्ड केलव्हिन......इ०."

### कांहीं अनुकूल साक्षीदारांचीं व्यंगें.

" शिवाय हेंहि ध्यानांत ठेवलें पाहिजे कीं, जेथें लबाडी किंवा हात-चलाखी यांचा संबंध असतो तेथें शास्त्रज्ञांचा फारसा उपयोग नाहीं. असे लोक त्यांचा व्यवहारज्ञानाभाव व मनाचा साधेपणा यामुळें सहज फसतात. सर ऑ. लॉज, क्रुक्स, वॉलेस, लोंब्रोसो व डॉइल ह्यांना कांहीं मध्यस्थांनीं फसविल्याचें सुप्रसिद्ध आहे."

" प्रो. लोंब्रोसो यांचें मतांतर झालें त्यावेळीं त्यांची प्रकृति अगदीं क्षीण झाली होती. क्रुक्स हे सहज फसविले जाण्यासारखे होतेच, पण शिवाय त्यांची दृष्टिहि मंद होती. मध्यस्थांच्या चमत्कारांचें संशोधन करण्यास नेमलेल्या प्रसिद्ध सेबर्ट कामिशनपुढें ज्या पंडितांनीं स्लेडचे चमत्कारांबद्दल अनुकूल साक्षी दिल्या त्यांपैकीं कांहीं जर्मन पंडितांची स्थिति पुढीलप्रमाणें होतीः—झोल्नर यांच्या वेडास प्रारंभ झाला होता; शिब्नर यांची दृष्टि फार मंद होती; फेक्नर बहुतेक अंध होते...इ०."

—पानें ९७-९८, Spiritualism Explained. (हें इंग्लंडमधील प्रख्यात R. P. Association मार्फत प्रसिद्ध झालेलें पुस्तक आहे.)

## मृतागमनवादींना कांहीं प्रश्न.

ज्यांची जाणीव आपल्यास बिलकूल नसते असे अनेक विचार व कल्पना आपल्या मनांत उत्पन्न होत असतात, तसेच हे विचार व कल्पना अबुद्धिपुरस्सर आपल्याकडून भाषणद्वारा अथवा लेखनद्वारा व्यक्त होतात ही जी कल्पना, प्लॅन्शेटच्याद्वारें व्यक्त होणाऱ्या माहितीची उपपत्ति देतांना, १०४-१० पानांत सांगितली आहे, ती ज्या गृहस्थांस मान्य नसेल त्यांनीं पुढील प्रश्नांस उत्तरें द्यावीं अशी विनंती आहे.

### ( १ ) स्वप्नसृष्टीची उत्पत्ति काय ?

आपण स्वप्नांत जें पाहतों तें आपल्या कल्पनेची निर्मिति कीं सत्य (म्हणजे objective अथवा जीस जगांत आस्तित्व आहे अशी ) वस्तुस्थिति ? जर ती वस्तुस्थिति म्हणावें, तर ज्या हयात व्यक्ति आपणांस स्वप्नांत भेटतात त्यांना स्वप्नांत तोच देखावा दृष्टीस पडतो काय, अथवा त्यांना स्वप्नांतील त्या गोष्टींची जाणीव असते काय ? नसल्यास आपणांस स्वप्नांत दिसणाऱ्या देखाव्याच्या उत्पत्तीची मीमांसा काय? स्वप्नांत आपण जें पुस्तक वाचतों त्याचें एकंदर स्वरूप, त्याच्या विशिष्ट पानाचें स्वरूप, व त्या पानांतील मजकुराचा टाईप ह्या गोष्टी जागे झाल्यावर आपणास कांहीं वेळपर्यंत स्मृतिचक्षूपुढें अगदीं स्पष्ट दिसतात; व त्या अशा असतात कीं, प्रत्यक्ष सृष्टींत त्या कोठेंही पाहिलेल्या नसतात. ह्या वस्तूंना कोणत्या लोकांत आस्तित्व असतें ? हे सर्व देखावे ' आपल्या कल्पनेची निर्मिति ', यापेक्षां त्यांची समाधानकारक दुसरी उपपत्ति देतां येते काय ?

### ( २ ) अन्यलोकदर्शनाची उपपत्ति काय ?

त्रिकालदर्शी आरसा, आंगठी, स्फटिक, नखावरील शाईचा थेंब, करपुतळी, स्वप्न इत्यादि साधनांच्या द्वारें जे देखावे दिसतात ते काल्पनिक नसतात असें ज्यांचें मत,त्यांच्या मतास अनुसरून त्या दृश्यांस आपण अन्यलोकदर्शन (कारण त्या गोष्टी या लोकांतील नव्हेत म्हणून) असें नांव देऊं या. या दर्शनांत जे जे देखावे दृष्टीस पडतात ते कोणत्या सृष्टींतील ? या देखाव्यांत मध्यस्थाच्या दृष्टीस दरबार पडतो व बोलावलेल्या व्यक्ति त्या दरबारांत येऊन विचारलेल्या प्रश्नांबद्दल माहिती सांगून किंवा सुचवून जातात असें जें घडतें ती कोणत्या सृष्टींतील वस्तुस्थिती ? ही सृष्टि सत्य म्हणावी तर तिच्यांतील दृश्यांवरून पृथ्वींतील सर्व गोष्टींचें ज्ञान झालें पाहिजे; पण तें तसें कोठें होतें ? तसें असतें, तर इतिहासांतील लक्षावधि गोष्टी अज्ञात राहिल्या नसत्या. पण, आपणांस माहीत आहे कीं, लिंडबेर्गचा खून झालेला मुलगा, सदाशिवराव भाऊ पेशवे वगैरे कोठें आहेत हें राहूं द्या, पण नाइलचा उगम कोठें आहे असली गोष्ट ह्या साधनांनीं आजपर्यंत माहीत झाली नाहीं.

## (३) अन्यलोकदर्शन सत्यस्थिति म्हणावें, तर त्यांत एकवाक्यता कां नसतें ?

अन्यलोकदर्शनामध्यें जे देखावे दृष्टीस पडतात ते त्या व्यक्तींच्या समाजामध्यें रूढ असणाऱ्या कल्पनास अनुसरूनच असतात हें कसें ? उदाहरणार्थ, भुतांचीं पावलें उलटीं असतात अशी ज्या लोकांची समजूत त्यांनाच तीं उलटीं आढळून येतात, पण इतरांना त्यांनीं पाहिलेल्या भुतांमध्यें तीं तशीं आढळून येत नाहींत हें कसें ? देवदूतांना पंख असतात अशी ज्या ख्रिस्ति माणसांची समजूत त्यांना पंखांचे देवदूत दिसतात, पण ते हिंदूंना कधींच दिसत नाहींत, हें कसें ? ज्यांचा अंबाबाईवर विश्वास त्यांनाच स्वप्नांत अंबाबाई भेटून राहिलेला नैवेद्य मागते, पण अशा व्यक्तींच्या अश्रद्ध संततीस अंबाबाई कधींही स्वप्नांत भेट देत नाहीं. ज्यांचा श्राद्धावर विश्वास त्यांचेच पितर स्वप्नांत येऊन ' श्राद्ध न केल्यामुळें आपण उपाशी आहोत' म्हणून सांगून अन्न मागतात, पण ख्रिस्ती अथवा मुसलमान पितर उपाशी राहिल्याबद्दल स्वप्नांत भेटून कधींही तक्रार करीत नाहींत. जी देवी कुणब्याजवळ बकऱ्याचा नैवेद्य मागते ती जवळपासच्या बंगल्यांत राहणाऱ्या ब्राह्मणाजवळ तसला नैवेद्य मागत नाहीं. तसेंच पर्वती देवाळयांतील मूर्ति चोरीस गेल्यानंतर अंगांत आलेल्या देवीस निरानिराळया ठिकाणीं प्रश्न विचारण्यांत आले तेव्हां निरनिराळीं उत्तरें आलीं हें कसें ! (९–१०–३२चा 'सकाळ'पहा.) या अनुभवांवरून अन्यलोकदर्शन ही सत्यसृष्टि किं कल्पनानिर्मिति याबद्दल कांहीं अनुमान निघतें काय ? आतां, कांहीं दृश्यें काल्पनिक असतात असें जर वरील अनुभवांवरून दिसून येतें, तर काल्पनिक व सत्य यांमधील भेदाची कसोटी काय ?

## (४) ज्या उत्तराची जाणीव आपणांस नाहीं तें उत्तर स्वकल्पनानिर्मित नसतेंच काय ?

स्वयंकृतीत, करपुतळीच्या देखाव्यांत वगैरे जीं संभाषणें वगैरे ऐकूं येतात त्यांची उपपत्ति काय ? चोरीस गेलेला जिन्नस कोठें आहे असें

विचारतांच तावडतोब जें उत्तर येतें तें खोटें ठरतें असा जर अनुभव येतो, तर ह्या उत्तराचा उत्पादक कोण ? अशा प्रकारच्या निरनिराळ्या प्रयोगांत निरनिराळ्या मध्यस्थांकडून निरनिराळी उत्तरें मिळतात एवढेंच नव्हे, तर तीं उत्तरें बहुधा त्या त्या व्यक्तीच्या ज्ञानास अनुसरूनच असतात, व तीं बुद्धिपुरस्सरही दिलेलीं नसतात.

वरील अनुभवांत जर असें दिसून येत असेल कीं, जीस आपण दिव्य दर्शन अथवा देवतासाक्षात्कार मानतों, त्यांत एकवाक्यता नसून त्या त्या व्यक्तीप्रमाणें त्यांत भिन्नता असते, तर ही सर्व सृष्टि कल्पनानिर्मित असते असें मानण्यावांचून गत्यंतर काय ?

जर, करपुतळी, अंगांत येणें वगैरे प्रसंगीं, मध्यस्थ प्रश्न ऐकल्याबरोबर तावडतोब अबुद्धिपुरस्सर त्या प्रश्नाचें उत्तर बनवून देतो, तर फ्लॅन्शेट चालविणाऱ्या मध्यस्थाचें अंतर्मन, विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर तावडतोब ठरवून त्याप्रमाणें हातास चालना देत असावें, असें मानण्यास काय हरकत आहे ! असें मानण्यास प्रत्यवाय येईल तो फक्त एका गोष्टीनें. ती ही कीं, मध्यस्थास अज्ञात पण मृतात्म्यास ज्ञात अशी माहिती बहुतेक प्रसंगीं मध्यस्थाकडून यथार्थ मिळते, असा अनुभव आला पाहिजे. असें बहुतेक प्रसंगीं घडत नाहीं, हा अनुभव काय दर्शवितो !

२७-४-३४ च्या केसरींतील लेखांत श्री. रा. ना. मंडलीक हे पुढीलप्रमाणें लिहितातः—

" अज्ञात भाषेंत संदेश लिहिल्याचें माझ्या पाहण्यांत नाहीं."

" मृतात्म्यांकडून जीं उत्तरें बिनचूक मिळालीं पाहिजेत तीं कित्येक वेळा चुकतात." ( किती वेळा चुकतात व किती वेळा बरोबर येतात. याची बरोबर नोंद कोणी केल्यास बरोबर उत्तरांचें प्रमाण अत्यल्प असतें व त्यांची उपपत्ति १०३-४ पानांत सांगितलेल्या कारणांनीं लावण्यासारखी असतें असें दिसून येईल.)

## ( ५ ) माहितीचा उगम मध्यस्थ कीं मृतात्मा ?

पुढील समीकरणें सोडवाः—

| | |
|---|---|
| जी गोष्ट मध्यस्थाचे कानावरून कधींच गेलेली नसते | ती मृतात्म्यास माहीत असल्याचें लेखावरून दिसून येत नाहीं. |
| मध्यास्थास लिहितां येत नाहीं, तेव्हां | मृतात्मा आपले विचार लेखनानें व्यक्त करूं शकत नाहीं. |
| मृतात्मा दोन वर्षांची मुलगी, पण मध्यस्थ साक्षर असतो, तेव्हां | मृतात्मा लिहूं शकतो ! |
| मध्यस्थास जी भाषा अथवा लिपी येत नाहीं तिच्याद्वारें | ती जाणणारा कोणीही मृतात्मा त्या भाषेंत अथवा लिपींत संदेश देऊं शकत नाहीं. |

वरील समीकरणें सोडवितांना मृतात्म्याचे वाटणीस मध्यस्थाच्या गुण-दोषांहून निराळें काय येतें !

श्री. मंडलिक म्हणतात, "मृतात्म्याच्या ठिकाणीं लेखनवाचनशक्ति नैसर्गिक आहे असें सिद्ध होतें." यावरून आमच्या मतें आमचा जो सिद्धांत कीं, 'लेखनाचें कारकत्व मृतात्म्याकडे नसून तें मध्यस्थाकडे असते' त्यास पुष्टि मिळते. हें खरें नसून श्री. मंडलिकांचें मत खरें असल्यास, निरक्षर मध्यस्थामार्फत साक्षर मृतात्मा आल्यास संदेश लेखी मिळाले पाहिजेत. तसें मिळतात असें दाखविण्यास कोणी तयार आहे काय !

### निष्कर्ष.

वरील सर्व विवेचनावरून दिसून येईल कीं, संदेश व परलोकदर्शन यांची उपपत्ति लावण्यास मनुष्याचें नैसर्गिक मानसिक व शारीरिक धर्म बहुतांशीं पुरेसे आहेत. म्हणून अशा प्रकारच्या चमत्कारांवरून मृतात्म्यांचें आगमन सिद्ध होत नाहीं.

मृतात्मे आहेत कीं नाहींत व आत्मा अमर आहे कीं नाहीं याबद्दल

आम्हांस कांहींही म्हणावयाचें नाहीं. मृतात्मे असतील, पुनर्जन्म असेल व आत्मा अमर असेल. तें वाटेल त्यानें आपल्या समजुतीस अनुसरून मानावें. फक्त आमचें म्हणणें एवढें कीं, मृतात्म्यांच्या अस्तित्वाचा पुरावा म्हणून ज्या गोष्टी पुढें केल्या जातात त्या, त्या बाबतींत पुरावा म्हणून समजल्या जाण्यास योग्य नाहींत.

## प्लॅन्शेटादि साधनांनीं केलेल्या संभाषणाचा उपयोग अज्ञातवस्तु-बोधाच्या कामीं होतो असा अनुभव आहे काय ?

श्री. मंडलिकादिकांच्या लेखांवरून असें दिसतें कीं, मृतात्म्यांच्या पायास जखम होते व त्या जखमेवर पट्टी बांधावी लागते; परलोकगत वृद्ध वडिलां-सारखीं माणसें, विशेष कारणावांचून रागावणें, रुसणें असले दोष सोडून देत नाहींत; परलोकांत खोडकर व्यक्ति असतात व त्या चेष्टा करतात; पर-लोकांत युरोपियनांची व्हिस्की सोडा हीं पेयें चालू राहतातच (ही चेष्टा नव्हे; असें कांहीं परलोकवाद्यांचें म्हणणें असल्याबद्दल श्री. ×× यांनीं एका बैठकींत सांगितलें होतें.) इतके दोष असूनही या लोकापासून मिळणारी माहिती पाहिली, तर तींत कल्पनागम्य माहितीचा व चेष्टांचा सुकाळ व निश्चित किंवा विश्वसनीय माहितीचा दुष्काळ; तेव्हां अशा स्थितींत मृता-त्म्यांशीं दळणवळण ठेऊन ऐहिक किंवा पारमार्थिक हित काय होणार ?

शंकराचार्य, शिवाजी महाराज, तुकाराम, लोकमान्य टिळक यांचे मृतात्मे बोलावले असतां ते आल्याच्या गोष्टी कधीं कधीं सांगण्यांत येतात; पण उपनिषद् अथवा गीता यांतील एखाद्या बिकट वचनाचा अर्थ स्पष्ट करण्याची गोष्ट तर दूरच राहिली, पण शिवाजी महाराजांना लिहितां येत होतें कीं नव्हतें, अथवा त्यांचा खरा जन्मशक कोणता, सदाशिवराव भाऊ पेशवे यांचा अंत कसा झाला असल्या साध्या प्रश्नांनाही समाधानकारक उत्तर मिळण्याच्या कामीं त्या त्या व्यक्तींच्या मृतात्म्यांच्या आगमनाचा उपयोग जर होत नाहीं, तर ह्या विद्येचा उपयोग काय हाही प्रश्न विचार करण्याजोगा नाहीं काय ?

---

# प्रकरण ९ वें.

## भुतें, पिशाचें इत्यादिकांचें अस्तित्व व त्यांसंबंधीं चमत्कार.

### १ भुतांसंबंधीं भिन्न पंथांच्या कल्पना.

थिऑसोफि या पंथाचें मत पुढील प्रमाणें आहे:—"प्लॅन्चेटच्या द्वारें बोलणाऱ्या व्यक्ति बहुतेक तोतये व खोडकर मृतात्मे असतात; चांगल्या माणसांचे मृतात्मे असे वारंवार येऊन प्लँशेट इत्यादि द्वारा संभाषण सामान्यतः करीत नाहींत. मृत्यूनंतर मृतात्मा कांहीं काल भुवर्लोकीं असतो व त्यानंतर तो स्वर्लोकांत असतो व नंतर तो जन्म घेतो. विशेष कारणावांचून तो मृत्युलोकीं येत नाहीं."

कांहीं युरोपियनांचें मत असें आहे कीं, माणसांप्रमाणें पशुकीटकादिकांचींच नव्हे तर जड पदार्थांचींही भुतें ( spirits ) असतात. ( ह्या संबंधानें Elliot O' Donnell यांचीं Ghostly Phenomena वगैरे पुस्तकें पाहा. ) आगगाडीचीं भुतें पाहिल्याचें ह्या गृहस्थांनीं वर्णन केलें आहे!

बहुतेक आधुनिक शास्त्रज्ञ व तत्त्ववेत्ते यांची वरील मतांस मान्यता नाहीं. मृतमनुष्याचा आत्मा मृत्यूनंतर कोणत्याही रूपांत बिलकूल राहात नाहींच असें म्हणण्यास ते तयार नाहींत; तथापि तो दृश्यरूप धारण करतो अथवा जिवंतपणीं अनुभविलेल्या गोष्टी सांगतो, हें त्यांच्या मतें सिद्ध झालें नाहीं. मात्र त्यांचे मतें ही गोष्ट बहुतेक निश्चित आहे कीं, भुतांचे चमत्कार म्हणून जे दृष्टीस पडतात त्यांपैकीं बहुतेकांत तादृश तथ्य नसतें.

पुढील अभिप्राय पहा—

**Upon the continuity of any individual consciousness after bodily cessation and disintegration *The Science of life* has no word of assurance, and on the other hand it assembles much that points towards its improbability.**

**Page, 853, " The Science of Life" by H. G. Wells.**

## २ लिंगदेहाचें अस्तित्व.

मरणाऱ्या मनुष्याची प्रतिमा, मरणाचे वेळीं, त्याच्या एकाद्या नातेवाइकास दिसली अशीं कांहीं उदाहरणें आहेत; पण तीं फार थोडीं आहेत. यासंबंधानें मिसेस सिज्विक लिहितातः—

Among the 17000 persons who answered the census questions, apparitions representing a dead or dying person within 12 hours of the death occured on 11 different occasions during ten years.

(भावार्थ—ज्या १७ हजार माणसांनीं या प्रश्नांचीं उत्तरें दिलीं त्यांपैकीं फक्त ११ माणसांना, मृताच्या मृत्यूच्या वेळेच्या सुमारास मृत मनुष्याची प्रतिमा दिसली, असें आढळून आलें.)

पान २८०, Mrs. Sidgwick's Presidential Address.

पण हीं उदाहरणें फार थोडीं असल्यामुळें ह्यावरून मनुष्यास लिंगदेह असतो हें सिद्ध होत नाहीं. शिवाय दिसणाऱ्या प्रतिमेचा पोशाख व स्वरूप हीं त्या वेळच्या त्या व्यक्तीच्या प्रत्यक्ष स्थितीहून, बऱ्याच प्रसंगीं भिन्न होतीं. यावरून ती प्रतिमा, पाहणाराच्या कल्पनेची निर्मिति होती असें मानावें लागतें. या उदाहरणांवरून फार तर telepathy सिद्ध होईल; म्हणजे मरणाऱ्या मनुष्याच्या मनानें संक्रामित केलेली संवेदना अन्य मनुष्यास जाऊन पोहोचली हें सिद्ध होईल.

## ३ भुतांचें अंगांत येणें.

भूत किंवा पिशाच माणसास लागतें अथवा एकादा मृतात्मा मनुष्याच्या अंगांत येऊन बोलतो व इतर कृति करवितो असे जे चमत्कार घडतात त्यांपैकीं बहुतेकांची उपपत्ति मेंदूचे आजार व अंतर्मनाचे धर्म यांच्यासंबंधाच्या माहितीवरून लागते.

मनावर जे अनेक संस्कार घडतात त्यांस अनुसरून, मेंदूच्या विकृत स्थितींत, मनुष्यास अनेक भास होतात. या संबंधाचीं अनेक उदाहरणें मानसशास्त्रावरील ग्रंथांतून दिलीं आहेत. ( प्रख्यात मानसशास्त्रज्ञ जेम्स

यांच्या 'मानस शास्त्र' या ग्रंथाचें दहावें प्रकरण पहा ). यांपैकीं पुढील एक उदाहरण पहाः—एकदा एक मनुष्य एकाएकीं आपलें गांव सोडून परगांवीं गेला, व तेथें त्यानें अन्य नांव धारण करून दुकानदारी सुरू केली. कांहीं दिवसांनीं तो तें दुकान सोडून मूळच्या गांवीं गेला व मूळच्या नांवानें व्यवहार करूं लागला. यांमध्यें सोंग किंवा फसवणूक याचा भाग मुळींच नव्हता. अर्थात् असें करविण्यांत पिशाचास कांहीं कारण नसल्यामुळें हा सर्व परिणाम मानसिक विकाराचा असावा असें मानणें सयुक्तिक दिसतें. कांहीं लोकांना आपण दुसरी कोणी ख्र व्यक्ति आहोंत असा एकाच व्यक्तीचा भास होत नाहीं, तर भिन्न वेळीं भिन्न व्यक्तींचा होतो. ( यांस इंग्रजींत Multiple personality ) म्हणतात.

स्वप्नामध्यें जें आपण पाहतों, ऐकतों अथवा उपभोगितों तें सर्व काल्पनिक असते ही गोष्ट लक्षांत घेतली, म्हणजे आपल्या कल्पनेस अनुसरून आभास किती स्पष्ट व केवढा मोठा होऊं शकतो हें ध्यानांत येईल. (प्र. ८ पहा.) असा आभास, मेंदूस विकार झालेल्या, भ्रम झालेल्या किंवा तत्सदृश स्थितींत असलेल्या मनुष्यास होतो. स्वप्नाप्रमाणें जागृत अवस्थेंतही आभास होतो याविषयीं १ल्या प्रकरणांत २०व्या पानांत माहिती सांगितलेली आहेच. ह्यावरून मनुष्यास दिसणारीं भुतें कल्पनानिर्मित प्रतिमा असाव्या असें अनुमान करावें लागतें.

कल्पनेस अनुसरून भास किती स्पष्ट होतो यासंबंधी ख्रिस्ती साधु सुंदरसिंग यांचा अनुभव पहा. आपण ख्रिस्ती धर्म कां स्विकारिला यासंबंधी हकीगत सांगताना साधु सुंदरसिंग म्हणतातः— +

"मी बायबल जाळून टाकल्यावर तीन दिवसांनीं पहाटें तीन वाजतां जागा झालों, स्नान केलें व प्रार्थना केली कीं, "परमेश्वरा, जर तूं असशील, तर मला सत्य मार्ग दाखीव, नाहींतर मी आत्महत्या करीन." माझा बेत असा होता कीं, माझें समाधान झालें नाहीं तर रुळांवर मान ठेऊन आगगाडीखालीं मरावें. माझी प्रार्थना एकसारखी चालू होती पण मला परमेश्वराकडून उत्तर मिळालें नाहीं. आणखी अर्धा तास प्रार्थना केल्यावर

---

+ ही माहिती प्रख्यात Hibbert Journal च्या अंकांतून घेतली आहे.

सुमारें ४।। वाजतां एक अभूतपूर्व चमत्कार माझ्या दृष्टीस पडला. माझ्या खोलींत मला मोठा थोरला प्रकाश दिसला. मला वाटलें कीं जवळ कोठें आग लागली असावी. चोहोंकडे पाहिलें तों कोठें आग दिसेना. मग माझ्या लक्षांत आलें कीं, माझ्या प्रार्थनेस ईश्वराचें हें उत्तर असावें. मी प्रार्थना चालू ठेऊन त्या प्रकाशाकडे पाहात असतां मला एशु ख्रिस्ताची मूर्ति दिसली. ती जर एखादी हिंदु देवता असती तर मी तिच्यापुढें साष्टांग नमस्कार घातला असता. थोडे दिवसांपूर्वी ज्या एशु ख्रिस्ताचा मी अवमान करीत होतो तोच तो प्रत्यक्ष होता. त्या वेळीं हिंदुस्तानी भाषेंत मी पुढील शब्द ऐकले "तूं माझा किती दिवस छळ करणार? मी तुला तारण्याकरितां आलों आहे; सत्यमार्ग कोणता म्हणून तूं विचारीत होतास; मग सत्यमार्ग तूं कां अनुसरीत नाहींस?" मग माझ्या मनांत विचार आला 'ख्रिस्त कांहीं मेला नाहीं; तो जिवंत आहे व हाच तो आहे.' मग मी त्याच्यापुढें साष्टांग नमस्कार घातला, व माझ्या मनाला जी शांतता पूर्वी कोठेंही मिळाली नव्हती ती मला तेव्हांपासून मिळाली."

साधु सुंदरसिंग ह्यांची हकीकत थोडक्यांत पुढीलप्रमाणें आहे. पत्याळा संस्थानांतील रामपूर येथील एक जमिनदार सरदार शेरसिंग ह्या शिख गृहस्थांचे चिरंजीव सुंदरसिंग होत. त्यांना लहानपणीं भगवद्गीता पाठ येत होती, व सोळाव्या वर्षापर्यंत शिखांचा धर्मग्रंथ 'ग्रंथसाहेब', कुराणाचे उर्दू भाषांतर, व कांहीं उपनिषदें यांचा परिचय त्यांना झाला होता. एका मिशनच्या शाळेंत शिकत असतां त्या शाळेंतील ख्रिस्ती धर्माची शिकवण ऐकून त्यांना त्याचा संताप आला व हा खोटा धर्म शिकविणाऱ्या गुरूंचा छळ करण्यास त्यांनीं आपल्या मित्रांना प्रोत्साहन दिलें. शेवटीं एके दिवशीं बायबल व दुसरीं ख्रिस्ती पुस्तकें फाडून त्यांवर तेल ओतून तीं पेटविलीं व जाळून टाकलीं. त्यानंतर काय घडलें तें वर दिलेंच आहे.

ह्या सुंदरसिंगसाधूंचें चरित्र मिसेस पार्कर या बाईनीं इंग्रजींत लिहिलें आहे. त्यामध्यें पुढील एक चमत्कार सांगितला आहे. साधु सुंदरसिंग तिबेटांत गेले असतां एका अधिकाऱ्यांनीं त्यांना एका तळघरांत टाकलें व त्याचे दारास कुलूप लावलें. रात्रीं कोणा अदृष्ट व्यक्तीनें तें कुलूप काढून

सुंदरसिंगांना तळघराबाहेर काढलें! हा चमत्कार देवानेंच करविला अशी सुंदरसिंगांची समजूत आहे.

आतां, प्रश्न असा कीं, वरील हकीकत वस्तुस्थिति कीं आभास? वस्तुस्थिति म्हणावी तर खितीधर्मावांचून बाकीचे धर्म निरुपयोगी व खोटे आणि एशु क्रिस्त हिंदुस्तानी बोलूं शकला हें खरें मानलें पाहिजे. हें जर खरें नसेल, तर त्या त्या व्यक्तीच्या भावनेप्रमाणें "वाटेल ती काल्पनिक व्यक्ती दिसल्याचा व बोलल्याचा भास होतो एवढेंच नव्हे, तर भावनेला इष्ट अशा कल्पनेमुळें मनःपीडा नाहींशी होऊन शांति व सुख हीं मिळतात" हेंच तत्त्व मान्य करावें लागतें.

वरील प्रकारच्या अनेक (व कधीं कधीं परस्परविरोधीही) अनुभवांवरून, अंगांत होणारे निरनिराळे संचार, व भाविक लोकांना होणारे दृष्टांत व साक्षात्कार ह्यांस आभास मानण्याकडे शास्त्रज्ञांचा कल आहे.

## ४ अंगांत आलेल्या माणसांचीं अद्भुत कृत्यें.

ज्याच्या अंगांत कोणा भूतपिशाचाचा संचार झाला आहे अशी लोकांची समजूत झालेली असते, तो मनुष्य विशेष शारीरिक किंवा बौद्धिक सामर्थ्याचीं कृत्यें करतो, यावरून ती कृति करणारी व्यक्ति तो मनुष्य नसून, अंगांत संचारलेला अन्य आत्मा ( देवता, मृतात्मा इ. ) होय असें कांहींना वाटतें; पण तें बरोबर नाहीं. हें कसें याचा उलगडा पुढील दोन धर्मावरून होईल:—

(१) आपण जाणूनबुजून विचार करतों तेव्हांच मेंदू काम करतो, पण एरवीं तो विचाराचें अथवा कल्पना निर्माण करण्याचें काम करीत नाहीं अशी सामान्य समजूत आहे, पण ती अगदीं चुकीची आहे. पोट, हृदय इत्यादि इंद्रियांचें काम सतत चालू असतें, त्याप्रमाणें मेंदूचें काम जागृत अवस्थेंत तर चालू असतेंच, पण झोंपेंतही मेंदूच्या कांहीं भागांचें काम चालू असतें. मेंदूला विश्रांति पाहिजेच, म्हणून झोपेंत मेंदूचे भिन्न भाग आळीपाळीनें विश्रांति घेत असावे असें वाटतें. पहाटें तीन वाजतां उठावयाचें अशा हेतानें निजलें असतां त्या वेळीं जाग येणाऱ्या माणसांचीं अनेक

उदाहरणें आहेत, यावरून मेंदूचा कांहीं भाग जागा असतो असेंच मानावें लागतें. +

कितीही अवघड विषय वाचल्यावर किंवा ऐकल्यावर त्यासंबंधानें जें अस्पष्ट ज्ञान असत तें दुसऱ्या दिवशीं जास्त स्पष्ट झालेलें आढळून येतें; एकादी गोष्ट आठवत नसतां ती मागाहून चांगली आठवते; तसेंच एकाद्या नडलेल्या प्रश्नाचा (गणितांतील प्रश्नाचाही) उलगडा कांहीं वेळानें आपोआप झालेला दिसून येतो; या अनुभवांवरून, आपणांस न कळत मेंदूचें काम पुष्कळ होतें याबद्दल खात्री पटेल (प्रकरण ८ पानें १०४-८, पहा.)

अशी स्थिति असल्यानें, पूर्वी पाहिलेल्या गोष्टींवरून, आपणांस न कळत अनेक कल्पना मनांत उत्पन्न होतात व त्यांची जाणीव एकाएकी झाल्यास त्या दुसऱ्या कोणी मनांत घातल्या अशी चुकीची समजूत होते. 'हा विचार माझ्या मनांत कधीं आला नव्हता' असें आपण म्हणतों, व तसें आपणांस वाटतें, हा कांहीं अंशीं भ्रम आहे. आपल्या शरीरांत, अन्नाचें रक्त, मांस, मज्जा इत्यादिकांत होणारें रूपांतर हें आपणांस कळून येत नाहीं, म्हणून तें होतच नाहीं हें म्हणण्यासारखेंच वरील म्हणणें आहे.

मनाच्या समाधिस्थितींत सबंध ग्रंथ लिहिला व त्या गोष्टीची जाणीव इतकी राहिली नाहीं कीं, तो ग्रंथ तयार झाल्यावर तो एकाद्या नव्या ग्रंथाप्रमाणें लेखकानें वाचला, अशीं कांहीं उदाहरणें आहेत.

२ रा धर्म—विकृत स्थितींत एकादी शक्ति कांहीं वेळ विशेष वाढते.

उदाहरणें:-(अ) धनुर्वात झालेल्या रोग्यास वाताचा झटका येतो तेव्हां तीनचार माणसांच्यानें प्रतिबंध करवत नाहीं इतक्या जोरानें शरिराची कमान होते. (ब) वात झालेला अगदीं अशक्तही मनुष्य पळूं लागतो तेव्हां तो सशक्त माणसासही आवरणें कठीण होतें. (क) भस्मरोग या विकारांत मनुष्याचा आहार दुप्पट तिप्पट वाढतो. (ड) मेंदूच्या विकृत स्थितींत कांहीं मानसिक शक्तींची विलक्षण वाढ झालेली असते. कांहीं वेडे एकपाठी असतात. एक वेडा एकदा ऐकलेला मजकूर पाठ म्हणून दाखवीत असे, एवढेंच नव्हे तर तो उलटा म्हणून दाखवीत असे! एक वेडा

---

+हें मुंबईस डॉ० न्यूनन् यांनीं केलेल्या प्रयोगांतही दिसून आलें.

मनुष्य तीन आकड्यांचा गुण्य व तीन आकड्यांचा गुणक यांचा गुणाकार तोंडानें, दुसऱ्या माणसास पाटीवर गुणाकार करण्यास जेवढा वेळ लागेल त्यापेक्षां कमी वेळांत, करीत असे हें लेखकानें प्रत्यक्ष पाहिलें आहे.

या माहितीवरून व अंतर्मनासंबंधानें जी माहिती ८वे प्रकरणांत दिली आहे तिजवरून अंगांत आलेल्या माणसांचें बडबडणें व क्वचित् दिसून येणारी विलक्षण शक्ति यांची उपपत्ति लागेल.

### ५ अंगात आलें असतां अज्ञात भाषा-कानडी वगैरे-बोलणें अथवा ग्रंथांतील मजकूर पाठ म्हणणें.

वरील प्रकारच्या भाषणांचा बराच भाग पूर्वी ऐकलेला असतो व त्याचा ठसा मेंदूवर उठलेला असतो. कांहीं वेडे एकपाठी असतात व बैल, कुत्रीं इत्यादि जनावरें, एकदोन वेळां पाहिलेली लांब वाटही ध्यानांत ठेवतात. यावरून प्राण्यांची धारणाशक्ति किती असते हें ध्यानांत घ्यावें.

धारणाशक्तीसंबंधानें अलीकडे अशी कल्पना होत चालली आहे कीं, सिनेमाच्या कॅमेरांत, त्यापुढें होणाऱ्या सर्व गोष्टींचे चित्रपट उत्पन्न होतात, त्याप्रमाणें प्राण्यासमोर घडणाऱ्या सर्व गोष्टींचे ठसे त्याच्या मेंदूवर कमी-जास्त मानानें उमटतात, व ठशांच्या त्या त्या भागावर मनाची एकाग्रता झाली म्हणजे त्यांचें स्मरण होतें. यासंबंधाचे पुढील अनुभव पहाः—

डॉ० जॅक्सन व सॉल्झबरी आपल्या Outwitting the Nerves या पुस्तकांत आपला अनुभव ६३-६७ पानांत पुढीलप्रमाणें लिहितातः—

"एका एकोणीस वर्षे वयाच्या बाईचें डोकें बिघडलें आणि तिला अलीकडच्या सर्व गोष्टींचें विस्मरण झालें व तिचें मन लहानपणच्या स्थितींत गेलें. ती म्हणे 'मला माझ्या डोक्याच्या आंत सर्व गोष्टी दिसतात,' व ती दोन वर्षांची होण्यापूर्वी घडलेल्या गोष्टीही सांगत असे. एकदा तिनें एक लहानपणची आपल्या भावंडांसंबंधीं लांबलचक सविस्तर हकीगत सांगितली, व त्यासंबंधानें तिच्या आईजवळ चौकशी करितां ती गोष्ट ती २१ महिन्यांची असतांना घडलेली होती असें दिसून आलें.

एका रात्रीं ती बाई झोपेंत असतां, एकादा नवशिक्या मुलगा एकेक अक्षर अथवा शब्द लावून पुस्तक वाचतो त्याप्रमाणें ती कांहीं बडबडत

होती. ते शब्द दिवसा तिच्या बिछान्यावर पडलेल्या एका मासिकांतील डॉ० टागोर याच्या एका कवितेंतील होते. कविता म्हणून झाल्यावर मीं तिला जागी केली व विचारलें 'तुला कसलें स्वप्न पडत होतें?' तिनें उत्तर दिलें 'मला नाहीं स्वप्नें पडत.' नंतर ती झोंपी गेली व फिरून ती कविता म्हणूं लागली, आणि तिनें त्या कवितेचा शब्द न शब्द बिनचूक म्हटला. फिरून तिला मीं जागें केलें व विचारलें 'तुला कसलें स्वप्न पडत होतें!' फिरून ती उत्तरली 'मला नाहीं स्वप्नें पडत.' मी विचारलें 'तूं आता "When the time comes for me to go" असें म्हणत होतीस ना!' ती म्हणाली 'होय. मी तें वाचीत होतें. पण मी नाहीं आतां झोंपीं जाणार, मला तें वाचून शीण येतो!'

जागी झाल्यावर तिला त्या कवितेचें पूर्ण विस्मरण झालें होतें; व तिच्या त्या जागृत अवस्थेंत तिला त्या कवितेचा अर्थ समजणेंही शक्य नव्हतें. (कारण जागृत अवस्थेंत तिची मानसिक स्थिति लहान मुलीसारखी होती.)

वरील उदाहरणावरून असें स्पष्ट दिसून येतें कीं, कधीं कधीं वाचलेल्या मजकुराचा परिपूर्ण ठसा आपल्या मेंदूवर उमटतो एवढेंच नव्हे तर ती गोष्ट आपल्या जागृत अथवा बाह्य मनास पूर्णपणें अज्ञात असते. मॉर्टन प्रिन्स हे एका रोग्याबद्दल पुढील हकीकत सांगतात. "मी व एक रोगीबाई यांनीं नुकत्याच पाहिलेल्या एका गृहस्थाच्या पोशाखाचें वर्णन करण्यास त्या रोगी बाईस सांगितलें तेव्हां 'त्यांचा पोशाख काळा होता' या पलीकडे तिला जास्त सांगता येईना. नंतर त्या बाईला, समाधि(trance)स्थ स्थितींत घालून, स्वयंलेखनाचे द्वारें, त्या गृहस्थाच्या पोशाखाचें वर्णन करण्यास सांगितलें तेव्हां तिनें पुढीलप्रमाणें लिहिलें:—

He has on a dark greenish gray suit, a stripe in it-little rough stripe; black bow cravat, shirt with three stripes in it; black-laced shoes; false teeth; one finger gone; three buttons on his coat.

हें सर्व वर्णन बरोबर होतें, असें मागाहून चौकशी करतां आढळून आलें.

आपण आपले विचार अथवा आपल्या कल्पना म्हणून ज्या सांगतों किंवा लिहितों त्या, आपण, कांहीं दिवसांपूर्वी एवढेंच नव्हे तर २।३ वर्षांपूर्वी, वाचलेल्या किंवा ऐकलेल्या असतात, व त्यांचें विस्मरण होऊन त्या आपल्या डोक्यांतूनच निघाल्या असा आपला समज होतो. अशा प्रकारचे अनुभव अनेक आहेत. ज्यांची धारणाशक्ति चांगली आहे अशा माणसांकडून, वाचलेल्या पुस्तकांतील सबंध वाक्यें, अजाणतेपणानें आपलींच म्हणून लिहिलीं जाण्याचा संभव फार आहे. यासंबंधानें एका लेखिकेनें आपला अनुभव पुढीलप्रमाणें सांगितला आहे. "माझ्या लेखांतील एक वाक्य दुसऱ्या ग्रंथांतील वाक्यांत थोडासा फरक करून लिहिलेलें आहे असें माझ्या मैत्रिणीनें मला सांगितलें तेव्हां मला फार आश्चर्य वाटलें. तें पुस्तक मीं सुमारें तीन वर्षांपूर्वी फक्त एकदाच वाचलें होतें व त्यांतील ह्या वाक्याची मी कधीं आठवण केली नव्हती किंवा तें कधीं उच्चारलें नव्हतें!"*

प्रख्यात विद्वान डॉ० सॅडलर हे "The Mind at Mischief" यांत पुढील हकीगत सांगतात—

"एका माणसाची दुसऱ्याशीं मारामारी झाली. तींत दुसऱ्या माणसानें ह्या माणसाच्या डोक्यावर बंदुकीचा दस्ता मारला. त्यामुळें या मनुष्यास Jacksonian Epilepsy च्या जातीच्या अपस्माराचा विकार जडला. अपस्माराचा झटका आला म्हणजे तो कधीं कधीं विलक्षण गोष्टी करी. तो एकाद्या वेळीं घरांतून रस्त्यावर पळून जाई, व तेथें जाणाऱ्या येणाऱ्या माणसांवर पिस्तुल रोखून त्यांचेजवळील मूल्यवान् वस्तू घेई. मात्र शुद्धीवर आल्यावर त्यास ह्या गोष्टीची जाणीव नसे. एकाद्या वेळीं तो घरांतून पळून जाऊन दोनतीन दिवस बाहेर भटकत राही. ह्या वेळीं तो अर्धवट

---

*वाङ्मयचौर्य—ग्रंथकर्त्यांवर चौर्याचा आरोप करण्यापूर्वी वरील वस्तुस्थिति लक्षांत घ्यावी अशी टीकाकारांस विनंती आहे.

शुद्धींत असे. अशा वेळीं एकदा त्याला उचलून इस्पितळांत आणलें तेव्हां पुढील प्रकार घडला:—

त्याला बिछान्यावर ठेवल्यावर तो बडबडूं लागला. त्याचे डोळे उघडे व अगदीं ताठ होते. तो जे बोलत होता त्यासंबंधानें असें दिसून आलें कीं, तो स्वतःविषयींची हकीकत तास व दिवस यांच्या बिनचूक क्रमानें यथातथ्य सांगत होता. त्याचे ओठ मधून मधून कोरडे पडत,ते ओलवावे लागत. हकीगत सांगतां सांगतां ज्या मारामारींत त्याचे डोक्यास जखम झाली होती तिच्यापर्यंत आल्यानंतर त्यास अपस्माराचा झटका आला व बोलणें बंद पडलें. हा झटका इतका जोराचा होता कीं, त्यास पलंगावरून पडूं न देण्यास चार माणसांची मदत लागली; व त्याची धडपड इतकी जोराची होती कीं, तींत पलंगावरच्या गाद्याबिद्या सर्व खालीं पडल्या.

अशा झटक्यानंतर हा रोगी आपलें वृत्त सांगण्यास आरंभ करी. प्रथम झोपेंतून जागे झाल्याप्रमाणें तो आपले हात ताणी, व एकाद्या सोमवारसकाळपासून आपली हकीकत सांगण्यास आरंभ करून सगळी हकीकत व त्या दिवशीं मनांत आलेले विचार सांगी, आणि केलेलीं कृत्यें अभिनय करून सांगी. प्रत्येक दिवसाचे हकीकतीस त्याला दहा मिनिटांपासून अर्ध्यातासापर्यंत वेळ लागे व त्या दिवसाची हकीकत संपल्यानंतर त्यास थोडी गुंगी येई; जणू काय ती त्या दिवसाची झोपेची आठवण होती. ही झोपेची नक्कल कांहीं सेकंद झाल्यावर तो झोपेंतून जागें झाल्याप्रमाणें जांभई देई, हात ताणी,व दुसऱ्या दिवशीची हकीकत सांगण्यास आरंभ करी.

एका प्रसंगीं तो १६ तास बडबडत राहिला व तेवढ्या वेळांत त्यानें आयुष्यांतील सुमारें ३॥ वर्षांची हकीकत सांगितली!

एकदा बडबडतांना, त्यानें त्याची व माझी मागें गांठ पडली असतां जी हकीकत घडली ती सांगितली; व त्यावेळीं मला असें आढळून आलें कीं, ज्या गोष्टी माझ्या आठवणींत नव्हत्या त्या त्यानें बरोबर सांगितल्या; एवढेच नव्हे तर त्याची जी हकीकत माझ्या समजुतीहून भिन्न होती तीच खरी असून माझ्या आठवणींतच चूक होती असें आढळून आलें !×

---

×..."But wherein the details of his story were differ-

वरील अनुभवावरून मनुष्याची स्मरणशक्ति केवढी असू शकते व अंतर्मनामध्यें किती ज्ञान राहू शकतें याची कल्पना होईल.

**६ घशास फास बसणें: दगड, सुया ओकणें, अंथरुणांत घाण पडणें इ०.**

हिस्टेरिया अथवा अपतंत्रक हा विकार झालेल्या माणसांमध्यें वरील गोष्टी दिसून येतात, व या विकाराची माहिती बहुतेकांना नसल्यामुळें ह्या अद्भुत गोष्टी रोग्याकडूनच होतात हें लोकांस समजून येत नाहीं.

ह्या विकारासंबंधानें पूर्वी अशी कल्पना होती कीं, हा विकार गर्भाशयाच्या कांहीं दोषामुळें होतो व तो स्त्रियांनाच होतो; पण ही कल्पना बरोबर नाहीं असें अलीकडे आढळून आलें आहे. हा विकार मुख्यतः मानसिक आहे व तो कांहीं पुरुषांनाही होतो. ह्या विकारांत जीं अनेक लक्षणें होतात त्यापैकीं

---

ent from mine, I was compelled in each case to recognize that he was right & I was wrong; thus it was demonstrated that his memory in the trance state was far more reliable than my normal memory.

It demonstrated fully to my mind that *human memory retains well nigh everything*....while the power of recalling facts may be incomplete.

This case...serves to throw considerable light on the problem of automatic writing."

एका बाईसंबंधानें Morel हे लेखक लिहितातः-" हिस्टेरियाच्या झटक्यांत ही बाई प्रख्यात ख्रिस्ती उपदेशकांचीं छापील प्रवचनें तोंडपाठ म्हणत असे, व त्या वेळीं आम्ही हातांत तीं पुस्तकें घेऊन पाहिलें तेव्हां त्यांतील शब्दना शब्द ती बिनचूक म्हणत आहे असें आढळून आलें. मात्र विकाराचा काल गेल्यानंतर हा चमत्कार कधीं दृष्टीस पडत नसे."

पुढील कांहीं होतः—घसा आवळल्याचा भास होणें; पोटांत अथवा घशांत गोळा उठणें; अर्धवट पचलेलें अन्न तोंडांतून पडणें; भ्रम होणें व भ्रमांत पळून जाणें, लपून बसणें, बडबडणें, आपले जिन्नस लपवून ठेवणें व ते लपविल्याची जाणीव नसल्यानें ते हरवले म्हणून बोभाटा करणें; दांतखिळी बसणें; इ०. ह्या विकाराचे रोग्यासंबंधानें एकदोन गोष्टी फार विलक्षण आहेत त्या ह्याः—१ रोगी बेशुद्ध झाल्यासारखा दिसतो पण त्यास शुद्धि असल्यामुळें सर्व भाषण ऐकूं येतें. ( २ ) हा रोगी इतका भावनावश झालेला असतो कीं, अप्रत्यक्ष सूचनेचाही त्याच्यावर कधीं कधीं ताबडतोब परिणाम होतो. 'येथे दुखतें आहे काय' म्हणून डॉक्टरनें विचारलें कीं तेथें दुखत नसलें तरी दुखल्याचा भास त्या वेळेपासून होऊं लागतो! ( म्हणून अशा रोग्याजवळ त्याच्यासंबंधानें कोणतीही वाईट गोष्ट बोलतां कामा नये. 'कांहीं बाहेरची बाधा झाली आहे काय,' 'पिंपळाखालून ही कधीं गेली होती काय!' वगैरे गोष्टी रोग्याजवळ कोणीं बोललें कीं, त्यांचा रोग्याच्या मनावर लागलीच परिणाम होतो.) (३) अशा रोग्यांना जी भीति असते ती नाहींशी झाली,कीं त्यांचा विकार बरा होतो. उदा०, अपघातानंतर वातविकारामुळें आलेला लुळेपांगळेपणा अपघातासंबंधाच्या खटल्याचा निकाल झाल्याबरोबर नाहींसा झाला असें अनेक वेळा आढळून आलें आहे. ह्यात रोग्याच्या लबाडीचा भाग असावा अशी शंका येईल, पण कांहीं वेळा लबाडी होत असली, तरी ज्यांत लबाडीचा भाग मुळींच नव्हता अशीं अनेक उदाहरणें डॉक्टरांचे पाहण्यांत आहेत.

जगद्विख्यात शास्त्रज्ञ हॅव्हेलॉक एलिस ह्यांनीं "Man & Woman" या ग्रंथांत ३८९ पानावर हिस्टेरियाच्या चमत्कारांसंबंधानें पुढीलप्रमाणें लिहिलें आहे तें लक्षांत ठेवण्याजोगें आहेः—

"मार्झिन येथें १८६१-५ सालीं हिस्टेरियाची सांथ आली होती त्या वेळीं ह्या विकारानें पछाडलेल्या बाया वेडीवाकडी बडबड करीत असत, झाडावर चढत असत व भविष्यें सांगत असत, आणि ह्या भविष्यांपैकीं कांहीं खरींही ठरत."

## ७ मृतात्म्यांचे फोटो

हे कृत्रिम रीतीनें तयार केले जातात. याविषयीं पॉडमोअर यांचे ग्रंथांतील पुढील माहिती पहाः—

121 पान. When put on his trial Bugnet made a full confession. The whole of his spirit photographs were, he stated, produced by means of double exposure.

123 पान. Some of the methods employed:—

(1) A confederate may be surreptiously introduced.

(2) Figure of spirit painted by sulphate of quinine or other fluorescent substance on part of the back ground.

(3) Positive printed from two different negatives.

(4) Negative twice exposed.

(5) Image of a previous photograph may remain on the glass.

**भावार्थ**—खटला केल्यावर ब्यूगे या गृहस्थानें 'आपण फोटोच्या काचा दोनदा एक्सपोझ करून मुतांचे फोटो कृत्रिम रीतीनें बनवीत होतो' अशी कबूली दिली.

भुतांचे फोटो आणण्यांत पुढील युक्तींचा उपयोग केला जातोः—

( १ ) फोटो घ्यायच्या वेळीं ज्याचा फोटो घ्यावयाचा त्याच्या मागल्या बाजूस एकादा साथीदार गुप्त रीतीनें चटदिशीं उभा करणें व नंतर त्यास चटदिशीं घालवून देणें.

( २ ) सल्फेट ऑफ किनिन अथवा दुसरें कांहीं रासायनिक पदार्थ यांनीं पिशाचाची आकृति मागील पडद्यावर काढणें. ( ही, ज्याचा फोटो काढावयाचा त्यास अथवा इतरांसही, सहज दिसण्यासारखी नसते, पण तिचा परिणाम कॅमेऱ्यांतील प्लेटीवर होतो. )

( ३ ) फोटोचा कागद दोन प्लेटींवरून छापणें व त्यांत दुसरी प्रतिमा आणणें.

( ४ ) माणसाचा फोटो घेण्याच्या पूर्वी अथवा नंतर पिशाचाच्या चित्रापुढें काच धरणें ( एक्सपोझ करणें ).

कधीं कधीं काचेवर घेतलेल्या पूर्वीच्या फोटोंतील एकादी आकृति पुरती न पुसली गेल्यामुळें ती तिच्यावर घेतलेल्या नवीन फोटोशेजारीं ( ज्याचा फोटो घेतला त्याच्याजवळ ) आलेल्या मृतात्म्यासारखी दिसते, व ज्यास ही कल्पना नाहीं त्यास ती भुताची आकृति उमटलेली आहे असें वाटतें.

भुतांच्या चमत्कारांसंबंधानें इंग्लंडांतील सायकिकल रिसर्च सोसायटीच्या एका अध्यक्षांचा पुढील अभिप्राय पहा.

We have little, if any, trustworthy evidence in favour of the 'ghost story of commerce,' the periodic ghost or the ghost which appears with a purpose.

H. A. Smith's Presidential Address-1910.

## ८ भूत लागलेल्या माणसांना कांहीं उपायांनीं बरें कां वाटतें?

बळी दिल्यानें, क्षेत्रास गेल्यानें, नदींत बुडी मारल्यानें ( व अशा अन्य उपायांनीं ) भूत जातें, याचें मुख्य कारण, तसें केलें असतां भूत जाईल अशी रोग्याची भावना, हेंच असतें.

यासंबंधानें पुढील उदाहरण व प्रकरणें ३ व ४ यांतील माहिती पहा.

भूत जाणें हें खरोखरींच भुताच्या इच्छेवर अवलंबून असते तर कांहीं प्रसंगीं केवळ वैद्यकीय उपायानें भूत गेलें नसतें. परंतु तें तशा उपायानें गेलें अशीं अनेक उदाहरणें आहेत. ( पान १० पहा. )

रोगोत्पत्तीशीं व रोग बरा होण्याशीं मनांत दडून राहिलेल्या कल्पनांचा संबंध किती असतो याविषयीं पुढील उदाहरण पहाः—

गेल्या महायुद्धांत ज्याला लढाईवर जावें लागलें होतें अशा एका इंग्लिश मनुष्याचा एक पाय लुला पडला व सुकत चालला. कोणत्याही

उपायांनीं पाय बरा होईना. शेवटीं एका मनोविश्लेषणशास्त्रज्ञानें ( phycho-analyst ) याविषयीं चौकशी करतां पुढील गोष्ट कळून आली. लढाईवर असतां एकदा जर्मनशत्रूंवर संगिनीचा हल्ला करण्याच्या प्रसंगीं या माणसानें समोरच्या जर्मन शिपायावर संगीन रोखली व ती त्याच्या मानेंतून आरपार जाऊन तो खालीं पडला व संगीन जमिनींत घुसली. ती संगीन चटकन काढून घेऊन पुढें जाणें जरूर होतें, म्हणून तो जर्मन शिपाई जरी जिवंत होता तरी त्याच्या अंगावर पाय देऊन ती संगीन ओढून घेणें भाग झालें. ह्या इंग्रज शिपायानें जर्मन शिपायाच्या तोंडावर बुटाचा पाय दिला, तेव्हां त्याला कळून आलें कीं, तो जर्मन कोवळा तरुण होता; व त्याच्या लुसलुशीत गालाचा कोवळेपणा त्याच्या पायाला जाणवल्यामुळें त्या क्रूर कृत्याचा त्याचे मनास धक्का बसला. ह्या आपल्या हातून झालेल्या निर्दयपणाच्या कल्पनेनें त्याला पूर्णपणें पछाडल्यामुळें त्यास वरील विकार जडला. ‘पायानें क्रूरपणा केला तेव्हां पायाशीं आपला संबंध तोडला म्हणजे क्रूर कृत्याच्या वाईटपणाचा आपणाशीं येणारा संबंध तुटला’ अशी मनाची ( अर्थात् चुकीची ) समजूत झाल्यामुळें, मेंदूपासून त्या पायाकडे जाणाऱ्या मज्जातंतूंची क्रिया बंद झाली, व त्यामुळें पाय लुला पडला.

विकाराचें हें कारण कळून आल्यावर त्या रोग्याची योग्य समजूत घातली; व त्यानंतर त्या संबंधीची भीति मनांतून गेल्याबरोबर त्याचा पाय सुधारावयास लागला.

## ९ भुताटकीचे म्हणून समजले जाणारे चमत्कारांची उपपत्ति.

### ( अ ) बासनांतील कपडा जळणें.

पदार्थ ओला झाला व तो तसाच राहिला म्हणजे तो कधीं कधीं कुजतो व त्याच्या कुजण्यामुळें phosphoresoence म्हणजे ज्वलनावांचून प्रकाश उत्पन्न होतो. एक कळकाची ढलपी कुजून तिच्यांत अशी क्रिया झाल्या-

मुळें ती अंधारांत तेजोमय दिसत असे हें लेखकानें एकदां प्रत्यक्ष पाहिलें आहे. अशा स्थितींत त्या वस्तूची राख अथवा राखेमारखा भुगा होणेंही संभवनीय आहे.

## ( आ ) पिशाचाचें घरांत हिंडणें.

घराच्या ज्या भागामध्यें माणसांचा वापर विशेष नसतो त्यामध्यें ( विशेषतः रात्रीं ) उंदीर, घूस, ऊद इत्यादि प्राणी वावरतात; व त्यांच्या पावलांचा आवाजावरून माणसांच्या पावलांचा भास होतो. कडिपाटास टांगलेले व लोंबणारे कांहीं पदार्थ वाऱ्यामुळें हालून त्यांचा जो आवाज होतो त्याबद्दल माहिती नसल्यानें, असे आवाज भुताटकींचे चमत्कार म्हणून कधीं कधीं वाटतात.

भुताटकीविषयीं प्रसिद्ध असलेल्या इमारतींत धीट माणसें राहिली असतां त्यांना कांहीं झालें नाहीं अशीं अनेक उदाहरणें आहेत.

## ( इ ) पिशाचाचें गाणें, ओरडणें इ०.

टेकडी, झाडें, दरी यांस वारा अडल्यानें, वाळूच्या अथवा पाल्याच्या वाहण्यानें, झाडें एकमेकावर घासल्यानें, भिन्न प्रकारचे आवाज होत असतात, व त्याचें कारण दृष्टीस न पडल्यामुळें ते कोणा भूतपिशाचाचें ओरडणें अथवा गाणें असावें असें वाटते. यासंबंधांत ' रघुवंश ' काव्यामधील

" स कीचकैर्मारुतपूर्णरंध्रैः कूजद्भिरापादितवंशकृत्यं "

असें एक वर्णन आहे तें लक्षांत घेण्याजोगें आहे.

## ( ई ) वेताळाची स्वारी इ०.

रानांत मरून सडून गेलेल्या जनावरांचीं हाडें कुजून त्यांपासून कांहीं वायु ( Marsh gas इ०) निघतात व ते कांहीं कारणानें पेटून त्यांचा जाळ होतो. यांस इंग्रजींत 'Will o' the wisp', 'jack with the lantern' अशीं नांवें आहेत.

अशा प्रकारचा उजेड किंवा लांबून जाणाऱ्या माणसाच्या हातांतील कंदिलाचा उजेड यावरून वेताळाच्या स्वारीची कल्पना निघाली असावी.

## (उ) देवऋष्यांचे अथवा भूतविद्यावाल्यांचे अद्भुत चमत्कार.

भूतपिशाचादिकांच्या साह्यानें म्हणून जे चमत्कार केले जातात त्यांमध्यें तसा भाग नसून युक्ति अथवा कांहीं नैसर्गिक शक्ति हाच मुख्य भाग असतो. यास प्रमाण हें कीं, हेच चमत्कार धंदेवाले जादूगार करून दाखवितात. यासंबंधानें पॉडमोअर यांच्या Spiritualism या ग्रंथांतील पुढील उतारा पहा:—

When Maskelyne and Cooke presented at the Crystal Palace a performance in imitation of that by the Davenports, some spiritualists found the imitation so complete that they knew no escape from the conclusion that Maskelyne and Cooke were themselves spirit mediums.

भुताटकीच्या चमत्कारांसंबंधानें हें लक्षांत ठेवणें जरूर आहे कीं, कांहीं चमत्कार नैसर्गिक असतात, तर कांहीं स्वार्थसाधु लोकांनींही उत्पन्न केलेले असतात. कलकत्याकडे एका बंगल्यांतील विजेचे दिवे एका दिवशीं आपोआप वारंवार विझूं लागले तेव्हां तो चमत्कार प्रथम भुताटकीचा वाटला; पण तो यंत्रांतील बिघाडामुळें आहे असें मागाहून समजून आलें. धोंडे फेकणें, कपडे फाडणें वगैरे प्रकार जवळचे खोडकर लोकच बहुधा करतात. भर उजेडांत, भर वस्तींत अथवा धीट सुशिक्षित लोकांचे समोर, असले चमत्कार कां घडत नाहींत ही गोष्ट विचार करण्यासारखी आहे.

### ह्या गूढसामर्थ्यांबद्दल न मिळालेला पुरावा.

कांहीं माणसांना गूढ सामर्थ्यानें (पिशाचांच्या साह्यानें) वाटेल तें करतां येतें अशी कांहीं लोकांची समजूत आहे; पण त्याबद्दल शास्त्रज्ञांना खात्रीचा पुरावा मिळालेला नाहीं. बंद केलेल्या पेटींतील जिन्नस नाहींसा होणें वगैरे जे चमत्कार कांहीं लोक करतात ते हातचलाखी किंवा तंत्र ह्यांच्या साह्यानेंच केलेले असतात असें मानण्यास आधार आहे. कारण, जेथें तंत्रास

बिलकुल वाव नाहीं तेथें असले चमत्कार करून दाखवितां येत नाहींत. उदाहरणार्थ "( १ ) लाकडाच्या कड्या एकींत एक अडकवाव्या;

( २ ) काचेच्या कपाटांत घालून ठेवलेल्या व एका केसाच्याही वजनाचा सूक्ष्म फरक दाखविणाऱ्या पारड्याचें वजन गूढ सामर्थ्यानें एक सहस्रांश ग्रेनच्या ( $\frac{1}{2000}$ गुंजेच्या ) वजनानें वाढवून दाखवावें;

( ३ ) शुद्ध पाणी भरून तोंड बंद करून ठेवलेल्या नळींत एक सहस्रांश ग्रेन सोमल घालवून दाखवावा;"

अशा ज्या मागण्या शास्त्रज्ञांनीं केल्या आहेत त्याप्रमाणें कृति करण्यास कोणी पुढें आलें नाहीं. +

कांहीं मध्यस्थ अंधारांत आपल्या तोंडांतून जें पिशाचद्रव्य काढून त्याला चेहेऱ्याचें वगैरे रूप प्राप्त झालेलें दाखवितात तें द्रव्य पोटांत लपविलेलें एक प्रकारचें पातळ कापड ( Cheese cloth ) असतें व तें गिळून ठेऊन आयत्या वेळीं पोटांतून काढण्याचा अभ्यास मध्यस्थांनीं केलेला असतो असें शोधकांना आढळून आलेलें आहे.

आजपर्यंत शास्त्रज्ञांपुढें जे प्रयोग झाले त्यांमध्यें निःसंदेह खरा × असा

---

+ The scientific investigator naturally asks that an additional weight (if it be only the $\frac{1}{1000}$ th part of a grain) be deposited on one pan of the balance when the case is locked, and the chemist asks for the thousandth of a grain of arsenic to be carried through the sides of a glass tube in which pure water is hermetically sealed.

—The "Newer Spiritualism," by Podmore.

× शास्त्रज्ञांना खरे वाटलेले चमत्कार मागाहून लबाडीचे ठरल्याबद्दल अनेक उदाहरणें आहेत. यासंबंधांत शिकागो येथील "चमत्कारसंशोधक मंडळाचे" नंबर १९ चें पत्रक पहा.

एकच चमत्कार आढळून आला आहे, असें परवांपर्यंत वाटत होतें. तो हा कीं, कांहीं व्यक्तींना वारा, उष्णता वगैरे शक्ति उत्पन्न करून थोड्या अंतरावरचे पदार्थ हालवितां येतात. तथापि खेदाची गोष्ट ही कीं, हा चमत्कार दाखविणारा प्रसिद्ध मध्यस्थ रुडि स्नायडर हाही एकदां लबाडी करतांना आढळला. अमेरिकेंतील प्रसिद्ध National Laboratory of Psychical Research या संस्थेचे संस्थापक प्राइस साहेब हे आपल्या 'Leaves from a Psychist's Case Book' या पुस्तकांत लिहितात कीं, त्यांना आजपर्यंत एकही प्रामाणिक मध्यस्थ आढळला नाहीं. स्नायडरविषयीं ते लिहितात.

"The stereoscopic camera revealed the fact that Rudi had managed to free his left arm and put it behind his back.... The medium's explanation was that the arm was a spirit one."

'पण तुमच्या कपड्यांसारखेच, मृतात्म्याचे कपडे आहेत व पिशाचाचा म्हणना तो हात तुमचाच आहे' असें प्राइससाहेबांनीं स्नायडरला दाखविलें, तेव्हां तो कांहीं बोलला नाहीं.

ही गूढ शक्ति खरी मानली, तरी अशा प्रकारची शक्ति ज्यांच्यामध्यें असते तीं माणसं बुद्धिमत्ता किंवा नीति या बाबतींत इतर मोठ्या माणसांप्रमाणें नसतात, एवढेंच नव्हे तर तीं अगदीं सामान्य दर्जाचीं व कधीं कधीं कमी दर्जाचीं असतात; यावरून ही शक्ति कांहीं माणसांचा नैसर्गिक धर्म आहे, व अशा धर्माबद्दल त्यांच्यांत भूतपिशाचांचा संचार झाल्याचें किंवा त्यांना अवतार किंवा सत्पुरुष मानण्याचें कांहींच कारण नाहीं असें दिसून येईल.

ह्या चमत्कारांच्या अविश्वसनीयतेबद्दल पुढील आधार पहा:—

'I have never seen a trustworthy instance of any of these occurrences. भावार्थ—असला चमत्कार माझ्या पाहण्यांत नाहीं.

The simplest thing for me is to treat the case of matter through matter as not only unproved but as impossible & to decline to consider it.

—सर ऑ० लॉज यांनीं १९०२ सालीं केलेलें अध्यक्षीय भाषण.

---

# प्रकरण १० वें.

## लबाडी, हातचलाखी इत्यादि साधनांनीं केले जाणारे चमत्कार.

### १ ग्रहांच्या दृष्टीची शांति.

एक ज्योतिषी पुढील चमत्कार दाखवीत. दुष्ट ग्रहाच्या शांतीसाठीं कांहीं विधि करतांना, ते पाण्यांत केशर घालीत, व तें केशर जळून काळें झालें आहे असें दाखवून मंत्राच्या प्रभावानें पाप अथवा ग्रहांची प्रतिकूल शक्ति भस्मसात् झाली आहे अशी ग्रहपीडितांची समजूत करीत. यांत त्यांची युक्ति ही होती कीं, गंधकाच्या तेजाबासारखे कांहीं रासायनिक द्रव्य केशरांत घालावयाच्या पाण्यांत कांहीं युक्तीनें ते मिसळत असत.

हेच ज्योतिषी कांहींना ग्रहशांत्यर्थ करावयाच्या विधींत 'एकाद्या धातूचें भांडें वापरावयाचें सोडून देण्याचा नियम करणें अवश्य आहे' असें सांगून या कामासाठीं अल्युमिनियम धातु वर्ज्य करणें सोईचें आहे असें सुचवीत. तें मान्य झालें, म्हणजे अल्युमिनियमच्या भांड्यावर कांहीं विधि अथवा मंत्रतंत्र करून, तें भांडें एका बाजूस ठेवून देण्यास सांगत, व 'तुम्हाला त्रास देणारी दुष्ट शक्ति तुम्हांस पीडा करण्याऐवजीं या भांड्याचा नाश

करील तें पहा ' असें सांगत. कांहीं वेळानें तें भांडें, त्याची थोडी थोडी पूड होऊन, झिजत जात आहे असें आढळून येई, व त्यावरून 'आपल्यास त्रास देणाऱ्या शक्तीचा व्यय अथवा नाश झाला' असें गिन्हाइकास वाटे.

या प्रयोगांतील गूढ हें कीं Mercury chloride या द्रव्याची पूड अल्युमिनियमच्या भांड्यावर घासली म्हणजे वरील प्रकारची स्थिति कांहीं वेळानें होते.

## २ चिठ्ठींतील प्रश्न ओळखणें.

एक ज्योतिषी सांगत "तुम्ही तीन चिठ्ठयांवर मिळून एक प्रश्न लिहा. प्रत्येक चिठ्ठीवर दोन तीन अक्षरापेक्षां जास्त अक्षरें नसलेलीं बरीं, कारण गणित करण्यास फार त्रास पडतो इ०". ह्या चिठ्ठयांच्या गोळ्या करून ते प्रश्न विचारणारास रमलचा फासा देऊन तो टाकण्यास सांगत, व त्या वेळचें लग्न मांडून गणित करून 'या चिठ्ठींत अमुक अक्षरें आहेत' असें सांगून ती चिठ्ठी उचलून उघडून तींत तीं अक्षरें आहेत असें दाखवीत. 'चिठ्ठी प्रथमच मला पाहूं द्या' असें कोणीं म्हटल्यास 'मला ही विद्या अद्याप पूर्णपणें साधली नाहीं, म्हणून स्वतः चिठ्ठी पाहून उत्तर खरें आहे असें पाहिलें म्हणजे धीर येतो' असें सांगत.

या चमत्कारांतील युक्ति पुढीलप्रमाणें होती. ज्योतिष्यांच्या हातांत चिठ्ठयांच्या गोळ्या दिल्यावर, ते आपल्या हातांतील एका कोऱ्या चिठ्ठीची गोळी त्या तीन गोळ्यांत मिसळून त्यांतील एक हातांत ठेवून घेत, व गणित करण्यासाठीं म्हणून बाजूला जाऊन बसून कांहीं तरी आंकडे मांडत त्या वेळीं ही चिठ्ठी उघडून पहात असत. नंतर 'ह्या चिठ्ठींत अमुक मजकूर आहे' असें म्हणून खालीं ठेवल्यांपैकीं एक चिठ्ठी उचलीत, व ती उघडल्यावर तीच म्हणून हातचलाखीनें पूर्वी उघडून वाचलेली चिठ्ठी पुढें करीत. नंतर उचलून घेतलेली चिठ्ठी गणित करण्याचे मिष करीत असतां उघडून वाचीत व खालची एक गोळी उचलून तींत'......असा मजकूर आहे' असें सांगून पूर्वी उघडून वाचलेली चिठ्ठी ते हातचलाखीने पुढें करीत. हा प्रयोग करण्यास जोशीबोवा संध्याकाळीं दिवेलागणी-

नंतरच नेहमीं येत असत व भिंतीशीं अथवा कोपऱ्यांत बसत असत; त्यामुळें हातचलाखी करणें सोपें जाई.

'चिठ्ठयांच्या गोळ्या न करतां त्या पाकिटांत बंद करून तुमच्या हातांत देतो व नंतर तुम्ही चिठ्ठींतील मजकूर सांगा' असे सांगितल्यानंतर 'उशीर झाला' असें जोशीबोवा म्हणूं लागले; पण त्यांनां बसवून घेऊन प्रयोग करविला तेव्हां जोशीबोवा चिठ्ठयांतील प्रश्न सांगण्यास सर्वस्वीं असमर्थ झाले. त्यानंतर कांहींतरी सबब सांगून हा प्रयोग त्यांनीं पुन्हा कधींही केला नाहीं.

ह्या प्रयोगाचा दुसरा एक प्रकार असा आहे कीं, चिठ्ठयांच्या गोळ्या करून त्या एका 'यंत्र' लिहिलेल्या फळीवर अथवा पुठ्ठयावर आपटावयाच्या, व त्या जोशीबोवांनीं गोळा करून वरीलसारख्या कृतीनें एकामागून एक त्यांतील मजकूर सांगावयाचा. यामध्येंही, गोळ्या उचलतांना त्यांत जवळची एक गोळी घालून त्यांतील एक आपले जवळ ठेवणें व गणित करण्याच्या मिषानें एका बाजूस बसून ती वाचून पहाणें, ही युक्ति आहे.

याचा तिसरा प्रकार—बंद केलेल्या पाकिटांतील प्रश्न कांहीं लोक सांगतात त्यासंबंधानें दोन युक्त्या योजण्यांत येतात असा आमचा तर्क आहे. त्या येणेंप्रमाणें.

( १ ) पाकिटास मद्यार्क ( alcohol ) लावला असतां कागद पारदर्शक होतो व आंतील मजकूर अंशतः दिसतो. थोड्या वेळानें पाकिटाचा कागद वाळून पूर्ववत होतो.

( २ ) वाफेवर पाकीट धरलें म्हणजे त्याचा डिंक ओला होऊन तें उघडतां येतें. तसेंच सीलाचा ठसा प्लॅस्टिसीनसारख्या पदार्थावर घेऊन फिरून सील पहिल्यासारखें तयार करतां येतें.

### ३ कागदाचीं चित्रें, आंगठा, भावली इ. चालवणें

हा प्रयोग रात्रीं करण्यांत येतो. हा प्रयोग करतांना प्रयोग करणारा आपल्यासमोर एक देवाची मूर्ति किंवा भावलें ठेवतो. त्यास एका

केसाचें टोंक चिकटविलेलें असतें व त्याचें दुसरें टोक हातांत धरलेलें असतें. या केसावर कागदाची बाहुली टाकली अथवा केसांत आंगठी अडकवली, म्हणजे केस हालविल्यानें भावली किंवा आंगठी नाचते.

हा प्रयोग दिवसा सूर्यप्रकाशांत कधींही करण्यांत येत नाहीं यावरून यांतील रहस्य लक्षात येईल.

## ४ पोटांत शाळिग्राम ठेवणारे साधु.

मी लहानपणीं स्वतः पुढील चमत्कार पाहिला. एकदा एक संन्याशी जेवणास आला असता त्यानें, पानें वाढून झाल्यावर, गळ्यावर हात ठेवून तोंडांतून शाळिग्राम काढला, त्यास वाढलेल्या पानाचा नैवेद्य दाखविला व तो शाळिग्राम गिळून त्यावर जेवण केलें. ह्या चमत्काराचा बोभाटा झाल्यावर लोक बरेच संन्याशीबोवाकडे आले व बोवांना दोन तासांत दहापांच रुपयाची प्राप्ति झाली. ह्या चमत्काराचा उलगडा कांहीं दिवसांपूर्वी 'सकाळ' वर्तमानपत्रांत आलेल्या पुढील हकीकतीवरून होईलः—

## " हिरा गिळणारा चोर

कलकत्ता. ता. १३–एके दिवशीं दुपारच्या वेळीं कलकत्त्यांतील एका प्रसिद्ध सराफाच्या दुकानापुढें एक "मिलॉर्ड" फैटन उभी राहिली व त्यांतून एक गृहस्थ उतरले. दुकानाच्या मालकानें त्या गृहस्थाचें योग्य तें स्वागत केलें व त्यांला हिरे दाखविण्यासाठीं 'शो'केसकडे घेऊन गेला. हिरे पहात असतां त्या गृहस्थानें एकदम एक मोठा मौल्यवान् हिरा तोंडांत टाकला व तो गिळला ! त्याबरोबर बरीच गडबड उडून पोलिसांची मदत मागविण्यांत आली. पण त्यांनाही कांहीं करतां येईना. शेवटीं त्याला एक ड्रश देण्यांत येऊन पंपिंग टयूब्सही त्याच्या घशांत घालण्यांत आल्या तरी सुद्धां त्याचा कांहीं उपयोग न होता त्या गृहस्थाला सोडून देण्यांत आलें. चार वर्षांनंतर तो चोर मुम्बई येथें हिरा विकण्याचा प्रयत्न करीत असतां त्यास पकडण्यांत आलें. त्याच्यांवर भरण्यांत आलेल्या खटल्यांत दोषी ठरून न्यायाधिशानीं त्याला बराच दंड व शिक्षाही केली. त्यावेळी तो गृहस्थ म्हणाला "बहुधा तुरुंगातून मी जीवंत परत येणार

नाहीं. तेव्हां तुमच्या परवानगीनें मी जगाला कांहीं तरी आश्चर्यकारक माहिती सांगतों. मीं तो हिरा कसा लपवून ठेवला हें कोणास माहित नाहीं. माकडाप्रमाणें माणसांलाहि घशांत खळगे असतात व त्यांची इच्छा असल्यास आपलें अन्न त्यांना त्यांत ठेवतां येतें. लहानपणासून ह्या पिशव्यांचा उपयोग न केल्यामुळें पुढें त्या काम करीनाशा होतात. मी लहानपणापासून त्यांचा उपयोग करीत आलों आहें. मीं हिरा चोरला तो या पिशवींत ढकलला, म्हणून डूशचा व पंपिंग टयूबचा परिणाम माझ्यावर कांहीं झाला नाहीं."

मुंबइचा प्रसिद्ध 'बाबू चष्मेवाला' यानें तोंडांत लपविलेला चाकू कोर्टांत काढून दाखविल्याचें वर्तमानपत्रांत आलें होतें.

याप्रमाणें पुष्कळ सरावानें घशांतील खळग्यांत पदार्थ लपवून ठेवण्याचें सामर्थ्य येतें, असें अनेक उदाहरणांवरून दिसतें.

## ५ जादुगारांमधलि सामना.

जादुगारांमध्यें सामना होऊन एका जादुगारानें दुसऱ्याची पुंगी बंद करणें वगैरे चमत्कार घडल्याच्या बातम्या वर्तमानपत्रांतून मधून मधून येतात. असल्या चमत्कारांमध्यें सिद्धसाधकपणाचा भाग बहुधा असतो. पुणें येथें असे प्रयोग करून 'हा प्रयोग अमक्या तायताच्या साहाय्यानें होतो' असें सांगून ताईत विकण्यांत येतात व भोळे लोक ते विकत घेतात. जादूनें पुंगी बंद करतां येत असेल तर आमच्या माणसाकडून वाजविलेलें वाद्य बंद करण्याचा प्रयोग पुण्यास कोणींहि जादुगारानें करून आमच्या समक्ष दाखविल्यास त्यास पारितोषिक देण्याची आमची तयारी आहे.

## ६ आगगाडी थांबविणें.

वऱ्हाडमधील एक कलेक्टर आपला अनुभव पुढीलप्रमाणें सांगतातः—

"एकदा आगगाडींतून प्रवास करीत असतां...स्टेशनाजवळच्या रस्त्यावरून गाडी जात असतांना बरोबरच्या शिपायानें सांगितले कीं, 'अमूक

साधु आगगाडी थांबवतो;' व एका विवक्षित ठिकाणाजवळ आगगाडी आल्यावर त्यानें त्यांना बाहेर डोकावून पाहण्यास सांगितलें तों साधूनें हात वर केल्यावर गाडी खरोखरीच थांबली, आणि त्या साधूस गाडींतील लोकांनीं चवल्यापावल्या दिल्या, असा चमत्कार दृष्टीस पडला. पुढें रेल्वेअधिकाऱ्यांकडे चौकशी करतां पुढीलप्रमाणें हकीकत समजली. 'रेल्वेवरील पूल जुने झाले असतां त्यांची परीक्षा करण्याची जी पद्धति आहे त्या पद्धतीप्रमाणें परीक्षा करण्यासाठीं विवक्षित पुलाजवळ गाडी थांबवून सावकाश चालवावयाची अशी वहिवाट आहे. ह्या वहिवाटीप्रमाणें कोणत्या पुलाजवळ गाडी थांबावयाची याबद्दल रेल्वेकडील नोकरांकडून सदरहू साधु अगाऊ बातमी काढतो व त्या जागीं उभा राहून हात वर करतो. तेथें गाडी थांबून सावकाश जावयाची हें ठरलेलेंच असतें; पण ते उतारूंना माहीत नसल्यामुळें व त्या साधूच्या साथिदारांनीं साधूच्या सामर्थ्याची बातमी पसरविली असल्यामुळें साधूनें वर हात केल्यानेंच आगगाडी थांबते अशी लोकांची समजूत झाली आहे. हा साधु पूर्वी शिक्षा झालेला असा एक लबाड मनुष्य आहे...' इ०.

हें कळल्यानंतर त्या साधूची पोलिसांकडून योग्य ती संभावना करविली."

### ७ नारायणतेलाचा चमत्कार.

नारायण तेल म्हणून एक आयुर्वेदीय औषध आहे. त्याचा अद्भुत गुण लोकांस पटावा म्हणून कांहीं भोंदु वैदु हातचलाखीनें असें दाखवितात कीं, तें तेल हाताच्या एका अंगास चोळलें असतां दुसऱ्या बाजूनें तें बाहेर पडतें. ही केवळ हातचलाखी आहे.

हे तेल वायूच्या विकारावर गुणकारी आहे, परंतु त्याच्या गुणकारीपणाशीं वरील चमत्काराचा कार्यकारणसंबंध मुळींच नाहीं.

### ८ किमयेनें सोनें करणें, जटांतून पाणी काढणें, इ०.

ह्यांत हातचलाखीचाच प्रकार असतो.

## प्रकरण ११ वें.

## भूतभविष्य जाणण्याचीं, यश संपादण्याचीं वगैरे अद्भुत साधनें.

### १ त्रिकालदर्शी आरसा, स्फटिक, आंगठी इ०.

हे पाहणारांना जीं दृश्यें दिसतात त्यांची उपपत्ति पुढीलप्रमाणें आहेः—

या आरशाकडे किंवा आंगठीच्या खड्याकडे टक लावून पाहिल्यानें मेंदूस शीण येऊन गुंगी अथवा अर्धवट झोंप येते, व झोंपेंत जसें स्वप्न पडतें त्याप्रमाणें, अथवा विचारणाराच्या प्रश्नाच्या अनुरोधानें, त्या आरशाकडे पाहणाऱ्या मनुष्यास स्वप्न पडूं लागतें, किंवा तो तो भास होऊं लागतो. हा भासच असतो, वस्तुस्थिति नव्हे ही गोष्ट, ह्या देखाव्यांतील माहिती खोटी ठरते या प्रत्यक्ष अनुभवानें कळून येण्यासारखी आहे. ह्या देखाव्यांत कल्पनेप्रमाणें भास होत असतो व कल्पना ही संभवनीय गोष्टीस धरून असते, म्हणून हा देखावा कधीं कधीं खरा ठरतो. यामुळें 'अमका मनुष्य आतां काय करतो' या प्रश्नाचें उत्तर कधीं कधीं बरोबर येतें; पण हरवलेली वस्तु कोठें आहे याचें उत्तर येऊनही तें बहुतेक प्रसंगीं चुकलेलें ठरतें

मध्यंतरीं कांहीं दिवस जाऊनच तोच प्रश्न फिरून विचारला, किंवा अशा निरनिराळ्या प्रयोगांत तोच प्रश्न निरनिराळ्या माणसांस विचारला, तर उत्तरें निरनिराळीं येतात. या अनुभवांवरून, अशा प्रसंगीं दिसणाऱ्या गोष्टी खऱ्या नसून पाहणाऱ्या किंवा सांगणाऱ्या त्या त्या माणसांना होणारा तो केवळ भास असतो, असें दिसून येईल.

### २ ताईत, कवच, मंतरलेला दोरा, अंगारा इ०.

यांचा जो कधीं कधीं उपयोग होतो असें वाटतें तो एक आपोआप घडणारी गोष्ट असते, किंवा तो श्रद्धेमुळें झालेला असतो. अशा साधनांचा उपयोग व करणाऱ्या मन सदाच अवलंबून असलेल्या

लोकांना यश मिळणें, अडचण दूर होणें हे फायदे आपोआप होतात की नाहींत? जर होत असले, तर ह्या साधनांचा उपयोग करणारास ते झाले, म्हणजे त्या साधनांनींच झालें असें म्हणण्यास आधार काय? हे फायदे त्यांना इतरापेक्षां जास्त प्रमाणांत होतात असें प्रत्यक्ष आंकड्यांनी ( per-centage नें ) दाखविण्यास कोणी तयार आहे काय? हीं साधनें इतरांस देणाऱ्या लोकांना स्वतःच्या बाबतींत किती वेळा अपयश येतें हें पाहिल्यानेंही ह्या साधनांची उपयुक्तता किती असते याची कल्पना येण्यासारखी आहे.

एकाच खटल्यांतील वादी प्रतिवादी, तसेंच एकाच सामन्यांतील भिन्न प्रतिपक्षी यांनीं हीं साधनें वापरल्यास दोन्ही पक्षांस यश येईल काय याचा विचार केल्यानेंही या उपायांचें वैयर्थ्य कळून येणार आहे.

## ३ भूतभविष्यज्ञान.

### भूतभविष्य कधीं कधीं खरें ठरतें त्याची उपपत्ति.

हें खरें ठरतें याचें कारण हें सांगणारास कार्यकारणसंबंधाचे गूढ नियम माहीत असतात किंवा कांहीं दैविक शक्ति असते हें नसून तें पुढील असावें असें वाटतें:—

( १ ) काकतालीय न्याय अथवा घुणाक्षर न्याय,

( २ ) चाणाक्षपणा अथवा तर्क,

( ३ ) Telepathy ( एका मनाचा दुसऱ्या मनावर परिणाम होऊन ज्ञान प्राप्त होणें ); ज्यास मनकवडेपणा म्हणतात तो याचाच एक प्रकार असावा. Telepathy च्या पुराव्याबद्दल Scientific American मध्यें १९३४ सालीं आलेले लेख पहावे.

( ४ ) सर्व माणसांमध्यें कमी जास्त मानानें असणारी भविष्यदर्शन-शक्ति. ही मानण्यास थोडासा ( पुष्कळ नव्हे ) शास्त्रीय आधार अलीकडे मिळालेला आहे. यासंबंधानें Dunne यांचे an Experiment with Time ह्या पुस्तकांत सप्रयोग माहिती दिली आहे. ह्या कल्पनेचा जास्त खुलासा Serial Time या नवीन पुस्तकांत त्यांनीं केला आहे.

तथापि ही गोष्ट अद्याप शास्त्रज्ञांना मान्य झालेली नाहीं हें लक्षांत ठेवणें अवश्य आहे. त्यांच्या मतें अशीं भविष्यें खरें ठरण्याचें कारण, कधीं तर्क तर कधीं काकतालीयन्याय, हेंच असणें जास्त संभवनीय आहे.

( ५ ) स्वयंसूचना ( auto suggestion ) अथवा श्रद्धा. स्वतःची स्थिति किंवा कृति अमूक होणार अशी भावना पूर्ण झाली, म्हणजे भावनेमुळें तशी स्थिति होते; अथवा श्रद्धेमुळें तसें करण्याची कांहींच्या मनाची प्रवृत्ति होते. यासंबंधाचीं कांहीं उदाहरणें तिसऱ्या प्रकारणांत सांपडतील.

वरील (३) व (४) कारणांसंबंधानें पुरेसा पुरावा नाहीं. म्हणून हीं कारणें मानावीं असा प्रस्तुत लेखकाचा मुळींच आग्रह नाहीं. त्यांच्या-संबंधानें लेखकाचें म्हणणें एवढेंच कीं, इतर गूढ कारणांपेक्षां हीं कारणें सापेक्षत्वें जास्त विश्वसनीय आहेत.

वरील कल्पनांसंबंधीं पुढील उदाहरणें पहाः—

**मनकवडेपणा**–दुसऱ्याच्या मनांतल्या गोष्टी कांहीं लोक सांगूं शकतात याबद्दल उदाहरणें.

प्रसिद्ध ज्योतिषी कै० बाबाजीराव महाडकर अथवा पटवर्धन यांच्याबद्दल पुढील गोष्टी सांगतातः—

( १ ) ते उमरावतीस गेले असतां तेथें काणे वकील यांना त्यांनीं 'आपला मुलगा मांडीवर बसला आहे अशी कल्पना करा म्हणजे त्याची कुंडली मांडून दाखवितो ' असें सांगितलें, व थोड्या वेळानें ते म्हणाले 'मुलाचे तोंड तुमचेकडे आहे तें माझ्याकडे करा ' मुलाचें तोंड त्यांनीं सांगितल्याप्रमाणेंच प्रथम रा. काणे यांनीं कल्पिलें होतें ही गोष्ट खरी होती.

( २ ) याच ज्योतिष्यांनीं लोकमान्य टिळकांना, मनांत एकादा स्नेही आणण्यास सांगितलें. त्यांनीं मटंगेबोवा नांवांचे स्नेही मनांत आणतां, त्यांचीच कुंडली महाडकरांनीं मांडून दाखविली.

( ३ ) एका गृहस्थांनीं दत्ताची मूर्ति मनांत धरली असतां ती गोष्ट महाडकरांनीं बरोबर सांगितली.

( ४ ) महाडकरांचे भेटीच्या वेळीं...सहस्रबुद्धे या गृहस्थांचे खिशांत त्यांची स्वतःची कुंडली होती, व ती वास्तविकपणें चुकलेली होती असें त्यांना मागाहून निश्चितपणें सप्रमाण कळलें. तथापि महाडकरांच्या भेटीच्या वेळीं तीच कुंडली सहस्रबुद्धे याच्या मनांत घोळत होती, व तीच महाडकरांनीं सांगितली.

आपल्या मनांतील दोनतीन प्रश्न कोणते हें एका ज्योतिष्यानें बरोबर सांगितले असा अनुभव श्री. अरविंद घोष यांनीं सांगितला आहे.

श्री० न. चिं. केळकर यांना एका बंगाली गृहस्थानें, त्यांनीं मनांत धरलेला Paths of glory lead but to the grave हा चरण सांगितला.

पंडित दुर्गाप्रसाद यांविषयीं वरीलसारख्या अनेक आख्यायिका आहेत. कै० सु० एंजिनीयर...असें सांगत कीं, त्यांनीं मनांत धरलेला सन, महिना, तारीख हीं दुर्गाप्रसादांनीं सांगितली एवढेंच नव्हे तर संध्याकाळीं ज्या टांग्यांत ते फिरावयास गेले त्याचा नंबर त्या दिवशीं सकाळीं एका पाकिटांत लिहून ठेवला होता !

वरील सर्व चमत्कार मनकवडेपणाचेच आहेत व त्यांत कांहीं अन्य प्रकार नाहीं, असा आमचा आग्रह नाहीं हें विसरूं नये !

अद्‌भुत भविष्यकथनसामर्थ्य—

"Evangeline Adams never made any contribution to the science of astrology. Her usual method was simply to look up a consultant's birthday in the ephemeris & read off a delineation from it, without troubling to erect a map."

( भावार्थ—कुंडली न मांडतां ई. ॲडॅम्स या जन्मदिवसावरून फलें सांगत असत. )

—Carter's "Astrology" Page 178, Vol. 6, No. 4.

एका olairvoyante नें सांगितलेली पुढील भविष्यें खरीं ठरली असा आपला अनुभव एका गृहस्थांनीं २७ जून १९३२च्या जॉन ओ लंडन्स वुइक्लीमध्यें सांगितला आहे—

"एक मोटार अपघात दिसतो; एक डैम्लर ( Daimler ) मोटार व दुसरी फोर्ड मोटार यांची टक्कर होईल व एक मनुष्य मरेल."

२ "तुमच्या ओळखीच्या माणसास गर्भार असलेली adder जातीची सर्पीण चावेल."

३ "तुम्ही कोपऱ्यावर वळत असतां तुमच्या गाडीचें चाक हातांत निघून येईल."

४ "तुमच्या घराजवळ कोणास डांग्या खोकला होईल; पण तुमच्या मुलीस तो येणार नाहीं."

५ "तुमचा हरवलेला जिन्नस माळी घेऊन येईल. तो त्यास बागेंतील वाळूचे दोन रस्ते जेथें मिळतात, तेथें गुलाबाच्या झाडाखालीं सांपडेल."

ह्या सर्व गोष्टी अगदीं बरोबर घडल्या, अशी ते गृहस्थ ग्वाही देतात. (ह्यावर विश्वास ठेवावा असें आमचें म्हणणें नाहीं हें लक्षांत ठेवावें.)

सहावें ज्ञानेंद्रिय—

कांहीं लोकांना दिव्य दृष्टि किंवा सहावें ज्ञानेंद्रिय ( sixth sense ) असावें अशी कांहीं युरोपियनांची कल्पना आहे. यासंबंधानें प्रसिद्ध इटालियन प्रवासी व शोधक कमांडर गॅट्टी ( Gatti) यांचे अनुभवः—

गूढ दिशाज्ञान—

"माझ्या आफ्रिकन नोकरांतील अत्यंत बेअकल्या माणसास मीं एका झोपडींत नेलें, त्याचे डोळे बांधले, व त्याला गरागरा वाटोळें फिरविलें. फिरवितांना मध्येंच थांबून, "सूर्य कोणीकडे उगवतो तें दाखीव" म्हणून मी त्याला विचारलें. असें दहा बारा वेळां विचारलें, व प्रत्येक वेळीं त्यानें दिशा बरोबर दाखविली !

भूमिगत पाण्याचें ज्ञान—

द० आफ्रिकेंतील कारूच्या निर्जल प्रदेशांतून प्रवास करीत असतां,

पाणी आणण्यास सैपाक्यास पाठविलें व दोन तासांनंतर तो दोन बादल्या भरून घेऊन आला. पाणी कोठून आणलें हें पाहण्यास आम्ही त्याचे-बरोबर गेलो तेव्हां असें दिसून आलें कीं, एका जागीं त्यानें तीन फूट खळगा खणला होता व त्यांत तळाशीं पाण्याचा झरा लागला होता. त्या जागीं पाणी लागेल अशीं बाह्य लक्षणें कसलींही दिसत नव्हतीं ! असाच अनुभव आणखी दोन वेळा आला.''

भाविपर्जन्यज्ञान—

''पावसाचीं लक्षणें दिसत नसतां व वायुभारमापक यंत्र हवा 'कोरडी' आहे असें दाखवीत असतां एकदा सैपाक्यास विचारलें, 'पाऊस केव्हां पडेल ?' 'आज' असें त्यानें उत्तर दिलें व खरोखरीं तिसऱ्या प्रहरीं मुसळधार पाऊस सुरू झाला !''

घ्राणेंद्रियाची तीक्ष्णता—

''जंगलांत मीं एकट्यानें शिकार मारली व जनावर सोलूं लागतों तों कांहीं तद्देशीय लोक इकडे येत आहेसें दिसलें. बंदुकीच्या आवाजानें ते आले असावे असें म्हणावें, तर आदल्या दिवशीं बंदुकीचा नेम चुकला तेव्हां कोणीही आलें नव्हतें !''

दिव्यदृष्टि—

''परदेशी प्रवाशी आल्याचीच नव्हे, तर तो कशा प्रकारचा आहे, त्याचें नांव काय वगैरे बातमीही आफ्रिकेच्या रानटी लोकांना अगाऊ समजलेली असते, असें अनेक वेळा आढळून आलें आहे.''

—१० फेब्रुवारी १९३४चा John o' London's Weekly चा अंक.

ढोलग्याच्या आवाजावर कांहीं संकेत बसविलेले असतात व त्यांच्या साहाय्यानें रानटी लोक बातमी एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं लागो-पाठ पाठवितात हें वरील चमत्काराचें इंगित असावें असें कांहीं म्हणतात.

काकतालीय न्याय—

ए. बी. फ्रेंच हे गृहस्थ लिहितातः—

'' माझा जन्म सातव्या महिन्याच्या सातव्या दिवशीं झाला. मी

जन्मल्यापासून प्रथम सातव्या दिवशीं आजारी पडलों, सातव्या परीक्षेंत प्रथमच नापास झालों व मागणी घातलेल्या मुलींपैकीं सातवीनें माझा स्वीकार केला."

ऑक्सफर्ड येथील आर्थर ह्युजेस हे लिहितात "ट्रॅफल्गारच्या लढाईची जी २१ आक्टोबर तारीख तीच माझी जन्मतारीख असून मी माझ्या एकविसाव्या वर्षी ट्राफलगार रस्त्यावर २१ नंबरच्या जागीं रहात होतों !"

म्हणावें तसें कधीं कधीं होतें यासंबंधानें प्रसिद्ध जादूगार हाउडिनी आपला अनुभव पुढीलप्रमाणें सागतातः—

"मी एकदा मिस्टर अर्नेस्ट यांच्या घरीं असतांना, पावसामुळें मुलांना दारूकाम उडवितां येईना. तेव्हां मुलांपैकीं एक मजजवळ येऊन म्हणाला 'तुम्हाला पाऊस बंद करतां येत नाहीं का'!... मी वर हात करून तीन वेळां म्हणालों 'पावसा, थांब.' दोन मिनिटांनीं पाऊस थांबला. दारू उडवून झाल्यावर एक मुलगा मजजवळ आला व म्हणाला 'तुम्ही म्हणाला नसता तरी पाऊस थांबलाच असता कीं नाहीं !' मी म्हणालों 'असें काय ! बरें दाखवितों' असें म्हणून मी बाहेर गेलों व वर हात करून म्हणालों—'पर्जन्याच्या राजा, फिरून पाऊस पाड.' आश्चर्याची गोष्ट ही कीं, फिरून पावसाची सर आली !"

मनांत येणारी कल्पना व तिची सफलता यासंबंधानें John o' London's Weekly या पत्रामध्यें आलेलीं चमत्काराचीं पुढील उदाहरणें पहा—

लग्नविधीचे वेळीं ख्रिश्चन लोकांमध्यें वर वधूला आंगठी देत असतो. अशा एका ख्रिस्ती लग्नाच्या वेळीं, वरास आंगठी सांपडेना म्हणून उपाध्याय लग्नविधि तहकूब करण्याच्या विचारांत होते. इतक्यांत जमलेल्या मंडळींतील एक बाई पुढें आली व विचारूं लागली कीं 'वरांना चिलीम ओढण्याची सवय आहे का !' 'बरें त्याचा काय संबंध' असें विचारतां ती म्हणाली 'चिलीम काढून पहा बरें, तींत आंगठी आहे का'! तसें करतां खरोखरींच चिलमींत आंगठी आढळून आली ! 'हें तुम्हांस कसें सुचलें' म्हणून विचारतां ती म्हणाली 'मी आज सकाळीं वर्तमानपत्र वाचीत

असतां अधीच हरवलेली आंगठी पुढें खिलमींत सापडली असें वाचलें व त्यावरून मला ही कल्पना सुचली' !

निरनिराळे गृहस्थ पुढीलप्रमाणें अनुभव सांगतातः—

( १ ) " आमच्या कारखान्यांतील micro-meter हरवला व 'तो कुठें पाहिला का ?' म्हणून मला एकानें विचारलें; मी तो पाहिला नव्हता पण माझ्या मनांत कल्पना आली व मी म्हणालों, 'त्या बादलींत आहे का पहा बरें;' आणि पाहतात तों तो तेथेंच सांपडला."

( २ ) " एकादें पत्र सापडेना म्हणजे मी कांहीं वेळ स्वस्थ बसतो म्हणजे थोड्या वेळांत माझ्या मनांत तें पत्र अमक्या ठिकाणीं असावें अशी कल्पना येते, व त्याप्रमाणें जाऊन पहावें तों तें पत्र तेथें सांपडतें ! "

( ३ ) "एकदा एक प्रसिद्ध बजवय्ये, त्यांची मुलगी व मी एका जलशांत साथीनें सातारीचें वादन करीत आहोंत असें मला स्वप्न पडलें. त्यापूर्वी मी त्या बजवय्याकडे गेलों देखील नव्हतों हें स्वप्न मी आपल्या डॉक्टरनां सांगितले तेव्हां ते म्हणाले 'या बजवय्यांना एक मुलगी आहे खरीच, व तिच्या सतारीला कांहीं अपघात झाल्याबद्दल मला आजच सकाळीं पत्र आलें आहे."

( ४ ) " कुटुंबानें एक नवीन मोलकरीण ठेवली तिचें नांव काय म्हणून विचारतां ती म्हणाली 'मी विचारण्यास विसरलें'! त्यावेळीं तेथें माझी दोन मुलें होतीं. त्यांपैकीं एकानें एक मांजराचें पिलू बाळगलें होतें व त्याचें नांव Bessilow असें ठेवले होतें. मूल थट्टेनें म्हणालें 'आपण तिला बेसिलो म्हणूं या'. पुढें मोलकरीण आली तेव्हां तिचें नांव Bessie Law असेंच होतें असें आढळून आलें."

( ५ ) एक गृहस्थ रेडिओ सेटजवळ बसून हातांत एक नाणें घेऊन त्यानें लाऊड-स्पीकर हाताळीत असतां त्यांचे हातांतून तें नाणें पडलें व व्हाल्व्हमध्यें गेलें, तों त्यांतून That is his spare cash(म्हणजे 'ही त्याच्या जवळची नक्त शिल्लक रकम होय' ) असे शब्द आले.

श्री० चिंतामणराव वैद्य पुढील हकीकत सांगतातः—

" ग्वाल्हेर संस्थानचे माजी अधिपति महाराज माधवराव शिंदे हे फ्रान्सला जावयास निघाले होते. बंदरावर निरोप देणाऱ्या मंडळींनी त्यांचें आयुरारोग्य चिंतिलें आणि "आपण सुखरूप परत याल" अशी उत्कट इच्छाही प्रदर्शित केली. पण यावर " मी बहुधा येणार नाहीं" असें श्री. माधवराव यांनीं उत्तर दिलें. या उत्तराचा खुलासा करतांना ते म्हणाले "नव्वद वर्षांपूर्वी आमच्या राज्यांत हिंदु लोकांनीं मोहरमचा सण साजरा केला नाहीं, आणि संस्थानचे अधिपति मरण पावले. यंदाच्या वर्षी माझ्या राज्यांत एक डोला जाळला गेला आणि त्यामुळें माझीही आयुर्मर्यादा संपुष्टांत आली असें मला वाटतें ". आश्चर्याची गोष्ट ही कीं, माधवराव हे फ्रान्समधून परत आले नाहींत; त्यांचा तिकडेच अंत झाला."

—आगष्ट १९३२च्या 'ज्ञानप्रकाश'वरून.

भविष्यास अनुसरून स्वतः कृति केल्यामुळें सफल ठरणाऱ्या भविष्याचीं उदाहरणें:—

"भविष्यकथनामुळें आत्महत्त्या.

अनैसर्गिक मृत्यु प्राप्त होईल असें एका ज्योतिष्यानें सांगितल्यावरून रंगूनमधील एका बंगाली बाईनें आत्महत्या केल्याची बातमी प्रसिद्ध झाली आहे. ऑफिसांतून परत आल्यावर दार बंद असल्यामुळें नवऱ्यानें दार ठोठावलें, पण आंतून उत्तर न आल्यामुळें त्यानें तें दार फोडलें व आंत प्रवेश केला तों त्याच्या बायकोनें आपल्या साडीचा गळफांस करून आपल्याला टांगून घेतलें होतें असें आढळून आलें. खोलींत त्याला एक पत्र आढळलें, त्या पत्रांत खालील मजकूर होता.

'कांहीं दिवसापूर्वी एका ज्योतिषानें मला माझा मृत्यु अनैसर्गिक रीतीनें होईल असें सांगितल्यामुळें मला एकसारखी जळजळ लागली होती व त्यांतून मुक्तता करण्याकरतां मीं आज टांगून घेतलें आहे.'

अशुभभविष्यकथनाचा परिणाम स्त्रियांच्या कोमल हृदयावर तावडतोब होतो, तेव्हां ज्योतिष्यांनीं अशुभभविष्यकथन करण्यांत ज्याप्रमाणें खबरदारी घेणें अवश्य आहे त्याचप्रमाणें स्त्रियांनींही आपलें भविष्य

समजावून घेण्याच्या फंदांत न पडणें हेंही जरूर आहे. ''

--१४।२।१९३३च्या दैनिक 'सकाळ' वरून.

अशीं दुसरीं उदाहरणेंही पाहण्यांत आहेत.

## ४ पूर्वसूचना ( Premonition )

भावी वृत्तांची सूचना स्वप्नांमध्यें, किंवा मनांत आपोआप उत्पन्न होणाऱ्या भावनांनीं, मिळते अशी बऱ्याच लोकांची समजूत आहे; पण तींत तथ्य फारच थोडें आहे. अशा सूचना बहुतेक खोटया ठरतात म्हणून त्यांमुळें भिऊन जाण्याचें कारण नाहीं.

पूर्वभावना ( premonition ) खरी ठरल्याचीं उदाहरणें आहेत त्यामानानें खोटीं ठरल्याचीं उदाहरणें पुष्कळच जास्त आहेत. पुढील एक उदाहरण पहा —

सेनापति शुर्झ Schurz यांची चॅन्सेलर्सव्हिल ( यु० स्टेटस ऑफ अमेरिका यांतील एक ठिकाण ) येथें झालेल्या लढाईच्या आधल्या रात्रीं ' आपण उद्या लढाईंत मरणार ' अशी भावना झाली. सकाळीं उठल्यानंतर ती भावना घालविण्याचा त्यांनीं पुष्कळ प्रयत्न केला, पण ती जाईना. शेवटीं त्यांनीं आपले नातेवाईक व स्नेही यांस'शेवटचीं'म्हणून पत्रें लिहिलीं. लढाईस जातांनाही 'आपला हा शेवटचा दिवस आहे' ही त्यांची भावना कायम होती. लढाई सुरू झाल्यावर त्यांचा aid-de camp त्यांच्या-बरोबर आघाडीकडे दौडत असतां तोफेचा गोळा लागून ठार झाला. शुर्झ हे लढाईच्या अगदीं ऐन गर्दींत लढत होते, तथापि त्यांच्या जिवास कांहींही अपाय झाला नाहीं. झाला असता तर त्यांचे आप्तेष्टांना हें पूर्वसूचनेच्या सत्यतेचें उदाहरण वाटून त्यांची समजूत दृढ झाली असती.

( पूर्वभावना सूचक असतात असें मानणारे म्हणतील कीं, शुर्झचें मरण त्याच्या एडीकाँवर गेलें. पण तर्कनिष्ठास हें पटणार नाहीं. )

---

## प्रकरण १२ वें.

## कांहीं चमत्कार व त्यांची उपपत्ति.

### १ हात दिव्यावर धरून तो जळतोसा दाखविणें.

ही गोष्ट स्पिरिटच्या म्हणजे मद्यार्काच्या साहाय्यानें करतां येते. स्पिरिटमध्यें बोट बुडवून तें दिव्यावर धरलें तर तें जळूं लागल्यासारखें दिसतें, पण स्पिरिट जळून जातांच ज्वाला बंद होते व बोटास फारशी इजा होत नाहीं. ही गोष्ट कोणासही पाहतां येईल.

### २ लोखंडाचे रसांत हात घालणें.

यासंबंधानें पुढील आख्यायिका प्रसिद्ध आहे. सातवे एडवर्ड बादशहा लहान असतांना एकदां एक लोखंड गाळण्याचा कारखाना पाहण्यास गेले होते. आंत लोखंडाचा रस असलेल्या एका कढईजवळ ते गेले तेव्हां बरोबर असलेले शास्त्रज्ञ त्यांना म्हणाले 'रसांत हात बुडवा व लागलीच काढा.' तसें त्यांनीं लागलीच केलें, व आश्चर्याची गोष्ट ही कीं, त्यांचे हातास कांहींही इजा झाली नाहीं. याचें कारण पुढील आहे. इंग्लंडच्या हवेंत दमटपणा बराच असतो त्यामुळें हातास किंचित् ओलावा असतो. रसांत हात घातला असतां, हाताभोंवतीं जो थोडासा ओलावा असतो त्याची वाफ होऊन तिचे हाताभोंवतीं आवरण तयार होतें, व त्यामुळें तप्तरसाचा संबंध त्वचेशीं येत नाहीं, म्हणून तिचें रक्षण होतें.

### ( ३ ) निखाऱ्यांवरून चालत जाणें.

चरांत लांकडे जाळून त्यांचा निखारा करून त्यांवरून चालत जाण्याचा प्रयोग कांहीं ठिकाणीं करतात. ह्या प्रयोगांत निखाऱ्यांवरून चालत जाणारांचे पाय भाजत नाहींत हा मंत्राचा किंवा तेथील देवतेच्या विशेष कृपेचा प्रभाव असें समजलें जातें. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं, तशा स्थितींत व तसें चालत जाण्यानें केव्हांहि व कोणालाहि विशेष इजा

होत नाहीं. यांचीं कारणें पुढील होतः—( १ ) पायाची कातडी जाड असल्यामुळें तिला फारसा चटका बसत नाहीं; ( २ ) पाय निखाऱ्यांवर फार वेळ रहात नाहीं म्हणून भाजण्यास पुरता वेळ मिळत नाही; ( ३ ) भाजणें म्हणजे जळणें, यांस हवा लागते, ती सपाट पाऊल निखाऱ्यावर पडतें तेव्हां तळपायास मिळत नाहीं.

हवा मिळणें व न मिळणें यानें जळण्याच्या क्रियेंत काय फरक होतो तो पाहण्यासाठीं पुढील प्रयोग कराः—

फुलपात्र अथवा तपेली पालथी ठेवून त्याचे बुडावर एक फडकें पसरून तें ताणून भांड्याभोंवतीं गुंडाळावें आणि बुडावरील कापडावर एक निखारा ठेवावा; म्हणजे बराच वेळपर्यंत कापड जळत नाहीं असें दिसून येईल. नंतर तेंच अथवा तसलें फडकें अधांतरीं ताणून धरून त्यावर निखारा ठेवावा, म्हणजे लागलीच तो फडकें जाळून त्यांतून खालीं पडेल. हा जो फरक पडतो तो फडक्यास खालून हवा लागणें व न लागणें यावरूनच केवळ पडतो असें दिसून येईल, आणि यावरून सपाट निखाऱ्यांवर सपाट तळपाय पडला असतां पाय फारसा जळत कां नाहीं त्याचें कारण समजून येईल.

निखाऱ्यावरून चालत जाण्याचा प्रयोग करणाऱ्यांना ‘ निखाऱ्यावर मंत्र घालून तो आमच्या फडक्यावर टाका व निखारा फडकें जाळींत नाहीं असें दाखवा ’ असें म्हटलें असतां, ते हा प्रयोग करण्याचें नाकारतात, असा आमचा अनुभव आहे. तसा प्रयोग कोणी दाखविण्यास तयार असल्यास कळवावें.

निखाऱ्यांवरून चालण्यासंबंधानें, पुण्यास डेक्कन जिमखान्यावर, मंत्रावांचून प्रत्यक्ष प्रयोग केला होता, तेव्हां वरील वस्तुस्थिति शेंदीडशें सुशिक्षित लोकांच्या अनुभवास आलेली आहे.

## ( ४ ) साप खाणें.

सर्व साप विषारी असतात व साप खाल्ला असतां मनुष्य मरतो या दोन्ही समजुती निराधार आहेत. सापाचें विष पोटांत गेल्यास पोटांतील पाचक रसामुळें विष निरुपद्रवी होतें. म्हणून विषारी साप खाल्ला तरी

मृत्यु येत नाहीं. तथापि हें ध्यानांत ठेवावें कीं, साप खाण्याचा प्रयोग करणारे लोक सामान्यतः बिनविषारी साप खातात. दोन तीन प्रसंगीं ही गोष्ट तज्ज्ञांनीं पाहिलेली आहे.

## ( ५ ) सर्परूपधारी पूर्वज किंवा देवता.

कांही ठिकांणीं जे साप निघतात ते माणसांना चावत नाहीत एवढेंच नव्हे तर ते माणसांनीं हातांत घेतले तरीहि चावत नाहीत यावरून ते ( १ ) देवता, किंवा (२) त्या ठिकाणीं राहणाऱ्या लोकांचा कोणी पूर्वज असावा अशा कल्पना प्रचलित आहेत, व ह्या कल्पनेमुळें त्यांची पूजाहि करण्यांत येते. ह्यापैकीं दुसऱ्या विधानाबद्दल आम्हांस कांहीहि म्हणावयाचें नाही. आम्हांस सांगावयाचें तें एवढेंच कीं, हे साप चावत नाहीत व हात लावूं देतात हा ह्या समजुतीला जो आधार घेतला आहे, त्यांत तथ्य नाही. कोणताहि साप माणसास चावण्यास टपलेला असतो व त्यास हात लावला कीं तो चावावयाचाच, ही समजूत चुकीची आहे. धरले असतां न चावणारे साप अनेक आहेत. मंत्रावांचून केवळ युक्तीनें नाग धरून त्याचा खेळ करणारे अनेक लोक आहेत. यावरून व सातारा जिल्ह्यांतील बत्तीस शिराळें गांवीं नागपंचमीच्या दिवशीं नायकुळे जातीचे साप वाटेल तो मनुष्य–मुलेंहि—हातांत धरतो व तो साप बहुधा चावत नाही यावरून वरील गोष्ट समजून येईल.

## ( ६ ) काच, खिळे खाणें; ॲसिड पिणें इ.

तीक्ष्ण टोंकांचे पदार्थ खाण्यापासून कांहीं इजा होते हें सामान्यतः खरें आहे; पण अनेक वेळां इजा मुळींच होत नाहीं हेंही अनुभवसिद्ध आहे. शिवाय सवय व युक्ति यांच्या साहाय्यानें ह्यापासून होणारी इजा पुष्कळच कमी करणें शक्य आहे. या बाबतींत पुढील गोष्टी लक्षांत ठेवाव्याः—

काचेचे तुकडे पोटांत गेले असतां लागलीच आजार होतो किंवा मृत्यु येतो ही गोष्ट अगदीं खोटी आहे. गमतीनें काच खाल्ली पण कांहींहि झालें नाही अशीं सामान्य माणसांची प्रत्यक्ष उदाहरणें दाखवितां येण्यासारखीं आहेत.

कांहीं माणसें प्रसिद्धि मिळविण्याचे इच्छेमुळें अथवा विक्षिप्तपणामुळें काय करूं शकतात याबद्दल पुढील उदाहरण पहा; म्हणजे त्यावरून ह्या गोष्टी करणारे लोकांमध्यें गूढशक्ति असते असें मानण्याचें कारण नाहीं असें दिसून येईल.

" मि. एडवर्डस यांच्या पोटांत आढळून आलेल्या वस्तूंची यादी पुढीलप्रमाणें आहेः—

२०० बारीक खिळे, ३६ खिळे, ४३ ग्रॅमोफोनच्या पिना, ६ चहाचे चमचे, ३ काटे, ४ पेन्स, २ हॉफ पेन्स, १ शिलिंग, ३ किल्ल्या, १ पिस्तुलाचें जिर्ते काडतूस, १ पितळेची तोटी, ३ चाकू, ४ सुया, ५ बोल्टस, ३ नटस्, १हूक, १घड्याळाची चावी, १टायपिन, १ मोटार सायकलच्या टायरची व्हाल्व्ह, १ सायकलची व्हाल्व्ह, ४ कॉलरचीं बटनें, १ गॅसबर्नर, १ रोल्डगोल्ड आंगठी, १ घड्याळाची किल्ली, १ गोटा, १३ काचेचे तुकडे, ९ स्क्रू, ७ पडद्याच्या रिंज. "

—दैनिक ' सकाळ '

यासंबंधानें डॉ० लोरंडो या तज्ञांचें मत पहाः—

"मुलें व हिस्टेरिया झालेले किंवा वेडे लोक सुयाखिळ्यांसारखे पदार्थ कधीं कधीं खातात पण त्यांपासून त्यांच्या आंतड्यांस इजा झाली आहे असें आढळून येत नाहीं. एका बाईनें गिळलेली सुई कांहीं दिवसांनीं तिच्या मळाबरोबर पडल्याचें डॉ० M... यांना आढळून आलें. एक्सनर यांनीं केलेल्या प्रयोगांवरूनही ही गोष्ट दिसून येते. त्यांनीं कुत्र्यांना सुया व टोकाचे इतर पदार्थ खाऊं घातले व ते सर्व मळाबरोबर बाहेर आले. असे पदार्थ आतड्यांतून जातांना त्यांच्या थोड्या टोचण्यामुळें त्यांच्या पुढला आंतड्याच्या भाग फुगून त्यांना जणू काय वाट करून देत असे असें दिसून आलें. यावरून अशा पदार्थांपासून घसा व अन्ननलिका यांपेक्षां आंतड्यास इजा होण्याचा संभव कमी असतो असें म्हणावें लागतें."

—पान ४६, डॉ० लोरँडो यांचा ' Health through Rational Diet,' हा ग्रंथ.

यावरून, असले पदार्थ खाल्ल्यानें विशेष इजा तावडतोब झाली पाहिजे किंवा मृत्यु आला पाहिजे ही जी पुष्कळ लोकांची कल्पना आहे ती बरोबर नाहीं, असें कळून येईल.

संवय केल्यानें, भाजणाऱ्या पदार्थोंची दाहकता पुष्कळ कमी भासते व सैपाक करणारीं माणसें निखारे व कढत भांडीं सहज उचलतात हा नेहमींचा अनुभव आहे. १०-२० माणसें मरतील इतकी अफू व सोमल रोज खाणारीं माणसें आहेत. डी क्किन्से हा प्रसिद्ध इंग्लिश ग्रंथकार एकेका दिवसांत लॉडेनम म्हणजे अफूचा द्राव याचे दहा हजार थेंब कधीं कधीं घेत असे! संवय केल्यानें व आल्कलीसारख्या प्रतिकारक औषधांचा आधीं किंवा मागाहून उपयोग केल्यानें, ॲसिडपासून होणारी इजा पुष्कळ कमी करतां येण्यासारखी आहे.

यासंबंधाच्या हकीकतींत कधीं कधीं वर्तमानपत्रकर्त्यांच्या चुकीमुळे अथवा अन्य कारणांनीं अतिशयोक्तिहि होते. प्रो. राव हे मुंबईच्या प्रयोगांत एक औंस नायट्रिक ॲसिड प्याले अशी 'टाइम्स'मध्यें बातमी होती; पण खरोखरीं एक ड्राम ॲसिड घेतलें होतें अशी वस्तुस्थिति आहे, व हिला प्रत्यक्ष हजर असलेल्या माणसांच्या साक्षीचा आधार आहे.

सराव करण्यानें, काचा, खिळे वगैरे गिळलेले जिन्नस कांहीं वेळानंतर बाहेर काढून टाकतां येतात व त्यायोगें त्यापासून होणारी इजा टाळतां येते. ह्या व असल्या कृतींत धाडस व कौशल्य आहे हें नाकबूल नाहीं. फक्त यांत कांहीं गूढ योगसामर्थ्य किंवा मंत्रसामर्थ्य नाहीं असें आमचें म्हणणें आहे.

वरीलसारखे प्रयोग करणारे बंगालमधील नरसिंगस्वामी हे शेवटीं अशा एका प्रयोगानंतर वारले. यावरून हा, सर्कशींतील वाघसिंहाच्या खेळासारखा एक धाडसाचा व कौशल्याचा खेळ आहे असें दिसून येईल.

"His two main practices were concentration & the eating of arsenic. Also on the night before each performance he would drink a whole bottle of native alcohol.

He also was in the habit of eating ganja mixed with arsenic. After each performance he used to take a great deal of alcohol and lie in a drugged slumber for 24 hours. —Pages 56-58, "The Naked Ascetic" by Victor Dane.

सर रामन् हे प्रख्यात शास्त्रज्ञ नरसिंगस्वामींच्या प्रयोगाचे वेळीं हजर होते व त्यांची त्याच्या यौगिक सामर्थ्याबद्दल खात्री झाली वगैरे जी बातमी वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झाली होती ती यथार्थ नाही.

श्री० रामन् यांना या बाबतींत पाठविलेल्या पत्राच्या उत्तरांत ते म्हणतातः—

" I entirely agree with you that there is no question of Nar Singhaswamy possessing any ocult powers. The other explanations suggested by you are entirely correct. "

## ७ मारुतीच्या नेत्रांतून येणाऱ्या अश्रूंचा चमत्कार.

" मार्डे येथील श्री. उटगीकर वकील १९३२ आक्टोबरच्या ज्ञानप्रकाशांत लिहितात."

आपल्या पत्रांत येथील रा....कर वकील यांचे घराजवळचे मारुतीचे देवळांतील मूर्तीचे डोळयांतून सारखें पाणी वहात आहे अशी बातमी प्रसिद्ध झाल्यापासून बऱ्याच लोकांकडून मला या चमत्काराचा खुलासा करणेविषयीं पत्रें आलीं आहेत. या जिज्ञासूंना व्यक्तिशः उत्तरें देणें शक्य नसल्यामुळें माझ्या अल्प समजुतीप्रमाणें मी खालील खुलासा आपले पत्रांत करीत आहें.

" आमचे घराशेजारची मारुतीची मूर्ति अश्रूपात करीत आहे, अशी वदंता कानीं पडताच मीं देवळांत जाऊन मूर्तीचे सर्वांगास स्पर्श करून पाहिलें. पण माझे हातास पाणी कोठेंच लागेना; कारण तें वाळून गेलें असलें पाहिजे. मात्र माझी बोटें चिकट तेलानें भरलीं. मूर्तीचे पायाखालीं पाणी सांचलेलें दिसलें. मूर्तीचे अंगावर मेण बरेच वर्षांपासून सांचलेलें असलेमुळें तें ठिकठिकाणीं मऊ होऊन त्यांतून

तेलाचा अंश पाझरत होता. मेण मऊ होऊन पाझरण्याचें कारण, कोणी तरी मारुतिभक्तानें मूर्तीस कढत पाण्याचें स्नान घातलें असावें असें वरील चिन्हांवरून मला दिसलें; म्हणून दुसरे दिवशीं देवाची मूर्ति साफ व स्वच्छ करवली तेव्हां लोकांस दिसत असलेला चमत्कार एकदम बंद झाला."

## ८ मारुतीचें मुख काळें पडणें.

" पूर्णा येथील हनुमानमंदिरांतील मारुतीच्या मूर्तीचें मुख काळें पडलें म्हणून गांवांत बातमी पसरली व भाविकांची आणि इतरांची देवळांत भयंकर गर्दी उसळली. देवता कोपली म्हणून गांवांत वर्गणी होऊन प्रकोपशांतिप्रीत्यर्थ पूजा वगैरे कार्यक्रम सुरू झाले. पण मूर्तीस स्नान घालण्यांत आलें तेव्हां कळलें कीं, कोणी उपद्यापी इसमानें मूर्तीच्या तोंडावर काळा रंग फासला होता."

—ज्ञानप्रकाश ता. २७ जुलै १९३४.

"ओपनकोर्ट" मासिकाच्या १९३४ च्या आक्टोबर महिन्याच्या अंकांत, कैरो येथील अमेरिकन युनिव्हर्सिटींतील एक प्रोफेसर मॅक्केल रॉय यांनीं, रिफैया पंथाच्या दरवेशांच्या एका अधिवेशनाच्या वेळीं दरवेशांनीं केलेले जे चमत्कार त्यांनीं पाहिले, ते वर्णिले आहेत. ते पुढीलप्रमाणें:—

" ( १ ) दिव्याच्या चिमणीची काच दांतांनीं फोडून खाणें.

( २ ) सळईचे शेवटास लावलेला कापडाचा बोळा बेंझिन तेलांत बुडवून तो पेटविणें व तोंडांत घालणें. खडीसाखरेचा खडा बेंझिन तेलांत बुचकळून तो पेटविणें व नंतर तो तोंडांत धरणें.

( ३ ) अंगांत सुया टोचणें.

( ४ ) तरवार तापवून तिची धार जिभेवरून फिरविणें.

( ५ ) पोटांत तरवारीचें टोंक खुपसणें. "

कापडाचा बोळा सळईच्या टोंकास लाऊन तो राकेलांत बुडवून पेटविणें व तो तोंडांत घालणें हा प्रकार मी प्रत्यक्ष पाहिलेला आहे. त्याचा खुलासा मला पुढीलप्रमाणें वाटतो.

तोंडाला हळू हळू सवय करणें हा या प्रयोगांतला एक भाग आहेच; पण युक्तीचा भाग हा आहे कीं, बोळा तोंडांत घालतांना त्याला तोंडांतून थोडथोडा वारा घालून त्याच्या ज्वाला तोंडाबाहेर राहतील अशी तजवीज करणें. अशा प्रयोगांत जाळ बहुतेक तोंडाबाहेर असतो व त्याची दिशा आडवी असते यावरून तो परिणाम तोंडांतून घातलेल्या वाऱ्याचा असावा असें अनुमान निघतें.

## ९ माहामारीचे जंतूंचा नाश करण्याचा गंगा नदीचे पाण्यांतील धर्म.

असा धर्म गंगेच्या पाण्यांत आहे म्हणून ह्या पाण्याची पवित्रता इतर पाण्यापेक्षां विशेष आहे असें कांहींचें म्हणणें आहे. यासंबंधानें वस्तुस्थिति पुढीलप्रमाणें आहे.

रोगजंतु शरीरांत गेले म्हणजे त्यांचा नाश करण्यासाठीं प्रतिविष उत्पन्न करण्याचा धर्म सर्व प्राण्यांचे शरिरांत कमीजास्त मानानें असतो. ह्या धर्मास अनुसरून महामारी झालेल्या माणसांच्या अंगांत प्रतिविष उत्पन्न होतें व त्यापैकीं कांहीं त्यांच्या मलाबरोबर बाहेर पडतें. हे मल ज्या पाण्यांत जातात त्यामध्यें ह्या मलांतील प्रतिविषामुळें विषूचिका-(म्हणजे कॉलरा)-जंतुनाशक धर्म आलेला असतो. असा धर्म गंगेशिवाय इतर नद्यांच्या अशा प्रकारच्या पाण्यामध्यें (म्हणजे ज्यांमध्यें गांवांतील घाणपाणी वाहून जाते त्यांमध्यें) आलेला असतो. प्रयोगाअंतीं हा धर्म गंगेपेक्षां यमुनेच्या पाण्यामध्यें जास्त आढळून आला. काशी येथें वरच्या भागांतील गंगेचा जो प्रवाह आहे त्याच्या पाण्यांत हा धर्म तितका नाहीं हेंही प्रयोगाअंतीं आढळून आलें आहे.

गांवाजवळच्या गंगेच्या प्रवाहाच्या पाण्यामध्यें हा धर्म असला तरी त्यामध्यें विषुचिकाजंतु मुळींच नसतात असें नाहीं, हें काशी येथें व हरद्वार इत्यादि अन्य क्षेत्रीं महामारीच्या साथी येतात एवढेंच नव्हे, तर शहराच्या वरच्या भागांतील प्रवाहाचें जें पाणी गांवांत नळानें आणलें

आहे तें पिणाऱ्या लोकांमध्यें अमांश, कॉलरा हे विकार कमी होतात यावरून सिद्ध होतें.

यासंबंधांत Indian Journal of Medical Research च्या १९२९ च्या एप्रिल महिन्याच्या अंकांत ९९३–१००८ या पानांवर तज्ज्ञांचा लेख आहे तो जिज्ञासूंनीं अवश्य पहावा.

## १० गाईच्या शेणामधील विषूचिकाजंतुनाशक धर्म.

हा धर्म गाईच्याच शेणांत असतो असें नसून पूर्वी सांगितलेल्या तत्त्वाप्रमाणें तो इतर प्राण्यांच्या विष्टेमध्येंही कमजास्त मानानें असतो. उदाहरणार्थ, तो कोंबडीं, डुकरें, घोडे, म्हैस, ससे, बकरी यांच्या विष्टेंत असतो, असें यासंबंधानें शोध करणारे प्रख्यात फ्रेंच शास्त्रज्ञ प्रो० F. D' Herelle यांनीं आपल्या ग्रंथांमध्यें लिहिलें आहे.

पाणी व प्राणी यांचा माणसास होणारा उपयोग पाहिला तर सर्व जल व सर्व प्राणी एका अर्थी पवित्रच आहेत व त्यांना तसें मानणें व प्राण्यांना दयेनें वागविणें हें योग्यच आहे. मात्र यांत एवढा प्रमाद होऊं देऊं नये कीं, एकादा धर्म अनेकांत असतां त्याचें श्रेय विशिष्ट व्यक्तीसच द्यावयाचें.

## ११ क्रिस्ताच्या जखमांतून रक्त वाहण्याचा साक्षात्कार.

रोमन कॅथॉलिक पंथाच्या ख्रिस्ती लोकांमध्यें प्रभुभोजन म्हणून एक धर्मविधि आहे. त्यामध्यें पाव व मद्य यांच्या ठिकाणीं क्रिस्ताचें मांस व रक्त यांची भावना करून त्यांचा प्रसाद वाटण्यांत येतो, व तो सेवन करणाऱ्यांचे शरीरांत पाव व मद्य यांचें, क्रिस्ताचे मांस व रक्त यांत रूपांतर होतें, अशी समजूत आहे. हा जो अभिमंत्रित पाव, तो ठेवला असतां कांहीं कालानंतर त्यास कधीं कधीं रक्तासारखे डाग पडलेले आढळून येतात. त्यासंबंधानें पूर्वी अशी समजूत रूढ झाली होती कीं, सैतानास वश झालेल्या एखाद्या पापी व्यक्तीनें क्रिस्ताच्या शरीरास जखमी करण्याचे हेतूनें त्या पावास शस्त्रानें भोसकल्यामुळें पावरूपी

शरीरांतून रक्त येऊन ते डाग पडलेले असावे. एकाद्या घरांत या पावास असें पडलेले डाग पाहिल्यानंतर या प्रकारचा संशय येऊन त्यांतील मंडळींचा छळ केल्यावर, त्यांनीं पावांत चाकू भोसकल्याचें कबूल केलें व त्याबद्दल त्यांना जिवंत जाळलें अशा गोष्टी मागें अनेकवार घडलेल्या आहेत. ब्रुसेल्स येथें १३७० सालीं ज्यू लोकांची कत्तल केली त्यास असलेंच कारण घडलें असें म्हणतात. ज्यू अथवा यहुदी लोक क्रिस्तास मानीत नाहींत. जो क्रिस्त म्हणून होऊन गेला तो तोतया होता, व खरा प्रेषित अद्याप यावयाचा आहे असें त्यांचें मत आहे. अर्थात् क्रिस्ताच्या द्वेषामुळें यहुदी लोक किंवा सैतानवश चेटके लोक मंत्रित पावांत शस्त्र भोसकण्याचें कृत्य करीत असावे, अशी खिस्ती लोकांची शंका असे. ही जी यहुदी लोकांची कत्तल केली तिचें स्मारक म्हणून ब्रुसेल्स येथील साधु गुडूलचें जें प्रार्थनामंदिर आहे त्याचे तावदानास रंगीत काचा लावलेल्या आहेत ! यहुदी लोकांचा व चेटक्यांचा अशा प्रकारचा छळ इतर देशांतही घडल्याचें इतिहासांत आहे.

यासंबंधानें वस्तुस्थिति पुढीलप्रमाणें आहे. Bacillus prodigiosus जातीचे सूक्ष्म जंतु आहेत त्यांची वाढ पावामध्यें होऊन त्यास तांबडे डाग पडतात त्यामुळें हा चमत्कार घडतो. छळ केल्यावर लोकांनीं कबुली दिली याचें इंगित पुष्कळ लोकांस माहीत असेल कीं, छळाच्या यातना संपविण्यासाठीं मनुष्य ‘ होय, मी केलें ’ अशी खोटी कबूली देतो. अर्थात् या चमत्कारांबद्दल अनेक लोकांचा जो छळ झाला तो अज्ञानमूलक व अयोग्य होता.

## १२ बर्फानें पेटलेली लोखंडी गाडी.

व्हर्जिनिया प्रांतांत १९०० सालीं एका लोखंडी गाडींत, पोलादी चरकावर लोखंडाचे तुकडे घासल्यानंतर पडणारा भुगा भरला होता. ती आपोआप पेटून त्याबरोबर सबंध गाडी जळून गेली. याचें कारण असें सांगतात कीं, भुग्यावर बर्फ पडून त्याच्या पाण्याचा लोखंडाच्या भुग्याशीं संयोग होऊन अग्नि उत्पन्न झाला.

## १३ मॅग्नेटिझम्, हिप्नॉटिझम्, मेस्मेरिझम् इ०.

यासंबंधानें पुष्कळांची अशी समजूत आहे कीं, मेस्मराइझ करणाराच्या अंगांतून एक प्रकारचा ( विद्युत्, जीवनद्रव्य वगैरेचा ) प्रवाह निघून तो दुसऱ्या माणसाच्या अंगामध्यें जातो. परंतु ही समजूत खरी नसून ह्यासंबंधाचे सर्व चमत्कार, गुंगी येऊन मन एकाग्र होणें व त्या स्थितींत 'सूचने'चा मनावर परिणाम होणें यामुळें घडतात, असें आतां सिद्ध झालें आहे.

मेस्मेराइझ करतांना एकसारखी नजर लावण्यास सांगितलें जातें, त्यामुळें मेंदू थकून गुंगी अथवा अर्धवट झोप येते. एक दोन वेळां अशी झोप आली म्हणजे पुढें सवईमुळें व सूचनेमुळें अशा प्रयोगानें झोप लवकर येते. या झोपेंत, मेस्मराइझ करणाऱ्या व्यक्तीनें ज्या सूचना कराव्या, त्याप्रमाणें भास व कृति होते.

मेस्मराइझ करणारानें हात लावलेलें पाणी दिल्यानें, झोंप येणें वगैरे चमत्कार होतात, ते मेस्मेराइझ करणाराच्या हातांतून पाण्यांत विद्युत्-प्रवाह अथवा दुसऱ्या कसल्या शक्तीचा प्रवाह गेल्यामुळें होतात अशी प्रथम समजूत होती. परंतु मेस्मराइझ करणारानें पाण्यास हात न लावतां "त्यानें हात लावला आहे" किंवा "त्यानें मंतरलें आहे" असें दुसरें कोणी सांगितल्यानें तोच परिणाम होतो असा अनुभव अनेक प्रसंगीं आल्यावरून पूर्वींची कल्पना खोटी ठरली आहे, व हे परिणाम भावनेचे किंवा सूचनेचे असतात असें शास्त्रज्ञांचें मतें ठरलेलें आहे.

———

# प्रकरण १३ वें.

## भ्रमास कारणभूत होणाऱ्या अज्ञानाचे कांहीं प्रकार.

### १ सर्पाविषयीं चुकीच्या समजुती.

१ सर्व साप विषारी असतात. हें खोटें आहे; सुमारें एक चतुर्थांश जाती विषारी आहेत.

२ काळ्या सापाचें विष फार भयंकर असतें.
खुलासा—विषाची तीव्रता सापाच्या रंगावर मुळींच अवलंबून नाहीं.

३ विरोळ्याचें विष आदितवारीं बाधतें, पण एरव्हीं बाधत नाहीं.
खुलासा—विरोळयास विष नसतेंच.

४ आग्या मण्यारीची सावली पडल्यानेंहि मनुष्य मरतो. खुलासा—मण्यार फार विषारी हें खरें; पण ती चावली तरच विष बाधतें, तीस हात लावला तरी कांहींहि होत नाहीं.

५ मेलेल्या विषारी सापास हात लावल्यावर तो धुतला नाहीं व अंगास लावला किंवा खाण्याच्या पदार्थास लावला तर विष बाधण्याचा संभव असतो.

खुलासा—सर्पाचे सर्व अंगांत विष नसून तें फक्त तोंडांतील विष-पिंडांत असतें. विषारी सापाचें तोंड तोडून टाकून बाकीचा भाग खाल्ला, तर कसलीच इजा होत नाहीं. वैदू वगैरे लोक सापाचें मांस खातात. सापाच्या मांसाचे गुण आयुर्वेदावरील ग्रंथांत पुढीलप्रमाणें दिले आहेत.

चक्षुष्या मधुराः पाके सर्पा मेधाग्निवर्धनाः ॥ ८३ ॥
दर्वीकरा दीपकाश्च तेषूक्ताः कटुपाकिनः ॥
मधुराश्चातिचक्षुष्याः सृष्टविण्मूत्रमारुताः ॥ ८४ ॥

—सुश्रुत, अध्याय ४६.

६ सापाचें विष ( खाण्याच्या पदार्थांबरोबर वगैरे ) पोटांत गेल्यानें मृत्यु येतो. हें अगदीं खोटें आहे.

खुलासा—सापाचें विष पोटांत गेल्यास तें पोटांतील पाचक रसानें निरुपद्रवी होतें. हें विष रक्तांत गेल्यासच बाधतें. रक्तांत गेलेलें एक थेंब अथवा

अर्ध गुंज विष माणसास मृत्यु येण्यास पुरेसें आहे इतकें तें जालीम असतें; पण ५०-१०० थेंब विष पोटांत जाऊनहि कांहीं अपाय होत नाहीं, असें जनावरांवरील प्रयोगांनीं दाखवितां येतें.

विषारी साप चावल्यावर, जखमेस तोंड लावून विष शोषून घेऊन थुंकून टाकलें, तर शोषून घेणारास कांहींहि अपाय होत नाहीं; मात्र त्याच्या तोंडास आंतील बाजूनें कसलीहि जखम, चट्टा, कातरा वगैरे असतां उपयोगी नाहीं. जखम असल्यास विष जखमेंतून रक्तांत जाऊन तावडतोब अपाय करील.

७ कांहीं सापांच्या फूत्कारानें अथवा श्वासानेंहि प्राणी मरतो. अगदीं खोटें.

८ हरणटोळ ह्या जातीचा साप डोक्यावर उडी मारून चावतो. खोटें.

९ सापाचे दोन तुकडे झाले तरी प्रत्येक तुकडा पुनः वाढतो; निदान तो बरेच दिवस जिवंत राहतो. खुलासा—हें विधान खोटें आहे. सापास जखम झाली असतां तो बहुधा जगत नाहीं. याचें मुख्य कारण जखमेस मुंग्या लागतात हें होय.

१० धामण व म्हैस यांची दृष्टादृष्ट झाली असतां म्हैस मरते. खुलासा—हें खोटें आहे. कधीं कधीं म्हैस गवतांतील कीड किंवा दुसरे जंतुजन्य रोग यामुळें वास्तविकपणें मरते, व कारण कळून न आल्यानें मरणाचें कारण धामणीकडे लावण्यांत येतें.

११ मुंगसास सर्पविषावरील औषधि माहीत असल्यानें त्यास विषारी साप चावला, तर तें ती औषधि खातें व यामुळें तें मरत नाहीं.—अगदीं खोटें.

१२ मुंगसाचे अथवा सापास मारणाऱ्या मोर, गरुड वगैरे प्राण्यांचे रक्तांत सर्पविषप्रतिकारक शक्ति असते. खोटें; मुंगसें साप चावून मेल्याचीं अनेक उदाहरणें आहेत.

१३ बहुतेक गारोड्यांजवळ सर्पविषावर रामबाण औषध असतें. खोटें.

१४ सापाचें विष स्वतःस किंवा दुसऱ्या विषारी सापास बाधत नाहीं. खुलासा—हें खोटें आहे. साप स्वतःस चावला तर तोहि मरतो.

१५ सापाचें विष माणसास बाधतें तसें चावलेल्या माणसाचें विष सापास बाधतें. तें बाधूं नये म्हणून माणसांस दंश केल्यावर साप आपले शेपटाचा तुकडा तोडतो. याकारणानें ज्या सापानें दंश केलेला आहे त्याचें शेपूट आखूड झालेलें असतें. हें सर्व खोटें आहे.

१६ धामण म्हशीच्या स्तनांतील दूध शोषून घेते व तिच्या कानांत शेपटी घालते त्यामुळें म्हैस मरते. खोटें.

१७ सापाच्या डोक्यांत मणि असतो व हा मणि विषावर उपयोगी पडतो. हें खरें नाहीं. असा मणि गारुडी लोक विकतात पण तो बनावट असतो.

१८ सापास सुगंध फार आवडतो, म्हणूनच तो केवड्याच्या बनांत असतो. खुलासा—केवड्याच्या बनांत लपण्यास जागा असते म्हणून साप तेथें कधीं कधीं असतो. उलटपक्षीं शौचकूप, मोऱ्या यांमध्येंहि सापांची वस्ती असते; यावरून त्यास सुगंध विशेष प्रिय आहे ही कल्पना खोटी आहे असें समजून येईल.

१९ साप हा मोठा दुष्ट प्राणी आहे. म्हणूनच दुष्टास सापाची उपमा देतात. खुलासा—सापाच्या अंगावर पाय पडला अथवा त्यास कोणीं विशेष इजा केली, तर तो केवळ आपला बचाव करण्यासाठीं व नाइलाजास्तवच चावतो. त्यास दहा वेळां डवचलें तरी तो चावला नाहीं अशीं अनेक उदाहरणें आहेत. सोलापूर जिल्ह्यांतील अरणगांवीं साठेशास्त्री यांनीं आपणांस सापानें चावावें म्हणून त्यास अनेक वेळां चिडाविलें तरी तो चावेना, हें सुप्रसिद्ध आहे. येरवड्याच्या तुरुंगांत दे. भ लक्ष्मण बळवंत भोपटकर यांचेजवळ नाग बराच वेळ असूनहि तो त्यांना चावला नाहीं हेंहि माहीत झालेंच आहे. माणसास चावण्याची सापांमध्यें स्वाभाविक प्रवृत्ति असती, तर रोज अंधारांतून माणसें जातात तेव्हां अथवा माणसें अंथरुणांत निजलीं असतां त्यांना प्रत्येक गांवीं रोज साप चावले असते. परंतु ते तसें करीत नाहींत; एवढेंच नव्हे तर अंथरुणांत साप कित्येक तास राहिला असूनहि तो चावला नाहीं अशीं अनेक उदाहरणें आहेत. हातांत शस्त्र व अधिकार असल्यावर त्याचा दुरुपयोग करण्याचा व केवळ मौजेखातर

जनावरें मारण्याचा माणसांचा स्वभाव पाहिला, म्हणजे त्यांच्या मानानें साप सभ्य अथवा सज्जनच म्हटला पाहिजे. कारण जीवितरक्षणाच्या जरुरीवांचून साप हत्या क्वचितच करतो. मात्र नागराज ( King cobra ) सारखे फार थोड्या जातीचे साप माणसाच्या अंगावर चालून जातात हें खरें आहे.

सापांमध्यें स्नेहभावहि आहे. बाळगलेल्या सापाचें मालकावर इतकें प्रेम जडतें कीं, मालकाचा वियोग झाला तर तो खाण्याचें सोडून देतो, अशीं कांहीं उदाहरणें आहेत.

## २ सर्पदंशावरील उपाय.

मण्यारीचे विषावर कसलाहि उपाय रामबाण नाहीं. बाकीच्या बहुतेक सापांच्या विषयावर antiveneneचें इंजेक्शन एवढाच प्रयोगाअंतीं रामबाण ठरलेला उपाय आहे.

हाफकिन् इन्स्टिटयूटमध्यें आजपर्यंत केलेले हजारों औषधिप्रयोग व शेंकडों मांत्रिकप्रयोग यांवरून असें आढळून आलें आहे कीं, सर्पविषावरील बाकीच्या अनेक उपायांपैकीं कोणतीहि औषधि अथवा मांत्रिक उपाय रामबाण नाहीं.

औषध निरुपयोगी असूनहि तें सर्पविषानें येणारा मृत्यु टाळण्यास समर्थ आहे अशी **खोटी समजूत होण्याचें कारण**—व्यवहारांत जे सर्पदशाचें रोगी दृष्टीस पडतात त्यांतील शेंकडा ८० मध्यें विष मुळींच नसतें किंवा अत्यल्प असतें. असले रोगी मरण्याचें मुळींच कारण नाहीं. अर्थात् अशा रोग्यांना कसलेंहि औषध दिलें तरी त्यामुळेंच रोगी वांचला अशी खोटी समजूत होते. सर्पदंशाचीं लक्षणें झालीं असूनहि रोगी वांचला असें जें सांगतात त्यांत खरेपणाचा भाग थोडा असतो. कारण केवळ भीतीमुळें रोग्यास तीं लक्षणें होतात असा अनेक वेळां अनुभव आलेला आहे.

सर्पदंशावर मंत्राचा कांहींसा परिणाम होतो असें वाटतें त्याचें मुख्य कारण पुढील आहे. सर्पदंशाचे विशेष परिणाम म्हणजे ( १ ) भीतीनें मेंदूस बसणारा धक्का व ( २ ) विषारी दंश असेल तर कांहीं सापांच्या विषामुळें हृदयास व फुफ्फुसांस येणारी अशक्तता, हे होत. मंत्रावरील विश्वास

व मांत्रिक धैर्यवान्, प्रसन्न मुद्रेचा व दुसऱ्याच्या मनांत विश्वास उत्पन्न करणारा असेल तर त्याच्यामुळें उत्पन्न होणारी श्रद्धा, ह्यांमुळें रोग्याची भीति नाहींशी होते, व मंत्र घालतांना जें थंड पाणी शिंपडलें जातें त्यामुळें हृदय, व मज्जातंतु उत्तेजित होतात, यामुळें रोग्यास थोडा फायदा होतो.

तथापि दंश झालेल्या माणसाचें अंगांत विषप्रतिकारक सामर्थ्य विशेष नसल्यास, वरील सुपरिणाम, शरीरांत पूर्ण परिमाणांत गेलेल्या सर्प-विषापासून मुक्त करण्यास समर्थ नाहींत; म्हणूनच कांहीं सापांवर मंत्र चालत नाहीं अशी मांत्रिकांनाहि कबुली द्यावी लागते.

**तपासलेल्या शेंकडों औषधांपैकीं निरुपयोगी ठरलेली कांहीं औषधें:—**

अगस्ता, अंकोल, अश्वगन्धा, उम्बर, दंती, वाळा, अतिबला, एरंड, वड, कवठ, करंज, कापशी, कलिकारी, काजू, कासमर्द, गोकर्ण, अतिविष, अनंत, अघाडा, रुई, आयापान, अशोक, अश्वत्थ, अफू, कायफळ, कमळ, कारलें, कुलिंजन, कौंडळ, रास्ना, घणसकांडें, खुरचाफा, औदुंबर, घणसर, चंदन, जास्वंद, डुकरकंद, तंबाखु, गुळवेल, केव्हांही, कण्हेर, करवंट, कलमकाप, कुचला, हरताळ, केळ, करंज, कांगोणी, काळी तुळस, निवडुंग, तुपकडी, काकमाची, गुंज, पाढरा चांफा, तोंडलें, धोत्रा, जीवंती अथवा करदोडी, तगर, दुर्वा, बचनाग, नागचांफा, लिंब, पळस, विरबंट, नागदवणा, नागवेल, बाकुची, ब्राह्मी, बिब्बा, भारंगी, निंब, निशोत्तर, गेळफळ, अमरवेल, गोखरू, रिठा, पळस, गरुडवेल, पाटला, फांगळा, लाजाळू, लसूण, वावडिंग, शरपुंखा, अथवा उन्हाळी, बकाणानिंब, साप-संद, हिंग, शतावरी, शिकेकाई, शेवगा, सागरगोटा, सोनचाफा, बाहवा, बेल, मारुकांगोणी, मुंगुसवेल, तुळस, देवडांगरी, पोटॅशिअम परमँगेनेट, अमोनिया, इ०.

यांशिवाय जाहिरांतील पुढील औषधें:—धामापूरकर मंडळीचें, आयुर्वेदाचार्य यादवजी त्रिकमजी यांचें, श्री० स. वि. आचार्य यांचें औषध व Lexin, Tiryaka इ० अनेक औषधें.

कोंबडीचें मलद्वार लावण्याचा उपाय खात्रीलायक नाहीं. कारण जख-

मेस लागलेलें विष जरी त्यायोगें शोषलें जातें तरी रक्तांत गेलेलें विष त्यायोगानें शोषलें जात नाहीं.

प्रो. राव यांचें औषधही प्रयोगाअंतीं निरुपयोगी ठरले.

श्री. पांचलेगांवकर महाराजांना हाफकिन् इन्स्टिटयूटमध्यें प्राण्यांवर प्रयोग करण्यासाठीं येण्याविषयीं केलेली विनंती त्यांनीं मान्य केली नाहीं.

पुणें येथील गूढचिकित्सामंडळानें पांच हजारांचें बक्षीस देऊं केलें होतें व मंडळाकडे अनेक औषधें आलीं आणि मांत्रिकही आले, परंतु कोणताही उपाय यशस्वी ठरला नाहीं. ह्या पारितोषिकाची व उपाय तपासण्याची योजना १९३३ च्या एप्रिल पासून बंद करण्यांत आली आहे.

## ३ ॲल्युमिनियमविषयीं गैरसमज.

ॲल्युमिनियम धातूच्या भांड्यांत खाण्याचे पदार्थ ठेवल्यानें या धातूच्या क्षाराचा अंश खाण्याच्या पदार्थाबरोबर पोटांत जाऊन त्याचें विष खाणारास बाधतें, ह्या समजुतीसंबंधानें इंग्रजी वर्तमानपत्रांत चर्चा होऊन सायंटिफिक अमेरिकन या प्रसिद्ध शास्त्रीय पत्रानें ' ही समजूत निराधार असल्याचें ' प्रसिद्ध केलें आहे. यासंबंधाचे प्रयोग जनावरांवरही केले आहेत व त्यांना कांहीं अपाय झाल्याचें आढळून आलें नाहीं.

## ४ खाण्याच्या पदार्थांविषयीं कांहीं गैरसमज.

दोडक्याची भाजी खाल्ल्यानें अमांश होतो. हें खरें नाहीं.

साबूदाणा हडकाच्या पिठाचा केलेला असतो. खोटें; तो वास्तविकपणें एका झाडाच्या खोडांतील गाभ्यामध्यें पिठूळ भाग असतो त्यापासून तयार केलेला असतो.

गाजर हलकें अन्न आहे. खोटें; गाजरामध्यें व्हायटामिन्स फार आहेत व तें फार पौष्टिक आहे हें त्यांमुळें जनावरें जास्त दूध देतात यावरून दिसून येतें.

अन्नांत पाल गेल्यानें विषबाधा होऊन मृत्यु येतो या समजांत विशेष अर्थ नाहीं. पाल हा प्राणी विषारी असला तरी तो शिजविल्या-

नंतर त्याचा विषारीपणा रहात नाहीं. अन्न खाल्लयावर रेचवांति होण्याचे जे प्रकार होतात त्याचें कारण बहुधा विषयुक्त दूध असतें. दुधांत किंवा दुधापासून केलेल्या व शिळ्या दुधाच्या पदार्थांत कधीं कधीं विष उत्पन्न होतें, व त्यामुळें वरीलसारखे प्रकार घडतात. बाजारी बासुंदी वगैरे पदार्थ खाल्लयामुळें वरीलसारखे प्रकार झाल्याचे प्रत्यक्ष अनुभव अनेक आहेत.

पोटांतील पाचक रसामुळें विंचवाचेंच काय पण सापाचें विषही निर्वीर्य होऊन जातें ही प्रयोगसिद्ध गोष्ट आहे. चहा प्याल्यानंतर एका तासानें दुधाच्या भांड्याच्या तळाशीं विंचू मेलेला व अर्थात शिजलेला आढळला, पण तें दुध व त्या दुधाचा चहा पिणारांना कसलीच इजा झाली नाहीं असा प्रत्यक्ष अनुभव रा.... हे गृहस्थ सांगतात.

## ५ साबणाविषयीं गैरसमजुती.

पारदर्शक साबण शुद्ध असतो, ही समजूत बरोबर नाहीं. साबणांत साखर घातल्यानें पारदर्शकता उत्पन्न होते. या पारदर्शकतेचा साबणाच्या गुणाशीं कांहीं संबंध नसतो.

साबण जितका अधिक सुवासिक तितका गुणानें चांगला, हें खरें नाहीं. साबणाची उपयुक्तता सुगंधावर अवलंबून नसून ती साबणांतील मुख्य द्रव्यें जीं तेलें व क्षार त्यांची शुद्धता, योग्य प्रमाण, व त्यांचें योग्य मिश्रण यांवर अवलंबून आहे. साबणांत पाणी जास्त असणें, तसेंच क्षार जास्त असणें हे त्यांतील दोष होत. पाणी जास्त असल्यानें साबण लौकर झिजतें, म्हणजेच घेणाराच्या पदरांत माल कमी पडतो. क्षार जास्त असल्यानें त्वचा तडतडते व तीस अपाय होतो. त्यांतील तेल किंवा चरबी शुद्ध नसेल तर साबणास कांहीं दिवसांनीं घाण येते.

**जंतुनाशक साबण**—जंतूंचा पूर्ण नाश होण्यास जितक्या प्रमाणांत जंतुनाशक औषध साबणांत घालणें अवश्य आहे तितकें तें घातल्यास साबण त्वचेस अपायकारक होईल व तो वापरणें अशक्य होईल. म्हणून हें काम कोणत्याही साबणानें पूर्णपणें होणें शक्य नाहीं. कोणत्याही वस्तूस आलेली घाण निघून गेली म्हणजे तिच्यांतील जंतुही निघून जातात

म्हणून हात अथवा शरीराचा भाग यास लागलेले जंतु, साध्या साबणानें त्या भागाची घाण काढून टाकली, म्हणजे निघून जातात. त्यासाठीं जंतुघ्न औषध घातलेलें साबण वापरण्याचा तादृश उपयोग नाहीं. ऑपरेशनचे वेळीं निर्जंतुक करण्याकरितां जखम धुण्याच्या कामीं जंतुघ्न औषधाऐवजीं साबण वापरून चालेल काय म्हणून डॉक्टरांना विचारून पहावें म्हणजे ते 'नाहीं' असेंच उत्तर देतील, व त्यावरून अशा साबणाच्या सामर्थ्याची यथार्थ कल्पना येईल.

अशा साबणाचा थोडासा उपयोग होतो, निदान त्यामुळें मनास थोडें समाधान वाटतें, म्हणून त्याचा उपयोग पाहिजे तर करावा. परंतु जेथें जंतुनाश पूर्ण करणें जरूर आहे तेथें या साबणावर अवलंबून राहतां येणार नाहीं हें लक्षांत ठेवावें, व तज्ञांनीं सांगितल्यावांचून 'जंतुघ्न साबण चांगलें' एवढयाच कल्पनेनें कॅर्बोलिक साबण किंवा तसलें दुसरें साबण यांचा उपयोग करूं नये.

कांहीं त्वग्विकारांत विशिष्ट साबणांचा उपयोग होतो म्हणून त्यांचा उपयोग डॉक्टरांच्या सल्ल्यानेंच करावा.

## ६ दंतमंजन, टूथपेस्ट इ०.

दातांस लावावयाच्या मंजनांविषयीं ' पायोरिया वगैरे रोग बरे होतात ' अशा ज्या जाहिराती असतात त्या सर्वस्वीं अविश्वसनीय होत. दांत चांगले राहणें हें केवळ दंतमंजन अथवा ब्रश यांवर अवलंबून नाहीं. यांनीं जी स्वच्छता होते ती तात्पुरती असते व या स्वच्छतेसाठीं विशेष किंमतीच्या दंतमंजनाची जरूरी नाहीं. शेणीची राख, खडू, लिंब अथवा बाभळ यांच्या काड्या यांनीं हें काम बहुतेक होतें. ज्या जंतूमुळें दांतांस अपाय होतो त्यांपैकीं कांहींच्या जागा हिरड्यांखालीं अशा झाकलेल्या असतात कीं, तेथें जंतुनाशक औषधें जाऊं शकत नाहींत. दुसरी गोष्ट अशी आहे कीं, जंतूंचा नाश होण्यास औषध जितकें कडक लागतें तितकें कडक दंतमंजनांत वापरल्यास त्यामुळें दांत व हिरड्या यांना अपायच होईल. म्हणून दांतांस अपायकारक जंतूंचा अशा उपायांनीं नाश करणें अशक्य आहे. दांत निरोगी राहाण्यास योग्य आहार व शारीरिक आरोग्य यांचीही जरूर

आवश्यकता आहे. म्हणून केवळ दंतमंजनानें दांतांचे सर्व विकार नाहींसे होतील ही केवळ जाहिरातबाजी आहे.

—" Readers Digest " वरून.

## ७ समुद्रसर्प.

समुद्रांत ६० फूट अथवा ८० फूट सर्प पाहिला अशा अनेक बातम्या आजपर्यंत युरोपियन वर्तमनपत्रांत प्रसिद्ध झाल्या आहेत. असा सर्प अगदीं जवळून स्पष्टपणें कोणीं पाहिला नाहीं किंवा तो मेलेल्या स्थितींत अद्याप आढळला नाहीं. याविषयीं शास्त्रज्ञांचें म्हणणें असें आहे कीं, लांब आकाराचे कांहीं प्रचंड प्राणी समुद्रांत असावे असें म्हणण्यास आधार आहे; पण वरील इतक्या लांबीचे साप अथवा अजगर समुद्रांत आहेत असें म्हणण्यास आधार नाहीं.

## ८ दारुबाज मनुष्याचें आपोआप ज्वलन.

मनुष्य आपोआप पेटला व त्याच्या शारिराचा कांहीं भाग जळून काळा झाला याबद्दल आजपर्यंत पुष्कळ बातम्या आलेल्या आहेत. दारु पिणाऱ्याच्या अंगांत एक प्रकारचें दाहक द्रव्य उत्पन्न होतें व विडी किंवा दिव्याची ज्योत यानें तें पेटतें व त्यामुळें शरीर जळतें अशी याची उपपत्ति आहे.

या चमत्कारांत खरेपणा नसावा असें वाटतें. असे जे प्रकार आढळतात ते कपडे पेटल्यामुळें शरीराचा भाग जळाला असावा अशा स्वरूपाचे बहुधा असावे. असा चमत्कार घडल्याबद्दलच्या बहुतेक गोष्टी जुन्या आहेत, पण गेल्या अनेक वर्षांत असा चमत्कार घडल्याचें विश्वसनीय उदाहरण एकही नाहीं, यावरून काय अनुमान निघतें !

## ९ हलक्या धातूचें सोनें बनविणें.

ह्या बाबतींत आज हजारों वर्षें हजारों लोकांनीं प्रयत्न केले आहेत. त्यांत कांहींना यश आलें अशी समजूत आहे पण तीस विश्वसनीय आधार दिसत नाहीं. मात्र यासंबंधाच्या प्रयोगांमध्यें पुष्कळ लोकांनीं हजारों रुपये घालविले आहेत, व लबाड किमयागारांनीं थापा देऊन कितीतरी लोकांना

बुडविलें आहे, हें खरें आहे. अद्यापही किमयागारानें फसविल्याचा हकीकती ऐकूं येतात.

पाश्चात्य शास्त्रज्ञांपैकीं कांहींना हा प्रयोग साध्य झाल्याच्या बातम्या अलीकडे आल्या होत्या, पण त्यांत फारसें सत्य नाहीं असें मागाहून आढळून आलें आहे. उदाहरणार्थ, कांहीं वर्षांपूर्वी मिठे या जर्मन शास्त्रज्ञांना पाऱ्या-पासून अल्प सोनें झाल्याचें आढळून आलें अशी बातमी आली; पण जें अल्प सोनें आढळून आलें तें प्रयोगासाठीं वापरलेल्या पाऱ्यांत मूळचेंच मिश्रित असावें असें इतर शास्त्रज्ञांचें म्हणणें आहे.

ह्या बाबतींत शास्त्रज्ञांचें आजचें म्हणणें पुढीलप्रमाणें आहे. "धातूंचें अथवा मूलतत्त्वांचें रुपांतर होणें ही शक्य कोटींतील गोष्ट आहे; परंतु आज तरी अशी स्थिति आहे कीं, तसें करण्यास जो खर्च येईल तो सोन्याच्या किंमतीपेक्षां पुष्कळ जास्त होईल, म्हणून सोनें करण्याचा प्रयोग यशस्वी झाला तरी त्यामुळें सोनें करणाराला फायदा होणार नाहीं."

## १० ज्या व्यक्तींत एक अद्भुत शक्ती आहे तिच्यांत अन्य अद्भुत शक्ति मानण्याची चूक.

एकाद्या व्यक्तीमध्यें एकादी शक्ति इतरांहून जास्त असली म्हणजे ती व्यक्ति इतरांहून सर्व प्रकारें श्रेष्ठ अशी पुष्कळांची समजूत असते, पण ती बरोबर नाहीं. अद्भुत शक्ति ही निसर्गाची एक लीला किंवा लहर आहे असेंही म्हणतां येईल. सामान्यतः अशी स्थिति असते कीं, व्यक्तींतील एकादी शक्ति विशेष असते तेव्हां तिच्यांतील दुसऱ्या शक्ति कमी झालेल्या असतात. याबद्दलचीं अनेक उदाहरणें प्रो० लोंब्रोसो यांनीं आपल्या The Man of Genius या पुस्तकांत दिलेलीं आहेत. यावरून बोध एवढाच घ्यावयाचा कीं, एकादा अद्भुत चमत्कार एकाद्याला करतां आला, म्हणजे त्याला ईश्वरानें सर्व कांहीं सामर्थ्य दिलें आहे किंवा त्याच्यावर ईश्वराची पूर्ण मर्जी आहे असें मानण्याकडे जी कांहींची प्रवृत्ति आहे, ती सयुक्तिक नाहीं.

अद्भुत सामर्थ्यांचीं पुढील उदाहरणें पहा:—

अद्भुत स्मरणशक्ति व गणितशक्ति—

पोलंडमधील गृहस्थ डॉ० फिंकेलस्टीन हे पुढील गोष्टी करूं शकतात:—

'पाय' म्हणजे वर्तुळाच्या परिघाचे व्यासाशीं गुणोत्तर ( हें स्थूलमानानें ३·१४१६ आहे ) याच्या आंकड्यांतील दशांशांपैकीं दोनशें स्थानांपर्यंतचे आंकडे सांगणें.

१ ते १००च्या लॉगरिथमचे दशांशांपैकीं सात स्थानांपर्यंतचे आंकडे सांगणें. १०० ते १५० पर्यंतच्या लॉगरिथमच्या दशांशांपैकीं पांच स्थानांपर्यंतचे आंकडे सांगणें.

दोन तीन आंकड्यांच्या संख्यांचे अनेक घात सांगणें.

२५ घरांच्या चौरसांतील मांडलेले आंकडे सांगणें.

१०–१५ आंकड्यांच्या अनेक संख्यांची बेरीज फार थोड्या वेळांत करणें.

—पान ७० "Character and Personality"चा सप्टेंबर १९३२चा अंक.

आपल्याकडे अष्टावधानी म्हणून प्रसिद्ध असलेले कांहीं लोक गणितांसंबंधाचे चमत्कार करतात ते लोकांनीं पाहिले असतीलच. कै. सुखात्मे हे या बाबतींत विशेष प्रसिद्ध होते.

**पाण्यांत ६॥ मिनिटें बुडी.**

एम. पॉलिडयुएन नांवाचा पॅरिस येथील एक मनुष्य पाण्यांत ६॥ मिनिटें बुडून राहिला.

**जिभेनें पुस्तकें वाचणें.**

यु० स्टेटसमधील मिसूरी प्रांतांतील कान्सास शहरीं ईस्ट ७१ वा रस्ता यामध्यें राहणारे बु० मॅक्फर्सन नांवाचे एक गृहस्थ आहेत. खाणींत काम करीत असतां झालेल्या दारूच्या स्फोटानें, त्यांचे दोन्ही डोळे गेले व हात तुटले. ज्यांत अक्षरें उठून आलेलीं असतात अशीं जीं पुस्तकें आंधळ्यां-

साठीं तयार केलेलीं असतात, तीं पुस्तकें हे गृहस्थ हाताच्या अभावीं जीभ लावून वाचतात !

पायांत कलम धरून उत्तम चित्रें काढणारेही कांहीं लोक आहेत.

## अंगांत ३२ शें सुया टोचून घेणें.

बोहेमियांतील वोटावा येथील खेडवळ लोकांमध्यें दरवर्षी अंगांत टांचण्या टोचून घेण्याची चढाओढ होत असते. हिजमध्यें बाग्रो नांवाच्या जिप्सी या फिरत्या जातीच्या मुख्यानें १९२८ सालीं आपल्या हातांत ३२शें सुया टोचून घेतल्या, व त्या त्यानें ३१ तास हातांत तशाच राहूं दिल्या !

## हुकमी केस ताठ करणें.

Pierre Messie ( पिएरी मेसी ) हे फ्रान्समधील नँटस शहरचे गृहस्थ डोक्यावरील केस वाटेल तेव्हां ताठ करूं शकतात, खालीं पाडूं शकतात, किंवा कुरळे करूं शकतात; एवढेंच नव्हे तर डोक्याच्या विवक्षित भागाच्या केसांतही असा फरक करूं शकतात.

## डोळ्यांतून फुंकर.

अमेरिकेंतील डेट्रॉइट शहरचे गृहस्थ ऑल्फ्रेड लँगेव्हन हे डोळ्यांतून फुंकर ( हवेचा फवारा ) घालूं शकतात. हा फवारा पुढें धरलेल्या हातास स्पष्टपणें कळून येतो व त्यानें पुढें धरलेली मेणबत्ती विझते. ( कांहीं मध्यस्थ अंधारांत कांहीं पदार्थ हालवूं शकतात त्याचें कारण हें नसेल ना ! )

घशास शंख लावून तो वाजविणारे व कान हालविणारे गृहस्थ हिंदुस्थानांत आहेत हें पुष्कळांस माहीत असेलच.

## पावणे दोनशें भाषा जाणणारे गृहस्थ.

इटलींतील मेझोफँटीचे कार्डिनल जोसेफ कास्पर ह्या गृहस्थांना ११४ मुख्य भाषा व ७२ उपभाषा येत होत्या.

वरील ६ उदाहरणें ‘ Believe it or not ’ ( 2nd Series ) या पुस्तकांतून घेतलीं आहेत. यांत कांहीं चूक असण्याचाही संभव आहे.

जन्मांध असूनही विद्वत्ता संपादन केलेल्या लोकांचीं अनेक उदाहरणें आहेत. वे० सदाशिवशास्त्री भिडे हे अशांपैकींच होत.

हेलन केलर ही बाई जन्मापासून आंधळी मुकी व बहिरी असतांना लिहिण्यावाचण्यास शिकून प्रख्यात लेखक कशी बनली हा चमत्कार फारच अद्‌भुत आहे.

हीं उदाहरणें देण्याचा हेतु एवढाच आहे कीं, नैसर्गिक देणगी अथवा प्रयत्न यांनीं माणसांमध्यें काय अद्‌भुत शक्ति येतात याची कल्पना व्हावी.

## ११ शक्याशक्यतेविषयीं माणसांचें अपुरें ज्ञान.

वरीलप्रमाणें पुष्कळ गोष्टी युक्तीनें शक्य असतांही त्या अशक्य असें वाटल्यानें त्या करणाराच्या अंगीं कांहीं दैवीक किंवा गूढ सामर्थ्य आहे असा गैरसमज होतो. यासंबंधानें पुढील एक अनुभव पहा:—

समजा एका माणसानें अशी प्रतिज्ञा केली कीं "कोणाही माणसानें एक दोरी अथवा हातरुमाल घेऊन त्याचीं दोन टोकें आपल्या हातांत द्यावीं व नंतर हातांतील टोकें न सोडतां आपण त्या दोरीस ( नेहमींच्या तऱ्हेची ) गांठ मारून दाखवितों," तर त्याचें हें सामर्थ्य अतिभौतिक ( भौतिकाच्या पलीकडील तें अतिभौतिक ) म्हणजे दैविक मानण्यास कांहीं लोक तयार होतील कीं नाहींत? कांहीं होतील; कारण त्यांच्या मतें ही गोष्ट अशक्य आहे. ज्यांना हें अमान्य करावयाचें असेल त्यांनीं ही गोष्ट करून दाखवावी.

ही गोष्ट विशिष्ट रीतीनें शक्य आहे व यांत लबाडीचा कांहीं भाग नाहीं, यावरून अशक्य वाटणाऱ्या गोष्टींचा अशक्यपणा आपल्या अज्ञानामुळें कसा उत्पन्न झालेला असतो व त्यामुळें आपण भलत्याच सामर्थ्याचें श्रेय एकाद्या माणसास कसें देतो, याची कल्पना होईल.

मात्र एकाद्या गोष्टीचा अवघडपणा, ती प्रत्यक्ष करून पाहण्यापूर्वी, पूर्णपणें कळत नाहीं; म्हणून अशी सूचना आहे कीं, अशा रीतीनें दोरीस गांठ मारण्याचा प्रयत्न पांच पन्नास वेळा अथवा दोन चार दिवस करून नंतर यासंबंधाची परिशिष्टांत दिलेली कृति वाचावी.

## १२ थापा मारणारांचें धारिष्ट व जनतेचा श्रद्धाळुपणा.

लंडनच्या 'जनरल अडव्हर्टायझर' या व अन्य पत्रांच्या ११ जानेवारी १७४९ च्या अंकांत पुढील जाहिरात आली:—

"हे–मार्केटमधील न्यू थिएटरमध्यें एक गृहस्थ पुढील चमत्कार दाखवितील:–प्रेक्षकांपैकीं कोणाही माणसाची टेकण्याची काठी घेऊन तीवर कोणतेंही प्रचलित वाद्य वाजून दाखविणें, दारूची बाटली प्रेक्षकांस तपासण्यास देऊन नंतर ती स्टेजवरील टेबलावर ठेऊन तींत सर्वांदेखत शिरणें व तींत बसून गाणें म्हणणें, मुखवटा घालून व वेशांतर करून आलेल्या प्रेक्षकांपैकीं कोणाही मनुष्याचें नांव सांगणें."

थिएटर चिकार भरलें. प्रेक्षकांमध्यें बडेलोक होते एवढेंच नव्हे तर राजपुत्र ड्यूक ऑफ कंबर्लंड हेही होते. खेळाची वेळ झाली; व लोक पडदा उघडण्याची वाट पहातात तों हा चमत्कार दिसून आला कीं, खेळ करणारा मनुष्य अदृश्य झाला! आपली निराशा झाली हें पाहतांच प्रेक्षक संतापले व त्यांनीं सामानाची मोडतोड करण्यास आरंभ केला, आणि सामान थिएटराबाहेर नेऊन त्यास आग लावली. थिएटराच्या मालकानें पोलिस बोलावले, पण ते आले तों त्यांना होळीच्या निखाऱ्यांपुढें हात शेकण्यापलीकडे कांहीं करावयाचें राहिलें नव्हतें; कारण सामान खाक जळून गेलें होतें व लोकही निघून गेले होते. या दंग्यांत राजपुत्राची तरवार कोणी लांबविली. त्यासाठीं त्यांनीं "तरवार परत आणून देणारास तीस गिनी (४-५ शें रुपये) बक्षिस मिळेल व इतर कसलेही प्रश्न विचारले जाणार नाहींत" अशी जाहिरात दिली होती!

या चमत्काराची उपपत्ति अशी आहे कीं, "लोक किती श्रद्धाळु असतात" याविषयीं दोघा गृहस्थांची पैज लागली व त्यासाठीं त्यांपैकीं एका गृहस्थानें थिएटरचें भाडें अगाऊ देऊन वरील खेळाची जाहिरात दिली. 'खेळ होईपर्यंत मी तिकिटांचे पैसे तुम्हांस देणार नाहीं' ही थिएटरच्या मालकाची अटही त्यानें मान्य केली. अर्थात् हा प्रयोग करण्यास त्याला थिएटरचें भाडें पदरचें भरावें लागलें, पण त्यानें ते पैजेसाठीं खर्च केले व अर्थात् पैज जिंकली!

२५ आगष्ट १९३४ च्या John o' London's Weekly वरून वरील हकीकत घेतली आहे.

### १३. गणितशास्त्राची अविश्वसनीयता.

गणितशास्त्र सत्य मानतां, पण गणितशास्त्रांत तरी निश्चितपणा कोठें राहिला आहे ! असें म्हणून कांहीं लोक गणितविषयक पुरावा अविश्वसनीय मानावा असें प्रतिपादतात; पण तें बरोबर नाहीं.

गणितशास्त्रांत काहीं गोष्टी वादग्रस्त व विरोधाभासयुक्त आहेत हें खरें आहे. उदाहरणार्थ पुढील गोष्टी पहाः—

( १ ) एका बिंदूतून, एका सरळ रेषेशीं समांतर अशी एकच रेषा काढतां येते ही गोष्ट युक्लिडनें प्रत्यक्ष प्रमाण म्हणून मानली होती; परंतु एका गणितज्ञानें असें सिद्ध केलें आहे कीं, अशा अनंत रेषा काढतां येतात, व एका गणितज्ञानें असें सिद्ध केलें आहे कीं, अशी रेषा मुळींच काढतां येत नाहीं !

(२) एक या संख्येचीं घनमुळें तीन निघतात, व त्यांपैकीं दोन अशीं असतात कीं, प्रत्येक दुसऱ्याच्या वर्गाबरोबर असतें.

असे अनिर्णीत व गूढ भाग गणिशास्त्रांत आहेत हें खरें; पण कांहीं तात्त्विक भाग असे असले, तरी व्यवहारांत ज्या गणितविषयक ज्ञानाचा आपण उपयोग करतों त्यामध्यें संदिग्धता मुळींच नाहीं. 'तिहीची चौपट बारा होते,' अथवा 'पांच चौरस फूट पृष्ठभागांत २५ चौरस फूट असतात,' अशा नियमास अपवाद कधींच आढळत नाहीं. इतर विषयांतील व्यवहारविषयक नियमास शेंकडा दहावीस अपवाद असले तरी गणिताविषयक उत्तरांत शंभरांत काय पण हजार उत्तरांत एकही अपवाद जर आढळत नाहीं, तर व्यवहाराच्या दृष्टीनें गणितशास्त्राचा पुरावा दुसऱ्या कोणत्याही पुराव्यापेक्षां एकंदरीनें जास्त विश्वसनीय आहे.

### १४ साधु अथवा सत्पुरुष यांच्या लक्षणांसंबंधानें चुकीच्या कल्पना.

मनुष्याचे प्रयत्न सामान्यतः स्वसुखासाठीं असतात. सुखाची हानि मुख्यतः दोन प्रकारच्या कारणांनीं होतेः—( १ ) दैविक आपत्तींमुळें, व

( २ ) मनुष्यकृत आपत्तींमुळें. अवर्षण, अतिवर्षण, भूकंप, रोगाची साथ इ० दैविक आपत्ति होत. मनुष्यकृत आपत्तीच्या मुळाशीं कधीं अज्ञान तर कधीं स्वार्थबुद्धि आणि तन्मूलक द्वेष, मत्सर, लोभ, व अहंकार हीं कारणें असतात. जगांतील निम्म्याहून अधिक दुःखाचें कारण इतरांची स्वार्थबुद्धि आहे असें आढळून येईल. मनुष्यामध्यें स्वार्थबुद्धि जितकी कमी तितकी त्याच्यापासून इतरांस पीडा कमी. वैयक्तिक हितापेक्षां घराण्याच्या, घराण्याच्या हितापेक्षां समाजाच्या, समाजाच्या हितापेक्षां देशाच्या, व देशहितापेक्षां सर्व विश्वाच्या हितासाठीं खटपट करणाऱ्या व्यक्ति चढत्या प्रमाणांत सन्माननीय अथवा वंद्य होतात याचें कारण त्यांचा स्वार्थाभाव व त्यामुळें त्यांच्यापासून इतरांच्या सुखास होणारें साहाय्य हेंच आहे.

एकाद्या व्यक्तींतील स्वार्थबुद्धीचा अभाव व परार्थबुद्धि ह्या वृत्ति जितक्या जास्त, तितकी ती व्यक्ति जास्त उपयोगी. म्हणून स्वार्थाभाव हें साधुत्वाचें मुख्य लक्षण होय. स्वार्थाचा एक घटक उपभोगेच्छा हा आहे. ती ज्यास नाहीं त्यास अप्सरा व अष्टवक्रा, अथवा घृतकल्या व साधी भाकरी हीं सारखींच. अशा माणसाकडून इतरांचे हितास विरोध कसा होणार? स्वार्थाचा दुसरा घटक द्रव्यलोभ हा आहे. तो ज्याला नाहीं तो दुसऱ्याशीं चढाओढ कशास करणार व दुसऱ्याच्या हिताच्या आड कां येणार ! अर्थात् व्यक्तीमध्यें स्वार्थाभाव असला म्हणजे तिच्यामध्यें साधुपणा—निदानीं साधुत्वाचा निमा भाग जो दुष्टपणाचा अभाव—तो आलाच. यास भूतदयेची व मनुष्यप्रेमाची जोड मिळाली म्हणजे साधुत्व पूर्ण होतें. म्हणून अभावात्मक गुणांमध्यें स्वार्थाभाव हा साधुत्वास आवश्यक असा गुण आहे, ह्यास्तव तो साधुत्वाचें मुख्य लक्षण आहे.

वरील विवेचनावरून, साधुत्वाचीं म्हणून सामान्यतः समजलीं जाणारीं पुढील लक्षणें खरीं नव्हत, असें दिसून येईल.

जटा—ह्या वाटेल त्याला वाढवितां येतात.

गलिच्छपणा—घाण पदार्थ खाणें, घाण पाणी पिणें, घाण जागेंत लोळणें हे पशूंचे किंवा वेड्या माणसांचे धर्म होत. पवित्रतेचा एक भाग स्वच्छता हा आहे. धार्मिक कृत्य घाणेरड्या जागेंत बसून करावें असें

कोणत्याही धर्मांत सांगितलेलें नाहीं. अस्वच्छतेंत आध्यात्मिक उन्नति असती, तर उकिरड्यांत देवघर किंवा देवघरांत उकिरडा स्थापण्याची चाल कोठें तरी पडली असती !

अविवाहितपणा—कोणी मुलगी न दिल्यामुळें अथवा कांहीं व्यंगामुळें अविवाहित राहण्याचा प्रसंग पुष्कळ नादान किंवा विक्षिप्त माणसांस येतो. तसेंच वाममार्गाचा अवलंब करून पुष्कळ माणसें अविवाहित राहूं शकतात. म्हणून अविवाहित राहणें हें ब्रह्मचर्याचें लक्षण नव्हे, व केवळ ब्रह्मचर्य हेंही साधुत्वाचें लक्षण नव्हे. ब्रह्मचारी पण दुष्ट असे अनेक लोक ख्रिस्ती आचार्यांमध्यें होते असें इतिहासावरून दिसून येईल.

भिक्षावृत्ति—ज्यास स्वाभिमान व महत्वाकांक्षा नाहीं त्यास व आळशी मनुष्यांस भिक्षा मागणें हाच उपजीविकेचा उपाय आहे. म्हणून भिक्षा मागण्यांत मोठेपणा मुळींच नाहीं, एवढेंच नव्हे तर याचना करणें व द्रव्य उत्पन्न न करतां आयतें खाणें हा मोठा कमीपणा आहे. समाजसेवेच्या रूपानें मोबदला दिला तरच भिक्षावृत्ति योग्य ठरते. देवभक्ति करणें ही समाजसेवा होत नाहीं. ती समाजसेवा देवास मान्य असती तर असे देव-भक्त ज्या हिंदुस्तान देशांत आहेत त्यांत दुष्काळामुळें मरण्याचा प्रसंग मनुष्यांस व गाईसारख्या प्राण्यांस आला नसता; व उलट, जेथें असे भक्त फार थोडे, त्या इंग्लंडादि देशांतील लोकांची सुस्थिति राहिली नसती.

विक्षिप्तपणा (विवस्त्र असणें, चिंध्या पांघरणें इ०)—जाणून बुजून अथवा कांहीं मानसिक दोषांमुळे असे प्रकार माणसें करतात. मेंदूच्या दोषामुळें वेड्यांना थंडी फारशी बाधत नाहीं ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. मेंदू बिघडलेल्या माणसास पडसें आलें म्हणजे त्यांची प्रकृति सुधारण्यास प्रारंभ झाला असें कांहीं वैद्य समजतात. थंडीवारा न बाधणें कांहीं अंशीं सवईवरही अवलंबून आहे. म्हणून विवस्त्र राहणें व थंडी न बाधणें हें अध्यात्मिक उन्नतीचें लक्षण मानण्याचें मुळींच कारण नाहीं.

चमत्कार करणाऱ्यांचें गूढ सामर्थ्य—बुक्का, तीर्थ वगैरे पदार्थ काढणें हे चमत्कार जे करतात त्यांना इच्छाशक्तीनें वाटेल तें करतां येतें, यास्तव ते भक्तास वाटेल ती गोष्ट देऊं शकतात ही कल्पनाही चुकीची आहे. असे

चमत्कार बहुधा खरे नसतात. तथापि, तें खरे असतात असें मानलें, तरी त्यावरून ते करणारांना वाटेल तें करतां येईल, असें मानणें योग्य होणार नाहीं. असें मानणें हें वकील सर्कशीचें, व सर्कसवाला सोनाराचें काम करूं शकेल असें मानण्यासारखें आहे. साधु भक्तांना वाटेल तें देऊं शकतात याला प्रत्यक्ष पुराव्याचा आधार नाहीं. सत्पुरुषाच्या प्रसादानें मुलगा झाला किंवा बढती मिळाली असे जे अनुभव कोणी सांगतात ते आपोआप घडणाऱ्या गोष्टींमध्येंच येतात हें, अशा प्रसादावांचून इतरांसही ह्या गोष्टी प्राप्त होतात यावरून व सत्पुरुषांच्या कांहीं भक्तांस अशा गोष्टी प्राप्त झाल्या नाहींत ह्यांबद्दलच्या अनेक उदाहरणांवरून, दिसून येईल.

अंगीं अद्‌भुत सामर्थ्य आहे अशी ज्या साधूंची ख्याति आहे त्यांचे सामर्थ्य किती असते याचा पुढील प्रत्यक्ष अनुभवांवरूनही विचार करावा. अशांच्या भक्तांच्या आपत्ति दूर झाल्या नाहींत याबद्दल अनेक उदाहरणें आहेत. 'बरें वाटेल' असें गुरु महाराजांचें आश्वासन असूनही भक्त दुखण्यास बळी पडला अशीं अनेक उदाहरणें आहेत. अशा सत्पुरुषांना इतर माणसांप्रमाणेंच आजार होतात व त्यांनाही वैद्यडॉक्टरांची मदत लागते. याचीं कांहीं उदाहरणें:—

'××××महाराज' यांना मूळव्याधीचा जबर आजार आहे. 'ओंजळभर रक्त पडतें' असे ते एकदा स्वतः सांगत होते.

××××महाराजांना अंगावर चट्टे उठण्याचा अथवा इसबाचा वगैरे आजार झाला होता, व त्यासाठीं ते पुणें–लष्करांतील एका पार्शी डाक्टरांचे दवाखान्यांत ४।५ रात्रीं उपचारासाठीं रोज येत असत.

सिद्धारूढ स्वामींनीं आपला दत्तक मुलगा क्षयाच्या आजारासाठीं मिरजेच्या मिशनच्या दवाखान्यांत ठेवला होता.

असे साधु खासगी एस्टेटी करतात ह्यावरून त्यांच्यामध्यें स्वार्थभावना किती असते हेंही कळून येणारें आहे.

एक शंका–चिंध्या पांघरणें, घाण पाणी पिणें हीं जर निरिच्छपणाची व साधुत्वाचीं लक्षणें तर नित्य राजभोग व द्रव्यसंग्रह हींही साधुत्वाचीं लक्षणें कशीं ! ज्या उपभोगेच्छेमुळें जनतेची प्रवृत्ति अनीतीकडे होते त्या जनते-

पुढें सत्पुरुष सन्याशी वृत्तीनें वागले तर तें जनतेस चांगलें उदाहरण होणार नाहीं काय ? या राजभोगी साधूंचे उपभोग जनतेला मिळालेल्या द्रव्याच्या व्ययापासूनच प्राप्त होत असतील, तर या द्रव्यव्ययास गोरक्षण, धर्मरक्षण यांसारखे विषय नाहींत काय ? बरें, हें द्रव्य व उपभोग कांहीं सिद्धीनें प्राप्त होत असतील, तर ह्या सिद्धीचा उपयोग हे सत्पुरुष गोरक्षणादि धार्मिक कार्मी कां करीत नाहींत ? का त्यांना गोरक्षण हा भ्रम वाटतो ? त्यांच्याजवळ खरोखरीच सिद्धि असेल तर सर्व हिंदुस्तानांतील गाई त्यांना विकत घेतां येतील कीं नाहीं ? या विचारांवरून, साधूंची सिद्धि व त्यांच्या राजभोगाचें समर्थन ह्यांत विशेष अर्थ नाहीं असें दिसून येईल.

साधूंना चांगलें खाणेंपिणें मुळींच नको असें आमचें म्हणणें नाहीं. आरोग्याच्या दृष्टीनें अवश्य तें त्यांना पाहिजेच. पण त्यांस श्रीमंतीचा थाट व घृतकुल्या यांची जरूरी नसावी.

साधूंचे पुष्कळ चमत्कार खरे नसतात यासंबंधानें कांहीं अनुभवः—

केसरीचे उपसंपादक × × एका महाराजांकडे गेले व त्यांना त्यांनीं चमत्कार दाखविण्याविषयीं विनंती केली; तेव्हां ' तुम्ही या भानगडींत पडूं नका ' म्हणून त्यांना महाराजांनीं उत्तर दिलें.

×× शास्त्री ×× महाराजांकडे गेले व 'तुमच्या चमत्कारांसंबंधानें फार गोष्टी ऐकतो कांहीं मला चमत्कार दाखवितां काय ?' म्हणून त्यांना विनंती केली; तेव्हां ' त्यांत तथ्य मानूं नका ' म्हणून महाराजांनीं उत्तर दिलें.

प्रो० वुडहाऊस यांचा अनुभव म्हणून प्रसिद्ध झालेला चमत्कार खोटा ठरल्याचें प्रसिद्ध झालेंच आहे.

असे आणखीही अनुभव आहेत.

यासंबंधांत वे॥ महादेवशास्त्री दिवेकर यांचे ' स्त्री ' मासिकांतील ' बोवाबाजी ' वरील व ' किर्लोस्कर मासिकांतील ' निरनिराळ्या ' महाराजां'विषयींचे लेख वाचकांनीं अवश्य वाचावे.

---

# प्रकरण १४ वें.

## भ्रमांचा संकीर्ण संग्रह.

### शुभाशुभ व पायगुण यांसंबंधानें.

बहुतेक वस्तूंचा शुभाशुभ परिणाम होतो अशी समजूत पुष्कळ समाजांत आहे. घरांत येणारी वधू, नवीन जन्मास येणारें मूल, रत्नें, घोडें, व नोकर यांचाच नव्हे तर घरांत येणारें कुत्रें, गाय वगैरे जनावर, व धोतर, लुगडें इत्यादि वस्तु यांचा शुभाशुभ परिणाम होतो अशी समजूत आहे. त्यावरून 'पायगुणाची' 'पांढऱ्या पायाचा' वगैरे विशेषणें कांहीं व्यक्तींना मिळाल्याचें पुष्कळांना माहीत असेल.

सिंधमध्यें पुष्कळ वर्षे चांगला पाऊस पडला नव्हता तो इंग्रजांनीं सिंध घेतल्यावर पडला, तेव्हां इंग्रजांच्या पायगुणामुळें पाऊस पडला अशी तेथील कांहीं लोकांची समजूत झाली !

### सावली, प्रातिमा, प्रतिबिंब किंवा फोटो यांसंबंधीं समजुती.

वस्तु व सावली यांचा निकट संबंध असल्यामुळें त्यांच्या द्वारें व्यक्तीवर परिणाम होतो या कल्पनेवरून अनेक समजुती उत्पन्न झाल्या आहेत. त्यांपैकी कांहीं पुढील होतः—

हलक्या मनुष्याची (अंत्यजाची वगैरे) सावली आंगावर पडली असतां त्यानें मनुष्य दूषित होतो.

एकाद्याच्या सावलीवर बिब्बा घातला किंवा चाकूनें चिरफाड केली, तर त्याचा परिणाम त्याच्या अंगावर होतो.

तेलांत आपलें प्रतिबिंब पाहून तें तेल शनीला घातल्यानें साडेसातीचा दोष कमी होतो.

मुडदूस झालेल्या मुलाचे मुतांत त्या मुलाला आपलें तोंड पाहाण्यास सांगतात व तें मूत बाभळीच्या वगैरे झाडावर टाकतात. त्यामुळें तें झाड वठतें व मूल बरें होतें अशी समजूत आहे.

तुपांत आपलें प्रतिबिंब पाहून तें ब्राह्मणास दान दिल्यानें अनिष्टनाश होतो.

न्हावी भेटल्याचा अपशकून झाल्यानें त्याचे आरशांत तोंड पाहून तो आरसा त्यास परत दिला असतां अपशकुनाचें अनिष्ट त्या आरशांतील प्रतिबिंबासह न्हाव्याकडे जातें.

एकाद्याचें चित्र काढून अथवा त्याची प्रतिमा करून तिच्यावर खिळे टोचणें वगैरे क्रिया केली असतां त्या मनुष्यावर त्याचा परिणाम होतो.

अशाच कल्पना केस, नाळ, नख वगैरेसंबंधानें आहेत. म्हणून हे पदार्थ शत्रूच्या हातांत पडूं नयेत याबद्दल कांहीं लोक काळजी घेत असतात.

## गूढ सामर्थ्याचे परिणाम अथवा अद्भुत उपाय.

"The Keys of Power" by Abbott या पुस्तकांत ९४ पानावर पुढील माहिती आहे:—

"धारवाड येथें रेगे आडनांवाचें कुटुंब आहे. त्यांतील माणसें कुत्रा चावलेल्या माणसास फक्त पाणी पिण्यास देऊन बरें करतात. कार्किकट्टी ( Karkikatti ) येथें एक मांत्रिक आहेत त्यांच्याकडे साप चावलेल्या माणसाची बातमी सांगण्यास जो मनुष्य जातो त्यास ते चाबकानें मारतात व इकडे साप चावलेला मनुष्य बरा होतो. कंजगेरी ( Kanjgeri ) येथील एक मांत्रिक, कोणाला साप चावल्याची बातमी कळली, कीं बातमी सांगणाराच्या पाठीवर, अथवा जवळची जमीन, धोंडा, झाड, भिंत यांवर हात आपटतात व तेवढ्यानें रोगी बरा होतो. हिरेहळ (Hirehal) येथें एक शिक्षक, साप चावल्याची बातमी सांगणाऱ्या मनुष्यास पाणी प्यायला देऊन, साप चावलेल्या माणसास बरा करतात."

मिरजेजवळ एक पीर आहे त्याची अशी प्रसिद्धि आहे कीं, कोणास साप चावला असतां त्यानें पिराचें नांव घेऊन एक धोंडा उचलून झाडास बांधावा म्हणजे तो बरा होतो. मग त्या रोग्यानें अथवा दुसऱ्या कोणी माणसानें तो धोंडा पिराच्या दर्ग्यावर नेऊन तो तेथील लिंबाच्या झाडास बांधावा व त्या धोंड्याच्या भारंभार गूळ दर्ग्याच्या मालकास द्यावा.

सर्पविषावरील उपायांसंबंधानें वस्तुस्थिति काय आहे याबद्दल माहिती १७१–१७३ पानांत पहा. म्हणजे वरील दोन परिच्छेदांतील हकीकतींत सत्य किती आहे हें कळून येईल.

## धातूंसंबंधानें शुभाशुभकल्पना.

सोनें शुभ समजलें जातें. सोन्याचें पाणी अंगावर पडल्यानें कल्याण होतें या कल्पनेनें पुष्कळ लोक हातांत सोन्याचें वळें घालतात.

रूपेंही शुभ मानलें जातें. दृष्ट लागूं नये म्हणून मुलाच्या हातांत चांदीचीं कडीं घालतात.

तांबें—धर्मकार्यासाठीं तांब्याचें भांडें प्रशस्त मानलें जातें. [ कळकण्याच्या दृष्टीनें तांब्याचें भांडें आंबट पदार्थ ठेवण्यास चांगलें नाहीं. पण पाणी ठेवण्यास तें एकंदरीनें चांगलें हें खरें. तांब्याच्या भांड्यांतील पाण्यांत महामारींचे जंतु जिवंत रहात नाहींत असें शास्त्रज्ञांचें मत आहे. ]

लोखंड अशुभ मानलें जातें. श्रावणीश्राद्धादि धर्मकृत्यें करतांना जानव्यांतील लोखंडाची किल्ली काढून ठेवावी लागते.

रस्त्यांत सापडलेला नाल उंबऱ्यावर ठोकल्यानें, त्या घरांत मेलेलें मनुष्य पिशाच होऊन परत येत नाहीं, अशी समजूत आहे.

## मीठ, मिरच्या इत्यादि पदार्थांचें सामर्थ्य.

मिठानें भूत-पिशाचें जातात म्हणून दृष्ट काढण्याच्या कामीं मिठाचा उपयोग करतात.

मिरच्या, मोहऱ्या वगैरे उग्र वासाच्या पदार्थांमध्यें हा गुण आहे अशीही समजूत आहे; म्हणून दृष्ट काढण्याच्या कामीं यांचाही उपयोग करण्यांत येतो.

## संख्या

सामान्यतः विषम संख्या शुभ व सम अशुभ समजली जाते. गांवाला जातांना बरोबर लाडू द्यावयाचे ते ६,८ असे समसंख्यात्मक न देतां विषमसंख्यात्मक ५,७ असे देण्याची कांहीं बायकांची चाल आहे.

३, ५, ७ ह्या संख्या विशेष शुभ समजल्या जातात.

तथापि तिसरा विवाह हा शुभ होत नाहीं अशी समजूत आहे.

६,८, ह्या संख्या सामान्यतः अशुभ समजल्या जातात.

३४, ६४, २५ या संख्या सुखप्रसूति घडवून आणतात.

१५ या संख्येनें ताप बरा होतो.

ज्यांतील आंकड्यांची बेरीज विवक्षित (शंभर वगैरे) होते असे पुढील

प्रकारचे चौरस—यास यंत्र म्हणतात-शुभदायक आहेत असें समजून ते एका कागदावर काढून तो कागद तायतांत घालतात. हा ताईत वापरला असतां रोग जातो... सुखप्रसूति होते अशी समजूत आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| ४ | ११ | २ | ७ |
| ६ | ३ | ८ | ७ |
| १० | ५ | ८ | १ |
| ४ | ५ | ६ | ९ |

## प्राणी.

घोड्याजवळ भूत येऊं शकत नाहीं.

गाढव, रेडा, मेंढा, कावळा, टिटवी, घुबड, कवडा, पाल हे अशुभ प्राणी समजले जातात.

टिटवी व घुबड ह्याचें ओरडणें भावी मृत्यु दर्शवितें. टिटवीला यम दिसतो, म्हणून ती ओरडते तेव्हां कोणाला तरी नेण्यास आसपास यम आलेला असतो, असा समज आहे.

कोल्ह्याचें तोंड पाहणें, चास पक्षी जवळून जाणें हे शुभ शकुन होत.

मनुष्याचे अंगाच्या निरनिराळ्या भागावर पाल पडणें काय सुचवितें यासंबंधी 'पालीची कारिका' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे.

पिंगळा अथवा छोटें घुबड ह्याचे भिन्न शब्दांवर भिन्न शकुन बसविलेले आहेत.

## झाडें.

पिंपळ, वड, उंबर यांवर ब्रह्मराक्षस राहतात.

पिंपळावर मुंजा राहतो.

चिंचेच्या झाडावर, मेलेल्या बाळंतिणीचें भूत अथवा हडळ राहते.

भूत लागलेल्या मनुष्यानें पिंपळ, वड ह्या झाडास कवटाळलें, तर तें भूत त्यास सोडतें.

वेताला भूत भितें.

पुनर्वसूचें मूळ शेंडींत बांधलें असतां ताप जातो.

## दिशा.

दक्षिणेकडे पाय करणें अशुभ. यमाची दिशा दक्षिण, म्हणून प्रेत दक्षिणेकडे पाय करून ठेवण्याची, हिंदूंमध्यें चाल आहे. या अशुभ गोष्टीची आठवण दक्षिणेकडे पाय करण्यानें होते. म्हणून ही गोष्ट अशुभ मानली असावी.

पत्ते वगैरे खेळतांना चांगलें दैव लाधण्यासाठीं खुर्ची फिरविणें, अथवा जागा बदलणें.

## शकुन

मांजर आडवें गेल्यानें काम होत नाहीं.

शिंका शकुन.

नेत्र व बाहु यांचें स्फुरण.

बळीचें स्फुरण—देवीला जें बकरें बळी द्यावयाचें त्याच्या आंगावर पाणी शिंपडल्यावर जर त्याचें आंग थरथर कापलें, तर तो शुभ शकुन.

पानें १८९ ते १९१ मधील कांहीं माहिती ॲबटसाहेबांच्या "Keys of Power" या पुस्तकांतून घेतली आहे.

## मनुष्याचा बळी.

मनुष्याचा बळी देण्याची चाल प्राचीन काळीं तर अनेक देशांत होती पण ती अद्यापही क्वचित् चालू असल्याचें दृष्टीस पडतें.

शेंदीडशें वर्षांपूर्वी पूल, किल्ले वगैरेच्या पायांत माणसें पुरत अशाबद्दल अनेक उल्लेख आहेत. लोहगड किल्ल्याच्या बुरजाचा पाया ठरेना म्हणून त्याच्या पायांत पुरण्यासाठीं सावळे आडनांवाच्या मनुष्यानें आपला मुलगा व सून हीं बळी दिलीं व त्याबद्दल त्यास नाना फडाणिसांनीं पाटीलकी दिली अशी दंतकथा आहे.

" Omens and Superstitions of Southern India " या पुस्तकांत थर्स्टन साहेब लिहितात ( पानें २१७–८ ):–१९०१ साली बल्लारी जिल्ह्यांत एका मनुष्यानें धनप्राप्तीसाठीं आपल्या मुलाचा बळी दिला. त्याबद्दल सेशन्स जज्जापुढें जो खटला झाला त्यांत आरोपीनें पुढीलप्रमाणें जबानी दिली–" मला देवाचा दृष्टांत झाला कीं तूं मला आपला मुलगा बळी दे म्हणजे तुला माझ्या खालचें द्रव्य मिळेल व तुझा मुलगाही जिवंत होईल...मी म्हणालों 'मला एकच मुलगा आहे तो बळी कसा द्यावा'! देवानें सांगितलें तुला दुसरा मुलगा होईल. त्याप्रमाणें वर्षानंतर मला हा ( बळी दिलेला ) मुलगा झाला."

बळी दिल्याचा बोभाटा झाल्यामुळें तेथें लोक आले व त्या माणासाला पकडून नेलें त्यामुळें आपल्या यज्ञाला अडथळा झाला व त्यामुळें आपणास देवाकडून द्रव्य मिळावयाचें राहून गेलें अशी त्या माणसाची समजूत झाली होती.

अशा प्रकारचे अनेक खटले कोर्टापुढें आले आहेत.

## अद्भुत तेलें, अंजनें इ०.

याविषयीं कांहीं माहिती कौटिलीय अर्थशास्त्र यांत आहे. त्यासंबंधाचा उल्लेख मागें ८६ पानावर केलाच आहे.

बाळंतिणीच्या कपाळाची कवटी व अन्य हाडें, गर्भार बाईचा गर्भ यांचा जादूच्या कामीं उपयोग होतो ही समजूत हिंदुस्तानच्या कांहीं भागांत आहे. त्यासाठीं खून केल्याबद्दलचे खटले कोर्टापुढें आलेले आहेत. गर्भापासून पिलेथिलम नांवाचें तेल करतात व त्या तेलाच्या योगानें मनुष्यास वाटेल त्या प्राण्याचें रूप धारण करतां येतें अशी मद्रास इलाख्याच्या कांहीं भागांत समजूत आहे. ( पान ८६ पहा ).

हें तेल काढण्यासंबंधाची हकीकत अंगावर शहारे आणणारी आहे. अनंत कृष्ण अय्यर हे आपल्या "Cochin Tribes & Castes" या पुस्तकांत हें तेल करण्याची रीत पुढें दिल्याप्रमाणें लिहितातः—

"हें तेल तयार करूं इच्छिणारा मनुष्य गर्भार स्त्रीचा ८ महिन्यांचा

गर्भ काढून घेतो व गर्भाशयांत केरकचरा भरतो. त्यानें ती बाई मरून जाते. नंतर तो गर्भ कापून वाळवितात व त्यास धुरी देतात. मग तो गर्भ तळाशीं भोक असलेल्या एका भांड्यांत घालून तें भांडें दुसऱ्या भांड्यावर ठेवतात व हीं दोन्ही भांडीं अग्नीवर ठेवतात; म्हणजे कांहीं वेळानें खालच्या भांड्यांत वरच्या भांड्यांतून एक प्रकारचें तेल येतें. तें हें पिल्लेथिलम होय. ( हें वर्णन इतकें भयंकर आहे कीं त्यावर विश्वासही बसत नाहीं )

## इंग्लिश लोकांतील कांहीं भ्रम.

शिडी खालून जाणें अशुभ आहे.

यासंबंधानें अशी एक हकीकत एका पोलिस अधिकाऱ्यानें सांगितली आहे कीं, एकदा एका चोराचा पाठलाग करीत असतां भिंतीस लावून ठेवलेल्या शिडीखालीं तो चोर गेला; पण ही चूक लक्षांत येताच तो परतला व दुसरीकडे वळला. तेवढ्यांतच त्या अधिकाऱ्याला त्यास पकडण्याची संधि मिळाली. तेव्हा चोर म्हणाला 'शिडीखालून जाऊन जन्मभर अशुभ पतकरण्यापेक्षां आतां पकडलें जाणें बरें.'

शुक्रवार हा गुन्ह्याला चांगला दिवस नाहीं अशी समजूत आहे, म्हणून घरफोडीच्या चोऱ्या शुक्रवारीं कमी होतात असें वरील अधिकाऱ्यांचें म्हणणें आहे.

आपल्याइकडे भांड्यास धक्का लागून त्याचा नाद झाला असतां तो भांड्यास हात लावून बंद करण्याची चाल आहे; त्याप्रमाणें ग्लासाला सहज धक्का लागून होणारा आवाज बंद करण्याची चाल इंग्लिशांमध्यें आहे.

तेरा हा आकडा अशुभ आहे. म्हणून कांहीं हाटेलें व आगबोटी यांतील १३ नंबरच्या खोलीवर १२अ असा नंबर घालण्याची वहिवाट आहे.

तेरासंबंधाची व अन्य खोट्या समजुती घालविण्याकरितां इंग्लंडांतील एका लोकभ्रमविरोधी संस्थेनें एक खान्याचा समारंभ करून त्यास तेराच माणसें हजर राहतील अशी व्यवस्था केली व 'काटा असा ठेऊं नये', 'मीठ

सांडूं नये' वगैरे जे लोकभ्रम आहेत, त्याच्या विरुद्ध सर्व गोष्टी मुद्दाम केल्या, अशी हकीकत मुंबईच्या टाइम्समध्यें २।३ वर्षांपूर्वी आली होती.

अफगाणयुद्धापूर्वी एका प्रसंगीं लॉर्ड रॉबर्ट्स व दुसरे बारा अधिकारी मिळून तेरा असामींचा एक खाना झाला. पण सुदैवानें त्यापुढें ११ वर्षें-पर्यंत सर्व हयात होते.

वरीलशिवाय खाजणें, नखावरील पांढरे ठिपके वगैरेसंबंधानें व अन्य अनेक समजुती इंग्लिशांमध्यें प्रचलित आहेत.

इंग्लिश नटांच्या मिथ्या समजुती.

पोषाखाच्या खोलींत शीळ घालतां उपयोगी नाहीं.

नाटकाचा पहिला प्रयोग शुक्रवारीं करण्याचा प्रसंग आला तर अशुभ टाळण्यासाठीं नट पोषाकाच्या खोलींतून बाहेर पडतांना उंबऱ्याबाहेर प्रथम डावें पाऊल टाकतात.

नाटकगृहांत मोराचें पीस फार अशुभ समजलें जातें.

अशा प्रकारच्या समजुती इतर युरोपियनांतही आहेत. रोमन कॅथॉलिक पंथांच्या लोकांमध्यें अशा समजुतींचें प्रमाण जास्त आहे.

———

# परिशिष्ट अ.

पान १४. ज्यांना जागेपणीं स्वप्नें पडतात असे कांहीं लोक आहेत. डी क्विन्सेच्या Confessions of an Opium-eater या पुस्तकांत पुढील विधान आहे.

"Many children have a power of painting as it were upon the darkness all sorts of phantoms; or as a child once said to me, "I can tell them to go & they go; but sometimes they come when I do'nt tell them to come." He had by one half as unlimited a command over apparitions as a Roman centurian over his soldiers."

पान ८८, ५अ 'चकल्याचीं अनेक उदाहरणें'- पानें ९१, ११६, १३४, १३९, यांमध्यें हीं पहा.

पान ११५.

मृतांशीं संभाषण याविषयीं लंडनच्या बिशपांचें मत—

## "Spiritualism a waste of time."

### London Church Ban On Seances.

The Bishop of London, in a message to his diocese on spiritualism, declares that the practice is "*dangerous, dishonouring to the dead, and a waste of time for the living.*"

"Most willingy would I avoid saying anything, as some of my best friends believe in it, and also one or two of my leading clergy, to say nothing of men like Sir Oliver Lodge, whom the world honours and respects. Yet I feel that this attempt to communicate

through medinms with those in the other world is all wrong. Even those who practise it admit its dangers.

MIND READING

"I believe myself that the mediums, consciously or unconsciously, are reading the thoughts of those who come to them, and that this is the explanation of the revelations which appear to come from the other world, and which deceive many.

"I have already forbidden any church or any church building to be used for seances. I do most earnestly exhort those whom I personally know and love, to give up this unauthorised attempt to communicate with the other world & to come back to the guidance of the Holy Spirit of God, Who can alone be trusted to guide unto all truth."

20-7-35 Times of India.

पान १३७, ( इ )–वाळूमुळें संगीत.

Many travellers have heard the singing sands, in māny different deserts & all agree that it is a strange & startling experience. Suddenly......there comes a loud booming noise. Sometimes it is described as a roaring, sometimes as a bellowing, but generally it seems to swell on a single low note growing in volume till it fills the air over a wide space, then ceasing as quickly as it began.

—Page 227 - "Round the Great World" by Cyril Hall.

पान १४०. मध्यस्थांच्या लबाड्या—

"Even educated and scientific spiritualists were not quite prepared for the amount of fraud which has recently come to light, nor for the obstinacy with which the mediums against whom fraud has been proved have been afterwards defended and have been able to go on with their trade, after exposure no less than before."

Pr. Address by Prof. Sidgwick, 1882.

यांशिवाय पुढील दंभस्फोटाचीं उदाहरणें पहा—

युसेपिया ( Eusapia ) ह्या बाईच्या चमत्काराविषयीं अनेक शास्त्रज्ञांची खात्री झाली होती; पण न्यूयॉर्क येथें झालेल्या एका बैठकींत तिला प्रो० मन्स्टरबर्ग यांनीं लबाडी करतांना पकडलें.

A man concealed by prof. Munsterberg in the tent-like alcove behind Eusapia caught hold of a foot which was picking up objects & which turned out to be attached to Eusapia, although both her feet were supposed to be securely controlled by intelligent observers.

—Page 81, " Evidence for the Supernatural " by Tuckett.

योगी फाटकबोवा यांची समाधि, + + + महाराजांचे पाण्यावर बसणें इ० चमत्कारांतील वैयर्थ्य लोकांच्या प्रत्ययास आलेंच आहे.

पान १४७—

## भविष्यज्ञानसाधनें.

हीं पुढील होत—

१ फलज्योतिषशास्त्र,

२ प्रश्नकुंडलीशास्त्र,

३ सामुद्रिकशास्त्र,

४ मस्तुलिंगशास्त्र ( Phrenology )

५ रमल, अथवा फासे टाकून त्यांवरील ठिपक्यांवरून भविष्य जाणण्याचें शास्त्र,

६ खेळण्याच्या पत्त्यांवरून भविष्य जाणण्याचें शास्त्र,

७ आंगठी, स्फटिक अथवा आरसा यांत पाहून भविष्य जाणण्याचें शास्त्र,

८ पिंगळ्याचे ओरडण्यावरून भविष्य जाणण्याचें शास्त्र,

९ शकुनशास्त्र अथवा पक्ष्यांचे आवाज व गति यांवरून भविष्य जाणण्याचें शास्त्र,

१० पालीसंबंधीं शास्त्र,

११ डोळयाचे स्फुरणांवरून भविष्य जाणण्याचें शास्त्र.

१२ पवित्र ग्रंथ (गुरुचरित्र, बायबल वगैरे) मध्येंच कोठेंतरी उघडून त्यांत दृष्टीस पडणाऱ्या पहिल्या ओवीवरून भविष्य जाणण्याचें शास्त्र,

............इ०.

## प्राचीन काळीं उपयोगांत असलेलीं कांहीं भविष्यज्ञापक साधनें.

१ देवऋष्यास होणाऱ्या स्फूर्तीवरून,

२ मारलेल्या जनावराच्या यकृत अथवा रक्ताशय या इंद्रियाच्या स्थितीवरून,

३ मारलेल्या जनावराच्या आंतड्यांवरून,

४ हाताच्या बोटांच्या स्नायूंच्या स्फुरणावरून,

५ कानांतील संवेदनावरून,

६ तीक्ष्ण टोंकाचे व बोथट टोंकाचे बाण मिसळून त्यांतील एकादा बाण उचलून त्याचे स्वरूपावरून,

७ विस्तवांत टाकलेल्या खवाट्याच्या हाडावर पडणाऱ्या भेगांवरून,
८ कागदावर यदृच्छेनें काढलेल्या रेषा अथवा आकृति यांवरून,
९ टांगलेल्या चाळणीच्या फिरण्यावरून भविष्य ओळखणें.
..............................इ०.

शास्त्रज्ञांच्या मतें वरीलपैकीं कोणत्याही साधनानें निश्चित ज्ञान होत नाहीं.

फलज्योतिषशास्त्राच्या आजच्या स्थितींत त्याच्या साहाय्यानें निश्चित ज्ञान होणें कसें शक्य नाहीं याबद्दल विवेचन माझ्या "फलज्योतिष-चिकित्सा' या पुस्तकांत आहे.

इतकीं साधनें असूनही भविष्यज्ञान निश्चयानें कोणास होत असे, याबद्दल विश्वसनीय इतिहासांत पुरावा दिसत नाहीं.

जर कदाचित् या साधनांनीं निश्चित ज्ञान होत असेल, तर त्याचें कारण हीं साधनें हें नसून, साधनाचा उपयोग करणाऱ्या व्यक्तीचें चातुर्य अथवा मनाची अद्भुत शक्ति हें होय असें बऱ्याच शास्त्रज्ञांचें मत आहे.

## पान १४९. स्वयंसूचनेचा अथवा भीतीचा परिणाम.

"बसवप्पा नांवाच्या एका प्राथमिक शाळेंतील विद्यार्थ्यांच्या वर्गांतील एक पुस्तक नाहींसें झालें. चोरी शोधून काढण्याचा एक नवीनच उपाय शाळामास्तरानें अमलांत आणला. त्यानें एक नारळ आणून त्यावर देवाचें नांव लिहिलें, आणि विद्यार्थ्यांना नारळाला स्पर्श करावयास सांगितलें. 'खऱ्या चोरानें नारळास हात लाविल्याबरोबर देवाचा त्यावर कोप होईल' असें मास्तरांनीं सांगितलें. बसवप्पाची पाळी आली. त्यानें नारळास स्पर्श करण्याचे नाकारलें. तो हात लावण्यास धजत नाहीं असे पाहून शिक्षकानें त्याला सक्तीनें स्पर्श करावयास लाविला. शाळा सुटून बसवप्पा घरीं परत गेल्याबरोबर त्याला ताप भरून आला, वात झाला व "नारळ-नारळ" असे बडबडत एका तासांत त्याला मृत्यु आला.

२१-१०-३३ चा 'सकाळ'.

## पान--१५०. नैसर्गिक अभ्दुत भविष्यकथनसामर्थ्य

"जेन डयूमने नांवाच्या अमेरिकन मुलीच्या अंगीं विलक्षण चित्शक्ति आहे. गतवर्षी एका अटीतटीच्या सामन्यांत कोणती टीम जिंकेल असा प्रश्न करतां 'एम'या अक्षरानें जिच्या नांवाचा आरंभ होतो ती टीम विजयी होईल असें भविष्य तिनें वर्तविलें होतें व शिवाय या टीममैकीं जो खेळाडू विशेष कामगिरी बजावील त्याचे केस भुरके अगर तांबूस असतील असेंही तिनें सांगितलें होतें. ह्या सर्व गोष्टी बरोबर ठरल्यामुळें यंदाच्या डर्बीबाबत या मुलीचा कौल घेण्यांत आला आहे. यंदा 'कोलंबो' हा घोडा डर्बी जिंकेल अशी अनेकांची खात्री आहे. परंतु तो जिंकणार नाहीं असें या मुलीनें ठासून सांगितलें आहें. कोण जिंकणार असा प्रश्न विचारतां ज्या घोड्याच्या तोंडावर पांढरे टिपके आहेत व ज्याच्या मालकाच्या नांवांत बरींच अक्षरें आहेत तो घोडा जिंकेल असें तिनें उत्तर दिलें. हें वर्णन राजपिंपळयाच्या महाराजांच्या 'विंडसर लॅड' या घोड्यास लागू पडतें. हा घोडा शर्यत जिंकतो काय याबद्दल आतां बरेंच कुतूहल उत्पन्न झालें आहे." ज्ञानप्रकाश ता. ६।७।३४.

वरील भविष्य खरें झालें.

वरील प्रकारच्या सामर्थ्याविषयीं प्रसिद्ध अशा आणखी बऱ्याच व्यक्ति आहेत. (तथापि या बाबतींत १४९ पानावरील १-३ व ९-१० ओळींतील सूचना लक्षांत घ्यावी अशी विनंती आहे).

पान १५२. काकतालीयन्यायाचीं आणखी उदाहरणें—

यु० स्टेटसचे अध्यक्ष रुझव्हेल्ट यानीं एका प्रसिद्ध सामन्याच्या निकालाचा अंदाज केला होता, तो बव्हंशीं खरा ठरला.

क्रिकेट, फुटबॉल इत्यादिकांच्या सामन्याच्या निकालाचा अंदाज वाचकांकडून मागवून त्यांतील चांगल्या अंदाजास बक्षीस देण्याची कांहीं वर्तमानपत्रांची चाल आहे. या अंदाजांत कांहीं फार बरोबर येतात असा अनुभव आहे.

तळेगांव येथें १९३५च्या मार्च महिन्यांत मोटरलॉरीचा एक अपघात झाला त्या वेळीं असें आढळून आलें कीं त्या जागेचे आसपास तशाच प्रकारचे अपघात आधल्या दोन दिवशीं झाले होते.

पान १८०—हातरुमालास गांठ मारण्याची कृति—

( हातरुमाल सहज कोठेंही उपलब्ध असतो म्हणून तो घ्यावयाचा; पण त्याच्या ऐवजीं दोरी घेतली तरी चालेल. )

हातरुमाल घेऊन त्यास कर्णावर घडी घालून तो टेबलावर पसरून ठेवा. अग्रहस्त ( अथवा कोपरापासून बोटापर्यंतचे हाताचे भाग ) छातीवर आडवे ठेवून ते एकांत एक आपण गुंतवतों त्या प्रमाणें ते गुंतवा. मग टेबलाजवळ जाऊन दोन्ही हातांच्या त्याच स्थितींत, दोन्ही हातांनीं रुमालाचीं दोन्ही टोकें घ्या. नंतर त्याच स्थितींत हाताची गांठ मोडून हात मोकळे करण्याचा प्रयत्न करा; म्हणजे हात मोकळे करतांना ( डावा हात डावीकडे व उजवा हात उजवीकडे नेतांना ) रुमालास आपोआप गांठ पडत आहे असें आढळून येईल.

समाप्त.

याच ग्रंथकाराने प्रसिद्ध केलेले

फलज्योतिषाच्या स्वरूपाची चर्चा करणारें पुस्तक.

# फलज्योतिषचिकित्सा.

**किंमत ८ आणे.**

## या पुस्तकावरील विचारी व विद्वान् लोकांचे अभिप्रायः—

मनाची समतोलता व उच्चवाङ्मयनिर्मिति यांविषयीं सुप्रसिद्ध असलेले लेखक प्रो० वा० म० जोशी, एम्. ए., म्हणतातः—

" श्री० गोखले यांनीं आपल्या पुस्तकांत जी विचारसरणी स्वीकारली आहे ती तर्कशास्त्राला पूर्णपणें धरून आहे, व त्यांतील कांहीं किरकोळ विचार एकाद्यास मान्य झाले नाहींत तरी बहुतेक विचार मान्य होण्यासारखे आहेत."

प्रोफेसर दे. द. वाडेकर एम्. ए., फर्ग्युसन कॉलेजांतील तर्कशास्त्र व तत्त्वज्ञान यांचे अध्यापक, लिहितातः—

"विचारसरणी पूर्णपणें शास्त्रीय व केवळ सत्यान्वेषी स्वरूपाची असल्यानें मला मान्य आहे."

प्रो० वै० का० राजवाडे एम् ए. यांचा अभिप्राय " विचारसरणी तर्कशुद्ध आहे असें मला माझे मित्र कै० रा. त्रि. कीर्तने म्हणाले; माझेंही मत तेंच आहे."

(*पेन्शनर फर्स्टक्लास सब जज्; ह्यांनीं फलज्योतिषाचा अभ्यास केला होता.)

पदार्थविज्ञानशास्त्राचे प्रोफेसर रा. ना. जोशी लिहितातः—

" या शास्त्राचे संशोधनासंबंधीं ज्या दिशेनें प्रयत्न व्हावयास पाहिजे आहेत असें आपण लिहिलें तें मला पसंत आहे. मला वाटणाऱ्या कांहीं गोष्टी पुढें दिल्या आहेतः—

( १ ) ज्योतिषशास्त्रानें तंतोतंत भविष्य केव्हांही सांगतां येणार नाहीं. कारण भविष्यकाळ हा जर पूर्वसंचिताचे फलावर अवलंबून आहे तर प्रस्तुत काळीं घडणाऱ्या कर्मांनें त्यामध्यें फरक पडणें अवश्य आहे.

( ५ ) ग्रह फलाचे कारक नसून फक्त सूचक आहेत.

( ६ ) याचे नादापासून साधारण मनुष्यास फायद्यापेक्षां तोटा अधिक आहे. कारण मन कमकुवत होतें. ”

प्रो. सबनिस, एम्. ए. माजी प्रिन्सिपाल, सर प. भा. कॉलेज म्हणतातः—

“ आपण निर्विकार मनानें...पुस्तक लिहिल्याबद्दल अभिनंदन केलें पाहिजे. ”

वरीलसारखे अभिप्राय ज्यांनीं कळविले आहेत अशांपैकीं कांहीं विद्वानांचीं नावेंः—

प्रोफेसर न० ग० दामले एम्. ए, तर्कशास्त्र व तत्वज्ञान यांचे अध्यापक

” शं. गो० साठे एम्. ए. ” ” ”

डॉ० दि. धों. कर्वे एम. एससी., पी.एच. डी.

वर जीं नांवें दिलीं आहेत तीं, लोकांनीं डोळे मिटून आमचे निर्णय मान्य करावे म्हणून दिलीं नसून, आमचा पक्ष असत्यच असला पाहिजे असा ज्यांचा पूर्वग्रह असेल त्यांना, आमच्या म्हणण्यांत विचारार्ह भाग थोडाबहुत आहे, हें कळावें म्हणून दिलीं आहेत.

फलज्योतिषावर थोडाबहुत विश्वास असणाऱ्या दोघा प्रोफेसरांनीं, ‘ह्या शास्त्रानें निश्चित ज्ञान होत नाहीं ’ या निर्णयास मान्यता दिलेली आहे ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

प्रस्तुत विषयावर इंग्रजींत लिहिलेल्या निबंधासंबंधानें डेक्कन कॉलेजचे माजी प्रिन्सिपाल रॅालिन्सन साहेब “माझे विचार तुमच्या सारखेच आहेत” असें कळवून लिहितातः—

“I hold that for an explanation of the facts of our lives we must look not to astrology but biology; heredity & environment & not the stars, are the deciding factors. As long as people can put it down to the stars they will never improve. ”

---

## लोकभ्रम या पुस्तकावर अभिप्राय.

"आपली विचारसरणि, अनुमानें व सिद्धांत निर्दोष आहेत. आपला चहूंकडे दिसणारा बुद्धिवाद व शास्त्रीय दृष्टि, तसेंच कोणतेंही मत अथवा विधान तावूनसुलाखून पारखून घेण्याबद्दलची तत्परता व चिकित्सावृत्ति हीं सर्व आपल्या लेखाचीं वैशिष्ट्यें अभिनंदनीय आहेत. आपल्या लेखनांतील तार्किक व मानसशास्त्रीय विवेचनाचे भाग मी विशेष चांगले पाहिलेले आहेत. ते सर्व आपली सूक्ष्म विकलनदृष्टि ( analytical intelligence ) दर्शवितात व त्यांत चूक कोठेंही नाहीं.

आपल्या ग्रंथाच्या प्रसिद्धीनें समाजांतील अंधविश्वास कमी होऊन चिकित्साबुद्धीच्या वाढीस मदत होईल असा मला विश्वास वाटतो."

प्रो० दे. द. वाडेकर एम. ए.

कॉलेजांतील फर्ग्युसन तत्त्वज्ञान या विषयाचे अध्यापक.

" लोकभ्रम हें पुस्तक वाचून आनंद झाला. लोकभ्रमांसंबंधीं ध्यानांत धरण्यासारख्या गोष्टी शास्त्रीय पद्धतीनें उत्तम रीतीनें दिलेल्या या पुस्तकांत आढळतील."

प्रो० वा० म० जोशी, एम. ए.

" कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं 'लोकभ्रम' या सदराखालीं एक स्वतंत्र निबंध लिहिलेला आहे...त्याच पद्धतीचा पण त्याहून खोलांत व तपशिलांत शिरणारा असा रा० गोखले यांचा निबंध आहे.

हा निबंध मुलांच्या वाचण्यांत जितका येईल तितका बरा. ...... सर्वच ग्रंथ वाचनीय आहे."

—श्री. न. चिं. केळकर, केसरी ८-११-३५.

" भुताटकी व चमत्कार यांवरील अंधश्रद्धेमुळें कित्येक कुटुंबांचें जीवन असह्य झालें आहे.

" मृतात्म्यांशीं संभाषण, मृतात्म्यांचे फोटो व त्याची उपपत्ति याचें विवेचन इतक्या सोपपत्तिक रीतीनें केलें आहे कीं, त्यांवर विश्वास ठेवणाऱ्या माणसाला आपले पूर्वग्रह पुन्हा पडताळूनच पहावे लागतील.

" पुस्तक सुरवातीपासून अखेरपर्यंत मनोरंजक झालेंच आहे; पण कित्येक भ्रमांचा निरास होण्यास त्यानें फार मोठी मदत होणार आहे यांत शंका नाहीं. "

—ज्ञानप्रकाश २९-११-३५.

" आपल्या पुस्तकांत स्वीकारलेली विचारसरणि अभिनंदनीय आहे. सत्यान्वेषणासाठीं आपण तिचा अवलंब केला आहे व कोट्यावधि लोक ज्याचे मार्गे लागलेले दिसतात त्या शास्त्राच्या उपयुक्ततेसंबंधानें कोणत्या दिशेनें विचार व प्रयोग केले पाहिजेत हें आपण चांगलें दाखविलें आहे. प्राचीन वराहमिहिरासारखे फलज्योतिषावरील ग्रंथकार होराशास्त्र हें, पूर्वजन्माच्या कर्माची पक्ति कशी होईल याचें फक्त सूचक आहे इतकेंच मानीत होते; पण अलीकडचे ज्योतिषी ग्रह कारक आहेत असें मानतात. शेंकडा ९५ लोकांच्या प्रयत्नवादाचा व उत्साहाचा भंग या शास्त्राचा विचार घेतल्यानें होतो. "

प्रो० पां० वा० काणे, एम. ए., एलएल. बी.

' आपलीं व माझीं मतें पूर्णपणें जुळतात.'

वायुशास्त्रांतील तज्ज्ञ श्री० वि० वि० सोहोनी, एम्., एस. सी.

" शास्त्रीय चिकित्सक या दृष्टीनें आपण आपली बाजू फार उत्तम तऱ्हेनें मांडली आहे. आपल्या पुस्तकांतील बहुतेक मुद्दे मला सयुक्तिक व मान्य वाटतात.......

ह्या शास्त्रांतील विचारसरणी खरोखरच शास्त्रीय आहे किंवा हें शास्त्र ज्योतिषशास्त्रावरून बसविलेलें एक करमणुकीचें साधन आहे ह्याबद्दल चिकित्सकांनीं विचार केलेला दिसत नाहीं.

शास्त्राच्या परिव्याप्तीच्या दृष्टीनें पुस्तकांतील पांचवें प्रकरण ' ग्रहयोग कारक कीं सूचक ' हें फार महत्त्वाचें आणि विचारणीय आहे. सकृद्दर्शनीं I पैकीं बहुतेक गोष्टी व II पैकीं अ, ब, क, ड या गोष्टी आनुवंशिक संस्कार व परिस्थिति यांवर मुख्यत्वें अवलंबून आहेत असें वाटतें. जन्मकालीन ग्रहस्थितीचा ह्यांच्यांशीं कांहीं संबंध असावा असें वाटत नाहीं.

—प्रो० ज. नी. कर्वे

प्रो० वा. मा. दबडघाव.

" आपले सर्व मुद्दे व विचारसरणी मला पूर्णपणें मान्य आहे. हें पुस्तक लिहून भोळ्या समाजावर आपण मोठेंच उपकार केले आहेत."

—प्रो० श्री. ल. आजरेकर

" या शास्त्राचें व्यसन माणसास जडलें तर तो दैववादी व दुबळा झाल्याखेरीज राहात नाहीं. रा. रामभाऊ गोखले यांनीं जिज्ञासूची भूमिका घेऊन या शास्त्राबद्दल ज्या साधार शंका उपस्थित केल्या आहेत, त्यायोगें फलज्योतिषाच्या उपयुक्ततेच्या मर्यादा कळतील आणि सत्याभासाला सत्य म्हणण्यांत आपली कशी चूक होते, हें कळून येईल. पुस्तकाची रचना अशी आहे कीं, सामान्य वाचकहि तें वाचतां वाचतां त्यांत समरस होईल. "

—आनंद.

...Mr. R. J. Gokhale's फलज्योतिषचिकित्सा, an inquiry iuto the scientific foundations of astrology, is one such attempt and in the small leaflet of about 50 pages he convincingly attacks these foundatinus. Any one who reads the book with a free mind cannot possibly fail to be impressed by the arguments of Mr. Gokhale.

—"Progress of Education".

" या विषयाची पूर्वग्रहरहित, निःपक्षपातानें, साधकबाधक चिकित्सा-करून ' शास्त्र ' या दृष्टीनें त्याची प्रस्तुतची अवस्थिति कोणत्या कसोटीस लागते हें पाहण्याचा प्रयत्न अत्यंत इष्ट होय. अशा स्वरूपाचा प्रयत्न या पुस्तकांत केला आहे....

" फलज्योतिषांत जे आंधळे प्रकार चालले आहेत ते स्पष्टपणें मांडून रा० गोखले यांनीं फलज्योतिष्यांस स्पष्ट आव्हान दिलेलें आहे....

"यापुस्तकांत मांडलेल्या सर्व शंका समर्पक आहेत यांत संशय नाहीं."

—' विहार ' १२-९-३५.

" अज्ञ जनांचा बुद्धिभ्रम दूर करून जनतेस बुद्धिशरण व शास्त्रप्रवण करावें हें या पुस्तकाचें उद्दिष्ट आहे ... भ्रममूलक ... श्रद्धा बसली कीं, भ्रांतिष्ट व निर्बल मनाचा होतो. त्यास या मार्गापासून परावृत्त करण्यास हें पुस्तक अत्यंत उपयुक्त आहे. "

— ' लोकशक्ति ' ४-११-१९३५.